॥ श्री ॥

# श्रीसकलसंतवाणी

**॥ श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

श्रीगणपतीला नमस्कार असो, श्रीसरस्वतीला नमस्कार असो, श्रीगुरूंना नमस्कार असो,



## श्रीज्ञानेश्वरांची गाथा

### श्रीहरीच्या सगुणनिर्गुण रूपाचें वर्णन.

१. रूप पाहतां लोचनीं। सुख जालें वो साजणी॥ १ ॥ तो हा विठ्ठल बरवा। तो हा माधव बरवा॥ ध्रु० ॥ बहुता सकृतांची जोडी। म्हणुनि विठ्ठलीं आवडी॥ २॥ सर्व सुखाचें आगरु। बापरखुमादेविवरु॥ ३॥

२. चिदानंद रूप चेतवितें एक। एकपणें गुणागुणीं दावी अनेक॥ १॥ आदि अंतीं गुण सर्वत्र निर्गुण। गुणासी अगुण भासतीना॥ ध्रु० ॥ कैसें जालें अरुपीं गुणीं गुणवृत्ती। सगुण पाहतां अंतरलें गती॥ २॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु नंदनंदनु। आदिअंतु एकु पूर्ण सनातनु गे माये॥ ३॥

३. मन मुरडोनि डोळां लेइलें। काळेपणें मिरवलें रूप त्याचें॥ १॥ बरवें रूप काळें अमोलिक। म्हणोनियां सांगतसे शुद्ध भावें॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु अगाध काळें। म्हणोनि सर्वत्र अर्पियलें॥ २॥

४. हरपली सत्ता मुराली वासना। सांवळाचि नयना दिसतसे॥ १॥ काय करूं माय सांवळा श्रीकृष्ण। सांगितला प्रश्न निवृत्तीनें॥ ध्रु० ॥ बापरखुमादेविवरु सांवळीये तेज। सेजबाज निज कृष्ण सुखें॥ २॥

५. नवल देखिलें कृष्णरूपीं बिंब। सांवळी स्वयंभ मूर्ति हरिची॥ १॥ मन निवालें बिंबलें समाधान जालें। कृष्णरूपें बोधलें मन माझें॥ ध्रु० ॥ बापरखुमादेविवरु सांवळा सर्व घटीं। चित्तें चैतन्या मिठी घालिताखेवों॥ २॥

६. सुंदर सुरेख वोतिलें। परब्रह्म तेज फांकलें। तें व्योमीं व्योम सामावलें। नयनीं वो माय॥ १॥ कमळनयन सुमन फांकलें। त्या परिमळा आथिलें। मकरंदीं वो माय॥ ध्रु० ॥ संकोचला संसार। पारुषला व्यवहार। ब्रह्मानंद अपार। जहाला वो माय॥ २॥ मधुर वेदवाणी। न पवे ज्याच्या गुणीं। तें ठकावलें निर्वाणीं। नेति मुखें वो माय॥ ३॥ यापरतें बोलणें। न बोलणें होणें। तें म्यां आपुल्या अंगवणें। केलें वो माय॥ ४॥ ऐसियाते वोटी। लागलें तयाचे पाठी। रखुमादेविवरा भेटी। विठ्ठलीं वो माय॥ ५॥

७. मूळ ना डाळ शाखा ना पल्लव। तो हा कैसा देव आला घरीं॥ १॥ निर्गुणपणें उभा सगुणपणें शोभा। जिवाशिवा प्रभा दाविताहे॥ ध्रु० ॥ नकळे याची गती नकळे याची लीळा। आपिआप सोहळा भोगीतसे॥ २॥ ज्ञानदेव म्हणे न कळे याची थोरी। आपण चराचरीं नांदतसे॥ ३॥

८. निळिये मंडळीं। निळवर्ण सांवळी। तेथें वेधलिसे बाळी। ध्यानरूपा॥ १॥ वेधु वेधला निळा। पाहे घननीळा। विरहणीं केवळा। रंग

रसनें ॥ ध्रु० ॥ नीळवर्ण अंभ। नीळवर्ण स्वयंभ। वेधें वेधु न लभे। वैकुंठींचा ॥ २ ॥ ज्ञानदेव निळी। हृदयीं सांवळी। प्रेमरसें कल्लोळीं। बुडी देत ॥ ३ ॥

९. नीळवर्ण रज। नीळवर्ण बुझे। निळिमा सहजे। आकारली ॥ १ ॥ नीळ प्रभा दिसे। नीळपणें वसे। निळिये आकाश। हरपलें॥ ध्रु० ॥ निळेपण ठेलें। निळिये गोंविलें। निळपण सोंविळें। आम्हां जालें॥ २ ॥ ज्ञानदेवी निळा। परब्रह्मीं गोविला। कृष्णमूर्ति सांवळा। हृदयीं वसे ॥ ३ ॥

१०. निळिये पेरणी। निळिये वाहाणी। गुणाचीं लेणीं। कृष्णवर्ण ॥ १ ॥ नवलाव गे माय। नवलाव चोज। निळीं निळिमा काज। आकारलें॥ ध्रु० ॥ नीळवर्ण तनु। नीळवर्ण गुणू। निळिमा पूर्णू। हृदयीं नांदे॥ २ ॥ ज्ञानदेवीं लीला। मननीं निवाला। निळिये अवलीळा। हरपला ॥ ३ ॥

११. जरासंदुमल्लमर्दनु तो। गजपित्राहटणु तो गे बाई ॥ १ ॥ कुब्जकपान तो। सुदाम्या अनुसंधान तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। कंसचाणूर-मर्दन तो गे बाई॥ २ ॥

१२. ब्रह्मादिका आठकु तो। शिवध्यान ध्यानकु तो गे बाई॥ १ ॥ गौरीजाप्यसहस्त्रनामीं तो। पुण्यपावन त्रैलोक्य तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। सहजपूर्ण तो गे बाई॥ २ ॥

१३. सर्वादि सर्वसाक्षी तो। विश्वंभर खल्विद तो गे बाई॥ १ ॥ आनंदा आनंद तो। प्रबोधा प्रबोध तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। विटेवरी उभा तो गे बाई॥ २ ॥

१४. श्रुतिस्मृतिवचन तो। गुह्यागुह्य तो गे बाई॥ १ ॥ जागता निजता तो। निज चेवविता तो तो गे बाई॥ ध्रु० ॥ परात्पर तो। रखुमादेविवरु तो गे बाई॥ २ ॥

१५. निजगुजा गूज तो। मोहना मोहन तो गे बाई॥ १ ॥ बोधा बोध बोधविता तो। द्वैता-द्वैत अद्वैत तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। सर्वादि सर्वेश्वरु तो गे बाई॥ २ ॥

१६. कांहीं नव्हे तो। अमूर्ता मूर्ति तो गे बाई॥ १ ॥ सहजा सहज तो। सहज सुखनिधान तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। पुंडलिकवरद तो गे बाई॥ २ ॥

१७. निज ब्रह्म ब्रह्म तो। ब्रह्मादिकां वंद्य तो गे बाई॥ १ ॥ अचिंतचिंतन तो। सारासार गुह्य तो गे बाई॥ ध्रु० ॥ बाप रखुमादेविवरु विठ्ठलु तो। जनीं वनीं कृपाळु तो गे बाई॥ २ ॥

१८. सारंगधरु तो। चक्रा आधारु हरि तो गे बाई॥ १ ॥ सुलभा सुलभु तो। आटकु नटके तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। द्वैताद्वैतातीत तो गे बाई॥ २ ॥

१९. विश्व भुलवी योगमाया तो। गोकुळीं रहिवासु तो गे बाई॥१॥ वसुदेवकुमरु तो। देवकीनंदनु तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। शुकादिकां चिंतन तो गे बाई॥ २ ॥

२०. पैल गोल्हाटमंडळ तो। त्रिकुटा वेगळा तो गे बाई॥ १ ॥ सहजबोधीं अनुभव तो। परम तत्त्वीं अनुराग तो गे बाई॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु तो। ब्रह्म विटेवरी तो गे बाई॥ २ ॥

२१. विज्ञानाचें ज्ञान अज्ञानीं घनवट। ज्ञानें अज्ञान नीट लाविलें दिसें॥ १ ॥ मी तूं हे मात हरपले दृष्टांत। हृदयीं हृदयस्थ निजतेजें॥ ध्रु० ॥ साकार निराकार शून्याशून्य दिठा। रूपीं रूपवाटा हरि माझा॥ २ ॥ बापरखुमादेविवरु हृदयस्थ घटीं। बिंबोनि उफराटी कळा दिसे॥ ३ ॥

२२. ज्ञानविज्ञान हरि। नांदे आमुच्या घरीं। बाह्यजु अभ्यंतरीं जाला देव॥ १ ॥ काय सांगूं माय। त्रिभुवन धाय। पाहातां न समाय। नाना रूपीं ॥ध्रु० ॥ चढत्या वाढत्या गोष्टी। प्रगट दिसे घटीं। नामरूपें वैकुंठीं। नेऊनि घाली रया॥ २ ॥ ज्ञानदेवा गोडी। हरिपदीं आवडी। प्रवृत्तीची थडी। उलंडिली ॥ ३ ॥

२३. सारसार दोन्ही। न दिसती नयनीं। अवचिता गगनीं। बिंबलासे॥ १ ॥ लोपले रविशशि। तेज न

माये आकाशीं। मेघःश्याम मेघाशीं। लपविलें॥ध्रु०॥ दिव्यरूप तेज। तीव्र ना तेजबीज। कुंडलि विराजे। लोपलें सूर्यो॥२॥ ज्ञानदेवा ध्यान। मनाचेंही मन। हरिचरण स्थान। दृढ केलें॥३॥

२४. स्वरूपीं पाहतां बिंबीं बिंब उमटे। तें मेघःश्याम दाटे बुंथि मनीं॥१॥ चित्त वित्त हरि जाला वो साजणी। अवचिता आंगणीं म्यां देखियला॥ध्रु०॥ सांवळा डोळसु चतुर्भुज रूपडें। दिसे चहूंकडे एक तत्त्व॥२॥ ज्ञानदेव म्हणे द्वैत निरसूनि बाही। एका रूपें बाही तरशील॥३॥

२५. सांवळेचें तेज सांवळें बिंबलें। प्रेम तें घातलें हृदयघटीं॥१॥ निरालंब बाज निरालंब तेज। चित्तरस निज निजतेजें॥ध्रु०॥ आदिमध्यंअत राहिला अनंत। न दिसे द्वैताद्वैत आम्हां रया॥२॥ ज्ञानदेवीं सोय अवघाचि सामाय। सुखदुःख माय आम्हां नाहीं॥३॥

२६. एकांति बाळा। कीं सोहंसुखशयन वेळा। पाहे चरणकमळा। सुंदराचे॥ तेथें अरुण उदेला। कीं सुमन प्रगटला। कमळणी जाला। अंतरीं विकासु॥ तें चरण कमळकेवळ। भक्त आळिउळ। सेविती सकळ। योगिजन॥ तेणें तृप्त जालें। कीं हृदय वोसंडलें। म्हणोनि वाहावलें। ज्ञानडोहीं॥ तेचि ते परमानंद गे माय॥१॥ न संगवे माय। परा पारुषली। दोंदिल दृष्टी जाली देखणेंपणें॥ मनाचा अंकुर उगीच मुराला। तो कृष्णचि होऊन ठेला। अनुभविया॥ध्रु०॥ तये पदांध्रीचे रज। तेणें तृप्ति वो सहज। वरि त्रिवेणी ऊर्ध्व व्रज। मज पाहतां॥ ते तंव रेखा। वरि सखोल देखा। त्यावरी वोळले पीयूषपाणी॥ तयेचेनि मागें। उद्धरणें जगें। म्हणोनि संतसंगें। तया सोई॥ ते दोहीं भागीं। विस्तारलें जगीं। म्हणोनि तया भागीं। चरणांगुष्ठ॥ दृष्टीचा डोळा। न निवडेच बाळा। तेथें जाला एकवेळा। मुनिजनां गे माये॥२॥ तेथें बिंबलीं नखें। कीं विवळणी विशेखें। काळेपणाचेनि द्वेषें। वाहावलीं पुढां॥ उगमींच संचले। कीं वियोगें वाहावले। पुनरपि जडले। कृष्णपदीं॥ गंगा अंगुष्ठधार। कीं वांकिचा बडिवार। तेथें सप्तही स्वर। उमटताती॥ स्वरूपीं रमली। म्हणोनि अधोमुख जाली। शोभती घाघुरली। पायीं प्रभावळी गे माये॥३॥ तंव ते निजानंद भरितें। नेणती आणिकांतें। विसरली आपणातें। हास्यवदनें॥ म्हणती नेति नेति गर्जना। कीं माणिका खेवणा। घोट्या अनुमाना। बाळसूर्यो। पोटरिया निवाळा। कीं उभलिया सरळा। जानुद्वय सोज्वळा। उच्चस्तंभ॥ उंच युगळ कटीं। माज सामावे मुष्टीं। सोहं समदृष्टी। दोहीं भांगीं गे माये॥४॥ वरि वेढिला पिंवळा। कीं मिरवे सोनसळा। कीं कल्पतरु फुलेला। नाभिस्थानीं॥ तेथें वेधु गोपिबाळा। कीं अंतरीं सांवळा। पालवी मेखळा। अभिळाखिया॥ तेथें मदनु गूढपणें। रतिशये रमणे। दुजे अनुभउ अनुभवणें। न निवडे केंही॥ सखोल नभमंडळ। तै ब्रह्मस्थान केवळ। कैसे पाहाले विवळ। तेथें जगामाजी गे माये॥५॥ रोमराजवेळा। कीं वेणी एकवळा। दावि निराळा। उदरामध्यें॥ हृदय निर्मळ। तेथें ध्येय ध्यान केवळ। वरि चरणकमळ। द्विजोत्तम॥ वैजयंति माळा। शोभतसे गळां। उभलेनि वक्षस्थळा। उभारली॥ सरळ बाहुदंड। न कळे कानवड। अंगोळिया धडफुड। खुणा दावितो गे माये॥६॥ ऐसा खुणा दावितसे एका। तंव दावी अनेका। अंगोळिया देखा। दशावतावरी॥ नखाची मंडणी। तेथें तेज तारांगणी। होत असे प्रवणी॥ त्रिमिर द्वैत॥ शुक्लपक्ष। कीं अंतरीं लक्ष। सारुनियां साक्ष। दृशादिसर्वीं॥ एकाएकीं संचरे कीं माजि घरीं दुसरे। स्वयें एकसरे। नवल चोज गे माये॥७॥ तेथ सानुसानु स्वर। दोहिलें अंबर। हास्यवदन सुंदर। पावया छंदें॥ निमासुरा नेटका। न कळे ब्रह्मादिका। वेधुनि गोपिका। मोहियलें जग॥ समदृष्टी नासापुटीं। नेत्रद्वय निघाले भेटी। रविशशि कोटी। लोपले तेथें॥ मना मारुनि मेळा। कीं कुंडलें शोभे किळा। तेथें जाला एकवळा। योगिजना गे माये॥८॥ व्योमींचा मणीं। तया तळीं सहस्त्रफणी।

तो लाधला निर्वाणी। आराधितां॥ शेष वर्णिता श्रमला। ह्मणोनि शरण आला। शयन होऊनि ठेला। तया तळीं॥ ऐसी सुमन सेजा। कीं मवाळपण बरविया वोजा। तेथें रातली रमा भाजा। न निवडे केंही॥ ऐसा झाला एकवळा। शेष म्हणे दैव आलें फळा। आतां पाहेल सुनीळा। कायें सेज माजी॥९॥ ऐसयाचें ध्यान। जरि हें न करी मन। तरीच पतन। जन्ममरण॥ चिंता साठीं फेडी। कीं उभारूनियां गुढी। स्वयें सुखाचिया आवडी। कां सांडितासी॥ आतां करूं पाहे ध्यान। तरि सहजेंचि उन्मन। म्हणोनि समाधान। होय जीवा॥ तीर्थ व्रत तप दान। जरी न करी हें मन। तरि सहजचि साधन। गोपिनाथु॥१०॥ तीर्था जातां सायासी। तूं काय एक देसि। म्हणोनि स्तविलासी। बहुतांपरी॥ तंव परापश्यंती मध्यमावैखरी। या युक्तिनो बोलवेसी॥ निवृति म्हणे लीळा। विश्वव्यापक निराळा। पाहे उघडा डोळां परब्रह्म॥ ज्ञानदेवा मीपणीं। निवृत्ति ऐक्य चरणीं। सरो दुजेपणीं। हांव जीवा॥११॥

२७. मनाचा भाव माझा खुंटला हरिध्यानें। अवघेंचि येणें मनें काळापिवन केलें॥१॥ लघु म्हणो तरी सूक्ष्महीं नव्हे। सूक्ष्म ह्मणो तरि अगाधही नव्हे॥ या काळियाची जाली गे माये॥ध्रु०॥ बाप रखुमादेविवरु सुनीळ नीळकाळा। अवघ्या सहित गोपाळा बुडी दिधली गे माये॥२॥

२८. नभ नभाचेनि सळें। क्षोभु वाहिजे कालिंदी जळें। सासिंनले जगाचे डोळे। तें रूप पाहावया। भलतैसी हांव। मना न पुरे तेथींची धांव। लावण्यसिंधु सिंव सांडूनि जातो गे माये॥१॥ सुलभ परमात्मा गे माये। मन मुरोनि देखणेपणा उरी। याचि कारणें उभा भिवरेतीरीं। अनुपम्य जयाची थोरी गे माये॥ध्रु०॥ कालिंदीजळाचा भोंवरा। कीं माजी वेढूनि इंदीवरा। माळ बांधोनियां मधुकरा। रोमांमाजी॥२॥ सकल सिद्धींचा मेळा। तेंवि विभूति शोभे भाळा। मुगुटीं रत्नकिळा। लिंग अनुपम्य गे माये॥३॥ क्षीरसागरींचें। निवांत सुख। असो हें निमासुरें मुख। श्रीयेचें मनोहर देख। टवकारलें दोंभागीं॥ पहावया ऊरूंचीं शोभा। सकळ देवाची प्रभा। तेथें तारांगणें कैंचीं नभा। लेइला गे माये॥४॥ कटावरी ठेवूनि हात। जनां दावी संकेत। भवजलाब्धीचा अंत। इतुलाची॥ सम चरणींच्या खुणा। उभा पंढरीचा राणा। तो आवडे जनांमना। दुर्लभ गे माये॥५॥ कैवल्याचा गाभा। कीं ब्रह्मविद्येचा वालभा। निकटपणाचिया लोभा। कैसा उभा असे॥ देवा पायींची वीट। तेचि माये नीट। वरि येऊनि भीमातट। वोळग दावी गे माये॥६॥ नेति नेतिचेनि बिरारें। उभऊनि श्रीकरारें। श्रृंगाराचेनि पडिभरें। चराचरें वोळगती॥ हा मेखळेचा मध्यमणी। उदो केला ग्रहगणीं। मध्य नायकु तरणी किरणीं। विरजितु गे माये॥७॥ आमुची हृदयींची श्रीमूर्ति। घेऊनि विठ्ठलवेषाची बुंथी। आतां चाळविसी किती। बापा पालटु नेघे॥ बाप रखुमादेविवरा विठ्ठला। त्वां मजशीं अबोला कां धरिला। जीवीं जीव आहे उरला। तो निघों पाहे॥८॥

२९. वेद प्रमाण करावया गोकुळासि आला। कीं नाटळिचा कुवांसा जाला। ब्रह्म आणि गोवळा। ब्रह्मादिका वंद्यु ऐसा निगमु। पैं लाजविला॥ गणिका स्वीकारि राहो मांडला। कीं दशरथ पतनीं चुकविला। एका तें म्हणे जागा। एका तें म्हणेरे निजा। तैं मुचूकुंदापें काळयवनु आणिला रया॥१॥ विरोचनसुत। बळी बांधोनि जेणें। निगड निबद्ध गजा सोडविलें। एकाचीं बालकें काळापासूनियां हिरे। एका बाळाचे बाप विदारिले। शिशुपाळा जैत देऊनियां शेखिं पाहेपां आपणचि जिंकीलें रया॥ध्रु०॥ गुरुदुर्वास याचिये भक्ति आणि त्याचियेचि रथीं देविरुक्मिणीसहित खांदु चालविला। तो तेणें मानें फुंदो पाहे तंव कोलतिया भेणें त्रैलोक्य हिंडविला। पैजा सारूनि हातीं सुदर्शन वसविलें कीं भीष्मपण। साचू केला। जितुकाचि कौरवा तितुकाचि पांडवां

अचोज हा अमुलारया॥२॥ जमदग्नी जनकाचा वोल भूमीं न पडावा। हाठावो वरि पितृभक्तीची आवडी। जेणें साचपणा कारणें माता वधिली। कीं पुराणें खोचिलीं तोंडीं॥ असुरदैत्य संहारितां बापु तयांची पातकें दवडी। प्रजासि रायाची आण रायासी कवण नेमु हे तों संततपणाची प्रौढी रया॥३॥ या परि चराचरींचे दानव गिंवसूनि पुसिले परोपरी। तंव यादवांसि अंबुलेपणची आस जाली थोरी। प्रभास क्षेत्रीं अवधियातें केली एकसरी। देवकी पुतना नोळखिजे। वैर भक्तीसी एकिची वोवरी। पवनु काय हा पंथु शोधूनियां चाले समर्थु करिल तें उजरि रया॥४॥ या गोविंदाची माव। हे तों ब्रह्मदिकांसि कुवाडें। तो हा मायेचेनि साचपणें न घेपवे। प्रकृतीचे गुण ते याचिये गांवीचे। तो करील तें अनुचित बरवें॥ लाघावियाचे भ्रमु लाघवीच जाणे यांसि कांही नवल नव्हे। बाप रखुमादेविवरु जाणीतला तरि उकलेल आघवें रया॥५॥

३०. निळें हें व्योम निळें हें सप्रेम। निळेपणें सम आकारलें॥१॥ नीळवर्ण ब्रह्म नीळवर्ण कर्म। नीळवर्ण आश्रम गुरु देखे॥ध्रु०॥ निळेपणें वर्तो नीळेपणें खातों। निळपण पाहातो निळे पणें॥२॥ ज्ञानदेव आला नीळवर्ण शाळा। निळे पण गोंवळा रातलीये॥३॥

३१. सांवळियाचें तेज सांवळा श्रीहरि। शेज बाज वोवरी ब्रह्मांडाची ॥१॥ गृहदारा दिनमणि तेज देऊनि मेदिनी। मेरू प्रदक्षणि आप होय॥ध्रु०॥ ऐसा हा सांवळा सतेज साजणी। म्यां आपुल्या आंगणी देखीयला॥२॥ ज्ञानदेवा साजण सांवळिये प्रभेचें। मी माझें मोहाचें हरिरूप॥३॥

३२. पैल सुखाचेनि माये सुकाळु। नवल पाहिजे हो गोपाळु। म्हणोनि योगयाग तप साधन। व्रत दान उद्यापन। पंचाग्नि गोरांजन अनुष्ठान। परि पद निर्वाण नकळे हें॥१॥ तुझ्या नामाचेनि आनंदें। गातांवातां जोडसी विनोदें रया॥ध्रु०॥ या गोंवळेनि जग। न दिसे जगपण भाग। पाहेपां सकळीं योग। तुझा तूंचि॥२॥ अर्थुनि पाहे दृष्टि। तंव तुझ्यापायीं पडे मिठी। आवडी नोसंडी गांठी। तुझिया पायाची॥३॥ आतां जरि निरुतें। तूंचि आत्मा तूंतें। सुखी सुखाचेनि निजप्राप्ति रया॥४॥ तुझें स्वरूप अदृश्य। तो मुनिमानसींचा प्रकाश। इंदु तूं पूर्णांश। चैतन्यघन॥५॥ बाप रखुमादेविवरा विठ्ठला पाहतां उघडा डोळा। दाविलें निधान रया॥६॥

३३. सुनीळ गगना पालटु। तैसा दिसे अंगीं नटु। कृष्णीं बाणलासे नीळवर्णु गे माये॥१॥ यमुनेच्या पाबळीं। तनु घेउनि सांवळि। पावा वनमाळी वाजतु आसे॥ध्रु०॥ पांवयाचेनि नादें। कृष्णाचेनि वेधें अमृतघनु वोळला। आकाश वोळुनि वर्षाव झाला ब्रह्मरसपूर आलारे॥२॥ कान्हा अति सुंदर वदनारविंद आळी सेविती अनिवाररे आयो॥३॥ चंदनादिटिळकुलल्लाटीं जया साजे मोर विसावेटी रेआयो। सुरतरु कुसुमें कबरीं भारुरे कुंडलें झळकति कपोळीं रे आयो॥४॥ बाप रखुमादेविवरु विठ्ठलुरे। त्रिभुवनजनमोहन रे आयो॥५॥

३४. लाउनि मनगणीची दोरी विपरीत तयाची कुसरी। अकळून न कळे श्रीहरी। अवघे वोडंबर तुझें॥१॥ अष्टदळकमळाची वोवरी। विपरीत तयाची कुसरी। एकविस खणांचे उपरी। बाहीजु कां हरी दाखविली॥ध्रु०॥ तेथ रात्र दिवस नेणिजे। सोहं प्रकाश सहजे। नाचविसी पंचभूतें वोजे। कवतुक तुझें तूं पाहसी॥२॥ भानु निसियेचा कुवासा। येक राहिले याचिये आशा॥ येक ह्मणति अढळ धुरु कैसा। तयाचा भरंवसा त्यासिं नाही॥३॥ ऐसीं तयाचीं बोलणीं। अंगीं राहिलीं खेळणीं। साही पावटणी करूनि। सातावरि घातु मांडिला॥४॥ करीं घेऊनि आळवणी। करू नेणें वोवाळणी। बाप रखुमादेविवरा विठ्ठला चरणीं। चौघी जणी निमालिया॥५॥

३५.त्रिभंगी देहुडा ठाण मांडुनिया माये। कल्पद्रुमातळीं वेणु वाजवित आहे॥१॥ गोविंदु वो माये गोपाळु वो। सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमनंदुवो॥ध्रु०॥ सांवळे सगुण सकळा जिवांचें जीवन। घनानंद मूर्ति पाहतां हारपलें मन॥२॥ शून्य स्थावर जंगम व्यापूनि राहिला अकळ। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु सकळ॥३॥

३६. तुरे कांबळा डांगेवरी विषाण वेणु घेऊनि करीं। वैजंयति रुळे कैशी वक्षस्थळावरी॥१॥ गोविंदु वो पैल गोपाळु माये। सुरतरु तळवटीं देखे कैसा उभा राहे॥ध्रु०॥ आडत्रिपुंड्र शोभत दूमिळ भारेंसि जे जात। नागर केशरिचीं पुष्पें कैसा खोप मिरवत॥२॥ हिरिया ऐशा दंतपंक्ति अधर पोंवळ वेली। श्रवणीं कुंडलें ब्रह्म रसाचीं वोतलीं॥३॥ विश्वाचें जीवन तें म्यां सार देखियलें। योगी ध्याती ध्यानीं ब्रह्म तेंचि गोकुळासि आलें॥४॥ आजि धन्य धन्य जालें राया कृष्णासि देखिलें। निवृत्तिमुनिरायप्रसादें ध्यान तें हृदयासि आलें॥५॥

३७. बरवा वो हरि बरवा वो। गोविंद गोपाळ गुण गरुवा वो॥१॥ सावळा वो हरि सावळा वो। मदनमोहन कान्हो गोवळा वो॥ध्रु०॥ पाहतां वो हरि पाहतां वो। ध्यान लागलें या चित्ता वो॥२॥ पढिये वो हरि पढिये वो। बाप रखुमादेविवरु घडिये वो॥३॥

३८.आतसिकुसुमकोशशामघनु। तुळशी-वृंदावनामाजी मुनीमनोपद्मदळविशाळजिरे आयो॥ध्रु०॥ जलधीशयन कमलालयाजीवनु। बापरखुमादेविवरु विठ्ठलु घनानंदमूर्ति॥१॥

३९. चतुरपणें चतुराननु पैं भागला। शिवुपणें शिवरूपु पैं जाहला॥१॥ हरिपणें हरि अंग रिघाला। या तिहींचा मेळा न दिसे गे माये॥ध्रुव॥ रखुमादेविवरु तिहीं गुणां वेगळा। शक्ति नव्हे दादुला गे माये॥२॥

४०. तुज सगुण म्हणों कीं निर्गुणरे। सगुण निर्गुण एकु गोविंदुरे॥१॥ अनुमाने ना अनुमाने ना। श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे॥ध्रु०॥ तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे। स्थूलसूक्ष्म एक गोविंदुरे॥२॥ तुज आकार म्हाणों की निराकररे। साकारु निरुकारु एकु गोविंदुरे॥३॥ तुज दृश्य म्हणों कीं अदृश्यरे। दृश्यअदृश्य एकु गोविंदुरे॥४॥ निवृत्तिप्रसाद ज्ञानदेव बोले। बाप रखुमादेविवरु विठ्ठलुरे॥५॥

४१. चंचळ चांदिणें सोमविणें भासलें। तेज निमालें रविबिंबेंविणें॥१॥ जगत्रजीवनु ह्मणे जगासी कारण। तें अणुप्रमाण तेथे दिसे॥२॥ बापरखुमा-देविवरु अणुप्रमाण भासला। सगुण निर्गुण जाला बाईये वो॥३॥

४२. दोन्ही बाहीं संतांची सभा। सिंहासनी उभा श्रीविठ्ठल॥१॥ गाती नारद तुंबर प्रेमें। हरीचें नाम गर्जती॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु उभा। त्रैलोक्याची शोभा शोभतसे॥२॥

४३. ऐसा अवतार नरहरिस्तंभामाझारी। भक्तांपरोपरी धरी रूपें॥१॥ धरुनिया महीत्व झाला नृसिंहरूप। वेदशास्त्रांसी अमूर्त मूर्तीस आला॥२॥ बापरखुमादेविवरु नरहरी अवतारु। वर्ण सारङ्गधरु निजरूप॥३॥

४४. स्वर्ग जयाची साळोंखा। समुद्र पाळी पिंड देखा। शेषासरिखी बैसका। जो आधार तिही लोकीं॥१॥ लिंग देखिलें देखिलें। त्रिभुवनीं विस्तारलें॥२॥ मेघधारीं तपन केलें। तारापुष्पीं वरी पूजिलें। चंद्रफळ ज्या वाहिलें। वोवाळिलें रविदीपें॥३॥ आत्मनैवेद्य समर्पिलें। ब्रह्मानंद मग वंदिलें। ज्योतिर्लिंग मग ध्याईलें। ज्ञानदेवीं हृदयीं॥४॥

४५. देव आहे जैसा तैसा नेणवे सहसा। भांबावला कैसा विश्वजनु॥ तया रूप ना रेखा लय ना लक्षण। ते प्रतिमें आणून वासना रूपें॥१॥ देखा सर्वगत निराळा अद्वैत। तया मूर्तिमंत ध्याय जनु॥ तिहीं देवासि आरु जेथुनि विस्तारु। तो ध्वनि ओंकारु त्या आरु। आतां तो नाद ना बिंदु काळा ना छंदु। अक्षय परमानंदु सदोदितु॥२॥ अवतरे तैसाच नव्हे होय तें न संभवे। आहे तें आघवें

लाघव रया ॥ तो येकट एकला रचला न वेचला। आदिअंतीं संचला अनंतपणें ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश। हीं सकळही हारपती प्रळयांती ॥ तो निरशून्य निरुपम निरंजन निर्वाण। ते दशा पाषाण केंवि पावती ॥ ३ ॥ पाहातां या डोळां परि न दिसे कांहीं केल्या। व्यापुनियां ठेला बाहिजु भीतरि ॥ तो पदपिंडा अतीतु भवभावरहितु। बापरखुमादेविवर विठ्ठलु हृदयांतु रया ॥ ४ ॥

४६. मन मारुनि डोळां लेईलें। काळेपणें मिरवलें रूप त्यांचें ॥ १ ॥ बरवें हें रूप काळें अमोलिक। म्हणोनि सांग जें शुद्धभावें ॥ २ ॥ रखुमादेविवरु अगाध काळें रूप। म्हणोनि सर्वत्र व्योम व्यापियेलें ॥ ३ ॥

४७. काळेपणाचा आवो अंबरीं बाणला। तो एकु दादुला देखिला डोळां ॥ १ ॥ काळें मनुष्य मानव जालें। अरूप रूपा आलें गोविंदपणें ॥ ध्रु० ॥ रखुमादेविवरु विठ्ठलु सोहंधरु। त्यानें माझा वेव्हारु बहु काळें नेलागे माये ॥ २ ॥

४८. ज्याचें गुणनाम आठवितां मनचि नाहीं होय। अनुभवाचे पाय पुढें चालती ॥ १ ॥ निर्गुणगे माय गुणवंत जाला। प्रतिबिंबीं बिंबतसे चैतन्याचें मुसे। प्रति ठसावत तें वृंदावनीं ब्रह्म असेगे माये ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु डोळसु सावळा। द्वैत अद्वैत सोहळा भोगविगे माये ॥ ३ ॥

४९. निळिये रजनी वाहे मोतिया सारणी। निळेपणें खाणीं सांपडली ॥ १ ॥ आंगणीं चिंतामणि जळधरु सिंपणी। अमृतसाजणी जीवनकळा ॥ २ ॥ सुमनाचे शेजे विरहिणी विराजे। शयनीं सुलजे आरळ सेज ॥ ३ ॥ माजयानें हटीं मुखकमळ टेंकी। निळिये अवलोकी कृष्णमूर्ति ॥ ४ ॥ कमळणी आमोद सुस्वाद मकरंद। चंदनाची अभेद उटी अंगीं ॥ ५ ॥ कर्पूरपरिमळें दिव्य खाद्य फळें। ठेऊनि सोज्वळें वाट पाहे ॥ ६ ॥ मन तो निळिये गोविंदाचिये सोसे। विरहिणी पाहे वाटुलि ऐसी ॥ ७ ॥ ज्ञानदेवी निळिये वाटुली गोविंदीं। कृष्ण निळिये पदीं ठाव जाला ॥ ८ ॥

५०. राम बरवा कृष्ण बरवा। सुंदर बरवा बाइयांनो ॥ १ ॥ केशव बरवा माधव बरवा। गोपाळ बरवा बाइयांनों ॥ २ ॥ बाप रखुमादेविवरु त्रिभुवनीं गरुवा। विठ्ठलु बरवा बाइयांनो ॥ ३ ॥

५१. साती बारी दोन्ही आपणचि होऊनि। सुरतरु माझारी वोळगे ॥ तळीं त्रिभंगी मांडूनि ठाण घेऊनि मेघाचें मान। विजु एकी वेढुन बरवे गर्जतुगे माये ॥ १ ॥ नवलावोगे माये न्याहाळितां कैसे मनाचे नयन उमलताती ॥ तीही एक दृष्टि जिव्हा लाभती तरी। सुलभु देखतां बोलतीगे माये ॥ ध्रु० ॥ पाहो याचे पाय। शंभूचिया माथां माये। सासिन्नली चंद्रदाहें गंगेतें ॥ तेथ असुराची शिरें। येथे सकळ शरीरें। तोडराचेनि बडिवारें। बरीजतुगे माये ॥ २ ॥ तेज सांवळें। रूप लाधलें परिमळें। अनंगाचेनि सळें। कासीं कासियेला ॥ तो पालउ पांढर गळे। होतुकां जगाचे डोळे। दुरूनियां सुनिळें। रोविलेंगे माये ॥ ३ ॥ उपनिषदाचा गाभा। माजी सौंदर्याची शोभा। मांडिला दोखांबा। तैसा दिसे देखा ॥ वेगळालिया कुंभस्थळा। परि हातु सरळा। पालटु बांधला माळा। मेखळा मिसेंगे माये ॥ ४ ॥ भलतेउते वाहे न वाहे नदी। जेंवीं स्थिरावे अगाधीं। तैसी पुंजालता हे मंदी। दोही वेदांची ॥ वरिलिया वक्षस्थळा। नुपुरे स्थानीचा डोळा। मागून निघे कमळा। नव्हे रोमराजी ॥ ५ ॥ लावण्य उदधी वेळा। तेंचि पै वैजयंती माळा। वरी शोभतसे सोहळा। साहकारवेचा ॥ म्हणे प्रेम पुष्कळा। थडिये लाभे सकळा। नयनसुखाच्या सुकाळा। जग मेळवितुगे माये ॥ ६ ॥ भोंवतीं तारागणें पुंजु। मांजी अचळ सुरिजु। आला वक्षस्थळा उजु। तैसा दिसे देखा ॥ जेवणे न अंगें। उभऊनि श्रीकरायोगें। योगनादातटी रंगे। नभु दुमदुमितवो माये ॥ ७ ॥ इंद्रधनुष्य काढिलें। तया तळीं बहुडलें। तेचि कुरुळीं वेढिलें। समाधिसुख देखा ॥ आवारीचा गुणु। श्रुतीगर्भी समवर्णु। दोहीं स्वरीं

गोडी वेणु। जग निववीतुवो माये॥८॥ या वेधितां कांहींच नुरे। रूपा आले हेंचि खरें। वरी दाविता हे माजिरें। गोपवेशाचें॥ तमावरी हातियारे। रविकाज काईयेरे। तैसा रखुमादेविवरें। विरें घेतलेंगे माये॥९॥

५२. मदनमूर्तिं विश्वीं अळंकारिली। ते डोळ्यां असुमाय जाली। पाहतां मनाची वृत्ति नुपुरे तेथिची सोय। तेथें भरोनि वोसंडिली गे माये॥१॥ अभिनव रूप कैसें मना अगोचर अरूप रूपासि आलें। तें हें कल्पद्रुमातळीं ठाण मांडूनि देहुडें। तेणें आनंदघनें निवविलेंगे माये॥ध्रु०॥ चिदानंदाची मांदुस किंचिद्घन चिदाकाश। तेजः पुंज प्रकाश चरणीं शोभा॥ निडारलें दृष्टि पाहतां रूपाचा एकवळा। कैसा साकारे सोहळा भोगीतसे गे माये॥२॥ सकळ तीर्थ अर्तिलीं। तीं ऋषिवृंदें घेऊनि बैसलीं। पावन झालीं। चरणांगुष्ठीं॥ वाकी तोडरु गजरीं। गर्जतुसे नानापरी तो श्रुतिनादु अंबरीं। सांठवलागे माये॥३॥ उपनिषदाचा गाभा। परी देहुडा पाउलीं उभा। जानुजघनींच्या प्रभा। नभ धवळलें॥ सुरंग सोनसळा। वरी वेढिला पिंवळा। त्यावरी गाठियला मेखळा। रत्नखचितगे माये॥४॥ हा जगडंबरु जगदाभासु। कीं ठसावला आभासु। नाभिकमळीं प्रकाशु। चतुरानना॥ पाहता तेथींची हाव। मना न पुरे तेथींची थाव। म्हणउनि सगुण ध्यान। करी तुझेगे माये॥५॥ ब्रह्मांडाचिया कोडी। रोमरंध्रीं उतरंडी। मदन सांडुनिया प्रौढी। उदरा आला॥ सुघटित वक्षस्थळ। निरोपम केवळ। वरी पदयुगुळ। द्विजोत्तमगे माये॥६॥ चहूं पुरुषार्थांचें साधन। तोचि आयुधें मंडन। बाहीं बाहुवटे मंडन। मंडना आलें॥ वीर कंकण मनगटीं। कांडोवांडीं मुद्रा दाटी। कैसा अलोहित नखें बोटीं। वेणु वाहे वो माये॥७॥ ब्रह्म ऐसें धेनु आतला। कीं सुधारसु मुराला। तोचि नादु सुस्वर आला। पावया छंदें॥ अधरीचें अमृत। पिकलेंसे ब्रह्मरस। तेणें जाला सौरसु। गोपिजनागे माये॥८॥ नयनींचे तारे। दो पक्षीं प्रेम पुरे। द्वैताद्वैत एकसरें। ठकलें ठेलें॥ कुंडलाचिये दीप्ती। लोपला गभस्ती। सुखस्वरूपाची शांति। येणे सुखेंगे माये॥९॥ आतां पाहतां पाहतया दृष्टी नपुरे। ध्यातां मनचि नुरे। आंत बाहेरी पुरे। व्यपूनि ठेला॥ मावळलिया दृष्टि पाहातां देखणें ठसावलें। निर्गुण गुणासि आलें। सदोदित गे माये॥१०॥ आतां हा केंवि पाहावा। पाहातयेचि दृष्टि। मन मनेंचि दिधली मिठी। तेथील ते गोडी रूपासी आली॥ म्हणती निवृत्ति। ज्ञानदेवा पाहे चित्तीं। आतां जागृतीच्या अंती। सुखशातिं रया॥११॥

## पंढरीमाहात्म्य.

५३. आनंदाच्या ताटीं अमृताची वाटी। विवेकतारूं घोटी रसनाबळें॥१॥ तें हें रूपडें रूपस विठ्ठल। पुंडलिकें बहु साल प्रार्थियलें॥ध्रु०॥ तारावया जन व्हावया पावन। जड मूढ अज्ञान हरीपाठें॥२॥ कर्म धर्म करितां शिणली येतां जातां। मग पुंडलिकें अनंता प्रर्थियलें॥३॥ येउनिया श्रीहरी भीमेच्या तीरीं। सुदर्शनावरी पंढरी उभाविली॥४॥ अमरतरुवर तीर्थ सरोवर। वेणुनादीं श्रीधर खेळताती॥५॥ बागडे गाती हरि वाकुल्या कुसरी। तेथें पुंडलिक परोपरी स्तवन करी॥६॥ धन्य पंढरीनगरी फावली चराचरीं। धन्य जो भूमीवरी दृष्टीभरी हरी देखे॥७॥ ज्ञानदेवा बीज विठ्ठल केशीराज। नव्हे ते नवल चोज प्रत्यक्ष हरी॥८॥

५४. अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तिन्हीं लोक॥१॥ जाईन गे माय तया पंढरपुरा। भेटेन माहेरा आपुलिया॥२॥ सर्व सुकृताचें फळ मी लाहीन। क्षेम मीं देईन पांडुरंगीं॥३॥ बापुरखुमादेवीवरु विठ्ठलेंसी भेटी। आपुले संवसाटी करूनि ठेला॥४॥

५६. न चलति शब्द खुंटले पै वाद। एक तत्त्व भेद नाहीं रूपा॥१॥ तें रूप पंढरीं भरलें चराचरीं। माझा माजी घरीं बिंबलेंसे॥२॥ रखुमादेविवरु पुंडलीकवरु। निळियेचा आगरु पंढरीये॥ ३॥

५७. दुजें द्वैत सांडी एक तत्व मांडी। अद्वैत ब्रह्मांडीं पै सुकीजे॥ १॥ तें रूप पंढरी पुंडलीका द्वारीं। मुक्ति मार्ग चारी वश्य रया। अनंतीं अनंत वोतलें संचीत। वैकुंठ अद्‌भुत उभें असे॥ २॥ ज्ञानदेवीं ध्यान मन मौन चरण। आपणची मग्न तेथें जाले॥ ३॥

५८. तत्वें तत्व धरी कोहंभाव होकारी। सोहं सोहं करी कोण सये॥ १॥ सोकरी पुंडलिकु ज्ञान पुण्यश्लोकु। विठ्ठलु त्रैलोकु उद्धरिले॥ २॥ सखी जाय तेथें भाव बळिवंत। प्रपंच देहांत नाहीं तुज॥ ३॥ ज्ञानदेव पुसे निवृत्ति सौरसें। पुंडलिकें कैसें पुण्य केलें॥ ४॥

५९. एकी म्हणे भाव धरूं नेदी मौन। तेथींचे वो ज्ञान मज सांगे॥ १॥ एकीनें सांगितलें दुजीनें परिसलें। प्रपंचा पुसलें तेणें रूपें॥ २॥ तें घरटीं कडी सोकरी बागडी। सोहं कथा उघडी पंढ-रीये॥ ३॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीस मनें। नयनांसी पारणें देखतांची॥ ४॥

६०. पंढरीचे वाटे अनंत घडती याग। वैकुंठींचा मार्ग तेणें संगें॥ १॥ जपतप अनुष्ठान क्रिया कर्म धर्म। हें जाणताती वर्म संतजन॥ २॥ भक्तिमार्ग फुकटा आनंदाची पव्हे। लागलीसे सवे पुंडलीका॥ ३॥ दिंडी टाळ घोळ गरुडटकियाचे भार। वैष्णवांचे गजर जये नगरीं॥ ४॥ तिहीं लोकीं दुर्लभ अमर नेणती। होउनी पुढती सेविती॥ ५॥ सनकादिक मुनी ध्यानस्त पै सदा। ब्रह्मादिकां कदा न कळे महिमा॥ ६॥ ज्ञानदेव निवृत्ती पुसतसें कोडें। पुंडलिकें केवढें भाग्य केलें॥ ७॥

६१. माझे जिवींची आवडी। पंढरपुरा नेईन गुढी॥ १॥ पांडुरंगीं मन रंगलें। गोविंदाचे गुणीं वेधलें॥ २॥ जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे। पाहतां रूप आनंदीं आनंद साठवे॥ ३॥ बापरखुमादेविवर सगुण निर्गुण। रूप विटेवरी दाविली खुण॥ ४॥

६२. कल्पना वृक्षासी देखिलें। चिंतामणीस चिंतिलें। कामधेनुसी आपेक्षिलें। जीण्या जिवविलें तेंचि हरिरूप पंढरिये॥ १॥ धन्य कुळ धन्य जन्म। जयासि पंढरीचा नेम। चित्तीं अखंड विठ्ठल प्रेम। ते धन्य भक्त भूमंडळीं॥ ध्रु०॥ तोचि तीर्थरूप सदा। तया दोष न बाधिती कदां। जो रातला परमानंदा। तेथें सर्व सिद्धी वोळंगती॥ २॥ ऐशीं वेदशास्त्रीं पुराणीं। जो रातला नामस्मरणीं। धन्य तया तीर्थ पर्वणी। धन्य वाणी तयाची॥ ३॥ पंढरीसी कीर्तन करी। पुंडलिकासी नमस्कारी। विठ्ठल चरण अंतरीं धरी। धन्य जन्म तयाचा॥ ४॥ सकळ कुळाचा तारकु। तोचि जाणावा पुण्यश्लोकु। पांडुरंगीं रंगला निशंकु। धन्य जन्म तयाचा॥ ५॥ त्यासी अंतीं वैकुंठप्राप्ती। ऐसें शुकें सांगितलें परीक्षिती। जे जे हरिचरणीं भजती। ते ते पावती वैकुंठ॥ ६॥ मानें स्फुंदत नाचत रंगणीं। प्रेम विठ्ठल चरणीं। सर्व सुख खाणी। बाप रखुमादेवीवर विठ्ठल॥ ७॥

६३. वाजतसे बोंब कोण्ही नायकती कानीं। हरि हरि न म्हणती तयांसी थोर जाली हानी॥ १॥ उठा उठा जागा पाठीं भय आलें मोठें। पंढरिवांचुनी दुजा ठाव नाहीं कोठें॥ ध्रु०॥ तापत्रयाग्नीचा लागला वोणवा। कवण रिघे आड कवण करी सावाधावा॥ २॥ देखोनि ऐकोनि एक बहिर अंध जाले। विषयाचे लंपट बांधोनि यमपुरीस नेले॥ ३॥ आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला। देखत देखत नातु पणतु तोही वेडा जाला॥ ४॥ व्याघ्र लासी भूतें हीं लागताती पाठीं। हरिभजन न करितां सगळें घालूं पाहे पोटीं॥ ५॥ संतसंग धरा तुम्ही हरिभजन करा। पाठीं लागलासे काळ दांत खातो करकरां॥ ६॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला शरण। भावे न निघतां न चुके जन्ममरण॥ ७॥

६४. हें नव्हे आजिकालिचें। युगां अठ्ठाविसांचें। मज निर्धारितां साचें। हा मृत्युलोकुचि नव्हे॥ हाचि मानिरे निर्द्धारु। येर सांडिरे विचारु। जरी तूं पाहासि परात्परु। तरि तूं जारे पंढरिये॥ १॥ बाप

तीर्थ पंढरी। भूवैकुंठ महीवरी। भक्त पुंडलिकाचे द्वारीं। कर कटावरी राहिला ॥ध्रु०॥ काशी अयोध्या आवंति कांति। मथुरा माया गोमती। ऐशीं तीर्थे इत्यादि आहेति। परि सरी न पवती पांडुरंगी ॥२॥ हाचि मानिपारे विश्वासु। येर सांडिरे हव्यासु। जरि तूं पाहासि वैकुंठवासु। तरि तूं जाये पंढरिये ॥३॥ आड वाहे भीमा। तारावया देह आत्मा। पैल थडीय परमात्मा। मध्य राहिला पुंडलिकु ॥४॥ या तिहींचें दरुशन। प्राण्या नाहीं जन्ममरण। पुनरपि आगमन येथें बोलिलेंचि नाहीं ॥५॥ पंढरपुरी म्हणिजे भूवैकुंठ। ब्रह्म तंव उभेचि दिसताहे नीट। या हरिदासासी वाळुवंट। जागरणासी दीधलें। म्हणोनि करा करारे क्षीरापति। नटा नटा कीर्तनवृत्ती। ते नर मोक्षातें पावती। ऐसें बोलती सुरनर ॥६॥ हें चोविसा मूर्तीचें उद्धरण। शिवसहस्त्रनामासी गहन। हेंचि हरिहराचें चिंतन। विश्ववंद्य हे मूर्तितें। तो हा देवादि देव बरवा। पाडुरंग सदाशिवाचा निज ठेवा। बापरखुमादेवीवरु पंचविसावा। चोविसा मूर्ति वेगळा ॥७॥

६५. पातेजोनि खेंवासि आणिलें। येणें आपणिया समान मज केलें गे माये ॥१॥ पाहेपां नवल कैसें बितलें। मन उन्मनीं उन्मन ग्रासिलें ॥२॥ पाहेपां येणें रखुमादेविवरा विठ्ठले। पाहेपां राहणें पढंरपुरीं केलें ॥३॥

६६. जें येथें होतें तें तेथें नाहीं। ठाईंच्या ठाईं हरपलें ॥१॥ घरींच्या घरीं जाली चोरी। आपणावरी आळु आला ॥२॥ पंढरपुरीं प्रसिद्ध जाणा। पुरविल्या खुणा ज्ञानदेवा ॥३॥

६७. क्षीर सागरीचें निजरूपडें। पाहतां पारखिया त्रिभुवनीं न संपडे। तें उभें आहे वाडें कोडें। पुंडलिकाचे आवडी ॥१॥ मेघश्याम घेउनियां बुंथी। जयातें श्रुती पैं वानिती। कीं तें पुराणांसी वाडे। तें पंढरिये उभें असें कानडे गे माये ॥२॥ आवडीच्या वालभें गोजवलें गोजिरें। पाहातां साजिरें त्रिभुवनाएक गे माये ॥३॥ तें सकळ मंगळदायकाचें प्रेम आथिलें। कीं ब्रह्मरसाचें वोतिलें घोसुलें। ब्रह्मविद्येचें सार मथिलें। देखा सकळ आगमींचें संचलें। की बापरखुमादेविवर विठ्ठल नामें मढिलें। श्रीगुरु निवृत्तीनें दिधलें। प्रेमखुण रया ॥४॥

६८. जयातें पाहतां परतला आगमु। निर्गमा नाकळे दुर्गमु। सिद्धांसाधक निरुतें वर्मु। न पडे ठायीं सर्वथा ॥१॥ तें या पुंडलिका वोळलें। प्रेम प्रीतीनें घोळलें। भक्तिमातेनें चाळविलें। आधीन केले आपणया ॥ध्रु०॥ जे माये अविद्ये वेगळें। गुणत्रया नातळे। काळें गोरें न सांवळें। निर्धारितां नेणवे ॥२॥ जें द्वैताहूनि परतें। तें सुखातें वाढवितें। योगी लक्षीं लक्षित ज्यातें। परि नेणवे सर्वथा ॥३॥ जें अरूपा रूपा वेगळे। सहस्त्रनामांहूनि आगळें। परम कृपेचें कोंवळे। क्रियाकर्मविरहित ॥४॥ जें ब्रह्मरसाचें गोठलें। तें पंढरिये प्रगटलें। बापुरखुमादेविवर विठ्ठलें। नामें आथिलें चोखडें रया ॥५॥

६९. नेणो विठो मार्ग चुकला। उघडा पंढरपुरा आला। भक्तें पुडलिकें देखिला। उभा केला विटेवरी ॥१॥ तो हा विठोबा निधान। ज्याचें ब्रह्मादिकां ध्यान। पाउलें समान। विटेवरी शोभती ॥२॥ रूप पाहतां तरी डोळसु। सुंदर पाहतां गोपवेषु। महिमा वर्णितां महेशु। जेणें मस्तकीं वंदिला ॥३॥ भक्तिसुखें लांचावला। जाऊं नेदी उभा केला। निवृत्तिदास म्हणे विठ्ठला। जन्मोजन्मीं न विसंबे ॥४॥

७०. त्रिपुटीं भेदूनी मनाच्या मौळी। तें आलें भूमंडळीं पंढरिये ॥१॥ नाम लाधलें नाम लाधलें पुंडलिकें केलें खेवणें देखा ॥२॥ समर्था पाथीं भोजन जालें। पंचामृत घेतलें धणीवरी ॥३॥ बाप रखुमादेविवरु विठ्ठलेसी तृप्ती। यथार्थ भावितां कळों येईल चित्तीं ॥४॥

७१. आकानिकेलेचिकनामातु। कारले धसिगे मरुळादने ॥१॥ चलुवाने चलुवने पंढरीराया चलुवाने। यह्ले दौनर्कवाने ॥२॥ पुंडलिकने भक्ती

बंदा। रखुमादेविवर विठ्ठलुने॥३॥

७२. जोडुनिया जोडी जेणें हुंडारिली दुरी। भिकेची आवडी तया नावडे पंढरी॥१॥ करंटे कपाळ ज्याचें नाम नये वाचे॥ सदैव सभाग्य तोचि हरीरंगीं नाचे॥ध्रु०॥ आपण न करीं यात्रा दुजियासि जावो नेदि। विषयाचा लंपट शिकवी कुविद्या कुबुद्धी॥२॥ ऐसें जन्मोनि नर भोगिती अघोर। न करिति तीर्थयात्रा तया नरकीं बिढारे॥३॥ पुंडिलकें भक्तेरे तारिले विश्वजना। वैकुंठीची मूर्ति आणिली पंढरपुर पाटणा॥४॥ कायावाचामनें जिवें सर्वस्वें उदार। बापरखुमादेविवरा विठ्ठलाचा वारिकर॥५॥

७३.शरीर हें स्थळ मळानिर्मळाचें मूळ। पाहोनि चोखाळ आदिपुरुषासी। जन्म मरणाचिया उचलुनि पेडी। मग तया बिंबडीं ज्ञान पिके॥१॥ पंढरिचें पिक नसमाये अंबरीं। तें शेत सोकरी पुंडलिक॥ध्रु०॥ ऐहिक परत्र दोन्ही शेताचीं आउतें। मुंड मुंड तेथें कुळवाडिये। उचलुनि पेंडी कासिया समुळीं। मग पुण्यकाळीं वोलवले॥२॥ गरुडटके दोन्ही शेताची बुझवणी। दस कुडपणी नामघोष। एकवीस स्वर्गाचा घालुनिया माळा। मग तया गोपाळामजीं खेळे॥३॥ जये शेतीं निवृत्ती भीतरे तये शेतीं साजे पुरे। राउळीं निदसुरे दंडीजती॥ रात्रंदिवस तुम्हीं हरिचरणीं जागा। तेणें तरालगा भवसागरू॥४॥ अठाराही बलौतें तें केलें धडौतें। खळें दान देतें सनकादिका। ज्ञानदेव म्हणे जगदानीं पिकला। पुरोनि उरला पंढरिये॥५॥

७४. आनु नेणें कांहीं। विठ्ठलु स्मरें देहभावीं॥१॥ पुंडलिका हें चिंतन। म्हणोनि विटेवरि हें ब्रह्म॥२॥ रखुमादेविवरु शहाणे। विठ्ठलु पाहुणे पुंडलीका॥३॥

७५. तळवे तळवटीं असे। विटें फावलें अनयासें॥१॥ आम्हां न संडवे पंढरी। विठ्ठलराज विटेवरी॥ध्रु०॥ जानु जघन बरवे दिसे। ते देखोनि मन उल्हासे॥२॥ पदकमळ जोडिलें। तेथें मुनिजन रंगलें॥३॥ कासे कसिला पितांबरु। चरणीं ब्रिदाचा तोडरु॥४॥ नाभीकमळीं जन्म असे। ब्रह्मादिकां अपैसे॥५॥ हस्तकडगे बाहुवटे। विठोबा शृंगार गोमटें॥६॥ अंगीं चंदनाची उटी। ते देखोनि मन संतुष्टी॥७॥ गळा वैजयंती माळा। मणीमंडित वक्षस्थळा॥८॥ कानीं कुंडलें झळाळा। श्रीमुख दिसतें वेल्हाळा॥९॥ वदन सकुमार गोजिरें। जैसे पोवळिवेल साजिरे॥१०॥ दंतपंक्ति झळाळ। जैसी माणिकाची किळ॥११॥ नाशिक मनोहर दिसे। जैसें वोतिलेंसे मुसें॥१२॥ लोचन बरवें विशाळ। श्रवणीं कुंडलें झळाळ॥१३॥ टिळक रेखिला मृगनाभीचा। बाप राजा मन्मथाचा॥१४॥ माथां मुगुट झळाळित। बाप पुंडलिका न्याहाळित॥१५॥ निवृत्तिदास शरणांगत। विठ्ठला चरणींचे आरत॥१६॥

७६. जन्मोजन्मींच्या सायासीं। विठ्ठल लाधला पुंडलिकासी॥१॥ पूर्वी पुण्य केलें वो माये। विटे लाधले या विठोबाचे पाये॥२४॥ रखुमादेविवरु आहे। तया तीर्था केधवां जाती पाय॥६॥

७७. विवेक नदीये बैसोनि। सांगड सत्वाची बांधोनी॥१॥ एक पंढरी वैकुंठ। येर वाउगे बोभाट॥२॥ चारी वेद विवादती। पुराणें साक्ष देती॥३॥ बोले निवृत्तीचा दास। संत गर्जती पापा नाश॥४॥

७८. वाराणशी यात्रे जाईन। प्रयाग तीर्थ पाहीन। त्रिवेणिये स्नान करीन। परि मी वीट नव्हेन॥१॥ विठोबा पाईची वीट। मी कईबा होईन॥ध्रु०॥ गोदावरी यात्रे जाईन। बारा वरुषाचें फळ लाहीन। अब्जकतीर्थी स्नान करीन। परि मी वीट नव्हेन॥२॥ मल्लिकार्जुन यात्रे जाईन। श्रीशैल्यशिखर पाहीन। पाताळगंगें स्नान करीन। परि मी वीट नव्हेन॥३॥ मातापुर यात्रे जाईन। सह्याद्री पर्वत पाहीन। गहनगंगें स्नान करीन। परी मी वीट नव्हेन॥४॥ कोल्हापुरीं यात्रे जाईन। महालक्ष्मी पाहीन। विशाळतीर्थी स्नान

करीन। परि मी वीट नव्हेन॥५॥ एका अंगुष्ठीं तप करीन। पृथ्वीपात्रचि लाहीन। देह कर्वतीं देईन। परि मी वीट नव्हेन॥६॥ बहुता पुण्यांच्या सायासीं। चरण जोडले विटेसी। निवृत्ति दासु म्हणे परियेसी॥ परी मी वीट नव्हेन॥७॥

## रूपकें

### बाळक्रीडा

अभंग ७९. भवाब्धिसागरीं मांडिली टिपरी परि अनुहातें वाजे गजरू वो॥ ताळक छंदें उमटती पदें वरि टिपरें टिपरीं गाजेवो॥१॥ टिपरिया घाईं गोपाळ भाई॥ घुळुघुळुपाईं नादु वाजे वो॥२॥ ताळकछंदें वेगुआल्हादें टिपरीनादें वाजती वो॥ सांडुनि अहं धरिलें सोहं तयासि टिपरी साधली वो॥३॥ औटहात भूमिका नीट तालछंदें टिपरी धरी वो॥ विरुळा जाणे एथींचे खुणे टिपरे वाजे शिरीं वो॥४॥ एकटसंगें टिपरें वेगें ध्वनि गगनीं गाजे वो॥ बाप रखुमादेविवर टिपरीवो गाजती घाई जाली टिपरियाजोगी॥५॥

८०. जटिल धुळधुसिर दोंदिल डोळसु अंगणीं बाळचंद्र खेळतां दिसे॥तें देखोनियां यशोदा माया पसरोनिया बाह्या॥ तें क्षेम सांगावया वाचा कैंची॥१॥ वालभते ब्रह्म गोकुळीं आनंदें॥ गौळियाच्या छंदें खेळतां दिसे॥ध्रु०॥ थुरथुर चालत भूमी पाय ठेवित। आंतु बाहिर दावित यशोदे माये॥ तो नित्य पूर्ण ह्मणे कडे घे कांवो आमये॥ स्तनपान दे कां सये वोसंगागे माये॥२॥ दोनी चारी कणिका वक्रारविंदी देखा। तें मुखमय कां माहेर होता॥ तें उचलेनि कपोळीं स्नेहें चुंबिती गौळणी। मांजयाची सिरयाणी ध्यानीं मुनिजनागे माये॥३॥ विश्व प्रतिबिंबाचें बिंब तो कान्हया वो साजणीं। त्यासि वोसंगा घेउनी गौळणी स्तनपान देती॥ सर्वेचि कासाविस होती ते पाही। मां साच कीं कान्हया नाहीं तेथें यशोदा ते कैची॥४॥ वेदाशास्त्रा पुराणा आणि यज्ञतप दाना। श्रुति धांडौळितां मना ठावो नुरेचि। मां मां म्हणोनि गौळणी अंगोळिया धरिती। मां विस्मयो करिती चोज अचोजगे माये॥५॥ ब्रह्मादिकां लक्षा नये कल्प गेले युगे युगे। तो गौळणीया वोसंगा निघालागे माये॥ तें बाळ भावाचे कीं संतत दैवाचे। न वर्णवे वाचे दिपोदिपिवो माये॥६॥ सांवळा सुजेडु कीं सुधेपरिस गोडु। तो या डोळ्या उजियेडु डोळसु तो॥ त्यानें एकै घेइजे एके पुजिजे। मां प्रीतिचेनि माजे नेणिजे दुजेगे माये॥७॥ हारवी कांई आपुलेपण न संडितां गांवोगांवीचा होत जात। तैसा गोकुळीं गोपिनाथु सकळ जना॥ कृष्ण परब्रह्म पुतळा कीं आनंदाची कळा। तो हा भोगविता हे लीळा मदनाची गे माये॥८॥ एक पावलों म्हणती ते कांहींच नेणती। अनुसरलिया हातांतळी पावा पावा म्हणे निवृत्तिदासु हरी। बापरखुमादेविवरु विठ्ठलु करिते निकेगे माये॥९॥

८१. गोकुळीं कमळ विस्तारलें साचें ध्यान श्रीधराचें करावया॥ यमुनेच्या पाबळीं मूर्ति देखिली सांवळी। चिदाकांशींची वोतली प्रेमतनुगे माये॥१॥ आवडींचें वालभ ब्रह्म पुंजाळलें। गोपवेषें गाई राखे। कांबळीची बुंथी घेऊनि कल्प द्रुमातळीं। त्रिभंगी ठाण मांडियलेंगे माये॥ध्रु०॥ योगमायेचनि विलासे उभा देहुडा पाउलीं। तेथे दीप्ति जे उदेली तेजाकारें अंगुष्ठीं अगुष्ठीं स्थापियेलें मूळपीठ। सुनीळनभाचेनि काळीवटे अंगोळियागे माये॥२॥ शेष गुढारी विसंचला किं भूमि पावो ठेविला। तोचि विन्यस्त उभारला तेज:पुंज॥ कुंकमपिंजरिचेनि सळे मापर्वती राततेपळें। तळवांचे रंग बाहळें पाउलीं श्लाघेगे माये॥३॥ चरणकमळीं कमळा कैसी विराजली बाळा। तेथें जाला एकवळा ये कमळीं कमळा॥ ध्वजवज्र अंकुशरेखा चरणीं वोळली पीयूष। नखें सरळीं देखा काळेपणाचेनिगे माये॥४॥ घोटीं सुनीळ निरावकाशें काश पाहतां भासलासे। जानुजघन प्रकाशे नभ ढवळलें॥ कासे कसिला सोनसळा खवे आला मध्यस्थळा। रत्नजडित मेखळा शोभतसेगे माये॥५॥ द्वितीय कमळीं

प्रजाप्रती कीं रोमराजी झळकती। तेथें उपनली दीप्ति काळी त्रिवळीची॥ उदरवक्षस्थळ द्विजपद निर्मळ। स्तनचंद्र पोकळी ढिसाळ काळिमा जैसीगे माये॥६॥ उदधीचेनि प्रेमसळें आपाद वैजयंती माळे। वरी शोभताती सोहळे सगुणाचे॥ दशनदीप्ति झळाळी रत्नकिळा मागों आली। दिसे हनुवटी बुजाली प्रभेचेनिगे माये॥७॥ प्रणवाचा मरिगळा पूजनासि आला भाळा। तुर्येसहित त्रिपुंड्र टिळा अर्ध ऊर्ध्व मात्रीं॥ अभिनव महाकारणीं। पवनपंचकाचीं खेवणीं। कुंडलें पेरावणी कर्णीं ढाळ देतीगे माये॥८॥ माथां मोर पिसावेठी गंडस्थळीं पडे दीप्ति। स्वयें विस्मित श्रीपती तेजःपुंजगे माये॥ तरुघोंस खोंविले शिरीं वेणु ठेऊनि अधरीं। नंदरायाचा खिल्लारी वोज काय सांगोंगे माये॥९॥ सप्तरंध्रीं सप्तस्वर चाळी अंगोळिया मनोहर। मुद्रिका शोभती साकार रत्नजडितगे माये॥ तिया वेणुचिया किळा। गोपि वेधल्या सकळा। अवघिया जाल्या पै काळ्या कृष्णरूपेंगे माये॥१०॥ ऐसा नटनाट्य वेषधारी सवे संवगडे वारिधारी। कैसा त्रिभंग कुसुरी उभा असेगे माये॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु सुखाचें निधान तें म्यां हृदयीं संपूर्ण सांठविलेंगे माये॥११॥

८२. भक्तिचिया चाडा गोकुळाशीं आला। त्याशी गौळणी म्हणती वाल्हा दुल्हागे माये॥ आवडीच्या सुरवाडे परब्रह्म सुरवाडे। त्याशी गौळणी खेळविती लाडे कोडेंगे माये॥१॥ गोजिरिया कान्हो अपछंद मत्ता पाउली रंगे रंगनाथा। दृष्टीचिया डोळां सुख निवडेना मागुतें ते वाचा वर्णावी केंवि आतां रया॥धृ०॥ अठुले लोळिया ढाळ देती कानीं मुक्तें खेवणी हरि श्रवणीं॥ अंतरिंचिया सुखा प्रगट दाविती देखा। ललाटीं झळकती रेखा रत्न जडित पत्रें माथांगे माये॥२॥ युगबंदु दिधला तैसा दोंदिलु मिरवला। नाभिकमळीं प्रकाश जाला परमेष्ठी॥ कटितटीं कडदोरा साजे त्या सुंदरा। वेगु तरु नेपुरां वेदु मानसीं वसेगे माये॥३॥ श्रुतिचेनि समागमें पाउलें गोजिरीं। घागुरली प्रेम नेपुरें कैसी वोप देती॥ अंदु वाकी वाळे पाय करी बेंबिले। मुनिजनांचे सुखसोहळे पुरवितसे गे माये॥४॥ ऐसा अपुलिये लीळे आपणासींच खेळे। गौळणी भरुनियां डोळे कैशा पाहाताती॥ अवघें कृष्णरूप भरलेंसे मानसीं। बापरखुमादेविवरेंसी मिळोनि गेल्यागे माये॥५॥

८३. योगिया मुनिजना ध्यानीं। तें सुख आसनीं शयनीं॥१॥ हरिसुख फावलें रे॥ धृ०॥ गोकुळींच्या गौळिया। गोपि गोधना सकळा॥ २॥ बापर-खुमादेविवरें विठ्ठलें। तें सुख संवगडिया दिधलें॥३॥

८४. पावया लुब्ध जाल्या पाबळा। गाई परे बळारे कान्हो॥१॥ विसरल्या चार विसरल्या पार। तल्लीन साचार कृष्णमूर्ति॥धृ०॥ पाणिया निघाल्या गाई चरती कळंबा ठाईं। हाकितसे लवलाही सवंगडा॥२॥ ज्ञानदेवी गाई हाकितु पावे सोई। हरिनाम दोही सत्राविये॥३॥

८५. गायी चालिल्या वनाप्रती। सवें पेंधा चाले सांगाती॥१॥ वळि गोवळिया कान्होबा। यमुने पाण्या नेईं तूं बा॥धृ०॥ पावया छंदें परतल्या गाई। विसरल्या चारा तल्लीन ठायीं॥२॥ ज्ञानदेव सवें सवंगडा लाठा। गाई हांकितो गोठणा तटा॥३॥

८६. माथे टेंकित बाह्या पसरित। डांगाचे आधार घेती॥धृ०॥ एक म्हणती आम्हीं उचलिला पर्वत। बहुत मिळोनि काय नव्हतीरे॥१॥ बाहे कडाडित मनगटें लचकत। म्हणोनि उठिले अवघेरे॥२॥ तयामाजिं असतां न दिसे बाप॥ समर्थ थोर तुझी मावरे॥३॥ काळु आतुडे परि वेळु नातुडे। म्हणौनि रक्षिलें सकळारे॥४॥ बाप रखुमादेविवर विठ्ठल साचा। म्हणोनि रक्षिलें आम्हारे॥५॥

८७. कल्पद्रुमातळीं ब्रह्म पुंजाळलें कैसें दिसते सुनीळ तेजगे मज। पाहातां वेणु वेदध्वनि नाद उमटताती सहजगे बाई ये॥१॥ आनंदें गोपाळ

गोधनें राखसी तळे यमुनेच्या पाबळीं। कर्मकाठी करीं घेऊनियां वळत्या देतुसे पांचचा मेळिगे बाइये॥ध्रु०॥ ऐसा जिकडे तिकडे उभारूनि बाहो। हाणतो थोरें निकोपें तयाचिया कर्मा होतिसे निवृत्ति। काय पुर्विल येवढें तपगे बाइये॥२॥ गोवळेपणाचेनि वेषें अमरीं सेविजे बोलताति सवंगडे। येरुनि येराचिया उच्छिष्ठा झोंबती नेणो तया काय जोडेगे बाइये॥३॥ मुनिजनां स्तवितां संतोष न पवे तो हुमलि घेतां हांसे। ब्रह्मादिकां बोलाचीं अक्षरें कोण जाणे प्रेम कैसेंगे बाइये॥४॥ ऐसा साहिदर्शनां वर्णितां पवाडु नाहीं आणि गोवळेपणें वेष नवल सांगों मी कायी। बापरखुमादेविवर विठ्ठलु सेविलिया। वांचूनि नेणवे केलिया कांहींगे बाइये॥५॥

८८. नागोठणीं गोपाळ वळतिया देतो कीं आनंदली गोधनें ऐकोनि वेणुध्वनी तत्त्वता। तुझी सांवळी सुंदर बुंथी विसंबे क्षणभरी तोचि सुखीं सुख पाहतां निजचित्तारया॥१॥ आनंदल्या मनें पहा तूं निधान। जवळिल्या निजध्यानें सांडूं नको॥ध्रु०॥ म्हणोनि कल्पनेचा उबारा मन संधीचा संसधु भागु अनुसराया गोठणींचया। दुर्लभ शक्ति ते गोपवेषें नटलें चैतन्य मांदूसे तें परादिकां नव्हे निजशक्तिरया॥२॥ म्हणोनि रखुमादेविवरु सदसुखाची निजबोल पाहें मीतूंपणा नातळे तो ऐसीयाचि बुद्धी सखोल। निवृत्तिरायें खुणा दाऊनि सकळ निज चैतन्य पाहे निखळरया॥३॥

८९. हरि प्रेम सरोवरीं। क्रीडति ये मदन कुहरीं। प्रेम सरोवरींये॥१॥ चांदिणें निर्मळ। चंदनें धवळतिये। पैल वृंदावनीं वासुगा गोविंदु खेळतिये॥ध्रु०॥ प्रकृति भक्ति परमातुमातुपरमहंसु। ज्ञानदेवो म्हणे निवृत्तिदासु॥२॥

९०. गोंवळेपणाची बुंथी घेउनिया भेष। रिझविशी मानस यशोदेचें॥१॥ त्या सुखें ब्रह्मांड थोडेंपा तियेशी। दुग्ध पैं मागशी बाळपणें॥ध्रु०॥ ऐसे मोहिलें पैं जगभक्तअंतरंग। भावाचे सुरंग प्रेमबोधें॥२॥ मज मानसीं सुख तुझ्या रूपीं वोलावा। सर्व इंद्रियीं दोहावा तुझ्या नामीं॥३॥ जन हे विव्हळ तुजविण अविचार। गुंफले साचार माया मोहें॥४॥ आतां ऐसें करी तुज मज सरोवरी। प्रपंच केसरी होई रया॥५॥ बाप रखुमादेविवरु सोपारा पैं निळा। निवृत्तींनी कळा सांगीतली॥६॥

९१. लक्ष लावुनि अंतरी। कृष्णा पाहती नरनारी। लावण्यसागरु हरि। परमानंदु॥१॥ छंदें छंदें वेणु वाजे। त्रिभुवनीं घनु गाजे। उतावेळ मनें माझें। भेटावया॥ध्रु०॥ ब्रह्मविद्येचा पुतळा। गाई राखतो गोंवळा। श्रुति नेणवे ते लिळा। वेदां सनकादिकां॥२॥ भूतग्रामीचा परेशु। तापत्रयाचा करी नाशु। आड धरुनि गोपवेषु। वत्सें राखे॥३॥ रासक्रीडा वृंदावनीं खेळे। इंदुवदन मेळे। उद्धरी यदुकुळें कुळदीपकें॥४॥ निवृत्ति दासाचा दातारु। बापरखुमादेवीवरु। भक्तां देतो अभयकरु। क्षणक्षणांमाजि॥५॥

९२. गुणें सकुमार सावळें दोंदील पहापा निराळें केवी वोळलेंगे माये। सुखें चैतन्याची बुंथी वोतली ब्रह्मादिकां न कळे ज्याची थोरीव। तो हा गोवळियाच्या छंदें क्रीडतु साजणी नवल विंदान न कळें माव रया॥१॥ डोळे बैसलें हृदयीं स्थिरावलें मन नुठी तेथून कांहीं केल्या॥ध्रु०॥ सच्चिदानंद पदीं पदातें निर्भेदीं निजसुखाचे आनंदीं माये क्रीडतुसे। तो हा डोळिया भीतरीं बाहिजु अभ्यंतरी जोडे हा उपावो किजो रया॥२॥ गुणाचें पैं निर्गुण गंभीर सद्सुखाचे उद्गार जें प्रकाशक थोर सकळ योगाचें। आनंदोनी पाहे पां साचें मनीं मनचि मुरोनि राहे तैसें बापरखुमादेविवरा विठ्ठले कीं मुसेमाजि अळंकार मुराले श्रीगुरुनिवृत्तीनें दाविलें सुखरया॥३॥

९३. परब्रह्म सांवळे गोपवेशें निराळें। हृदयकमळीं स्थिरावलें काय सांगो॥ कायावाचामनें पाहे जों पाहणें। तव नवलाव होये निर्गुणरया॥१॥ नामरूपीं गोडी हेचि आवडी आतां। न विसंबे

सर्वथा तुजलागी॥ध्रु०॥ जगड्वाळ प्रपंचभान हें तुज नातुडे हन। वायां भोगिसि जाण कारे याचें॥ तुझीचि बुंथी तुजचि न कळे याचें चोज। केंवीं वर्णिसी सहज गुणे रया॥२॥ म्हणोनि दृष्टि चोरूनि पडे मिठी। मन चोरूनिया पुढतापुढती तुजचिमाजि॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला। उदारा येणेंचि नाहीं त्रिशुद्धि। येणें निवृत्तिरायें खुणा दाऊनिया। सकळगुणीं गुणातीत तुटली आधी रया॥३॥

९४. मदनमूर्ति तूं डोळ्या आसुमाय जालासी। सेखीं कामिनिचेनि पक्षें तीं पुराणें पिशाच्च करिती रया॥१॥ गोजिरिया गुण निधाना। बापा गुंतल्यापणाचिया साठी॥ वेदविदेही विचारितां तेथें। आगम काढिती आटीरया॥ध्रु०॥ सायुज्यता जालीया मग सादृश्यपण तेथें लोपे। अवयव अळंकार मुरालिया तेथें दृष्टि परमार्थ थोपे रया॥२॥ तत्त्वपणाचेनि समरसें तेथें पुरोनि उरे तें शेष। बापरखुमादेविवरु विठ्ठलीं गगनीं नक्षत्र पडे नुरेचि तेथें रेख रया॥३॥

९५. सांगति आमुचियारे। विद्गद पावया छंदेंरे॥ १॥ नाचे विनोदें कान्हारे॥ विद्गद पावया छंदेंरें॥ ध्रु०॥ निवृत्तिदासा प्रियोरे। विद्गद पावया छंदेंरे॥ २॥

९६. वृंदावनीं आनंदुरे। विठ्ठलदेवो आळवितिरे॥ १॥ गोपाळ रतलेरे। विठ्ठलदेवो आळवितिरे॥ २॥ निवृत्ति दासा प्रियोरे। विठ्ठल देवो आळवितिरे॥ ३॥

९७. काळिये रात्रींचा चंद्रमा कीं सांवळीं बुंथीं आम्हां। काळिये वेळीं ते सीमा नवलावो। सुनीळ काळिये भरु मेघ: शाम सांवरु। तोचि नवलाहो हा धीरुरया॥१॥ आतां काळिये दिनु मज न स्मरेवो काहीं। तुझें तुज पाही गाऱ्हाणें रया॥ध्रु०॥ म्हणोनि यमुना कांलिंदीजळ सांवळें। योगिया शून्यातीत तटीं मिळे सुखिया। सुखाचेनि कल्लोळें देखतसे॥२॥ दिठि सांबळ भरु खुंतलासे मज। नाठवे द्वैत काज रया॥३॥ येणें सुखें चैतन्य डोळ्या होकां मिळणी कीं नेत्रीं नेत्रे उन्मळणीं तटस्थपणें। हा सर्वांग अंग प्रत्यांगा होउनियां जेथ विचारती मुनिजनांचीं मनें। तो हा रखुमादेविवरु पाहतां दिठीं आतां पुनरपि नाहीं येणें रया॥४॥

९८. भोंवरी सांडुनि पाव ठेविरे गोपाळा। नाच चिदानंदा सुख होईल सकळां॥१॥ रंगु रंगलारे रंगु रंगलारे। आदि मध्य अंत त्रिगुणविरहित विश्वीं प्रकाशलारे॥ध्रु०॥ रंगु रंगला सुरंग जाला। पहिलीये रंगीं निवृत्ति भला॥२॥ सुखीं सुख मुरे प्रेमें चिदानंद उरे। बापरखुमादेविवरु विठ्ठलुरे॥३॥

९९. तुझिये निढळीं कोटि चंद्र प्रकाशे॥ कमल नयन हास्य वदन हांसे॥१॥ हालकारे कृष्णा डोलकारे॥ घडिये घडिये घडिये गुज बोलकारे॥ध्रु०॥ उभा राहोनिया कैसा हालवितो बाहो॥ बाप रखुमादेविवरु विठ्ठलु नाहो॥२॥

१००. कोंवळें ठुसठुसित मोतियांचे घड। शृंगारिलें गूढ जया लेणीं॥१॥ बैसोनियां रथीं सुरनर खेळती देखोनिया पशुपति वेडावले॥ध्रु०॥ युक्ति खुंटली वासना निमाली। कळां पैं बैसली पद्मासनीं॥२॥ होय कीं नव्हे ज्ञानदेव पुसती। आठवितां निवृत्ति भेटी होये॥३॥

१०१. पावया छंदें तल्लीन गोविंदें। नाचती आनंदें गोपाळ कैसे॥१॥ यमुनेच्या तीरीं गाई चारी हरी। गोपाळ गजरीं आनंदले॥ध्रु०॥ ठायीं ठायीं मातु पेंधा पैं नाचतु। वाकुल्या दावितु हरी छंदें॥२॥ ठाईं ठाती उभ्या विसरल्या माया। हाकितु लवलाह्या कृष्णहरी॥३॥ ज्ञानदेवाजिवीं कृष्णचिरंजिवी। गोपाळ रंजवी प्रेमभक्तां॥४॥

## पाळणा

१०२. आकारेंवीण पाळणा पहुडलें। निराकार म्हणोनि वोसणाईलें॥१॥ जो जो जो जो बाळा निराकार पाळणा। व्योमीं व्योमाकारीं झोंप घेई॥ध्रु०॥ चौदा निःशब्दीं जागृत केलें।

येकविसीं हालवूनि बाळ उठविलें॥२॥ बाप रखुमादेविवरु निर्जी निजविलें। कांहीं नव्हे ऐसें कांहीं ना केलें॥३॥

१०३. पाळण्याची परी सांगेन आतां। पाळण्या तान्हुलें बोंभाते देहेविणें ताता॥१॥ तेथें जनकु नव्हे जननी नव्हे। बाळक नवे होये मासे विण॥ध्रु०॥ तेथें तेल सारूनि अभ्यंग केलें। बाळक पुसिलें अंबरवर्णे॥२॥ बापरखुमादेविवरु अनुभवित जाले। ते निजरूप पावले परब्रह्मीं॥३॥

१०४. अठरा दिगांतीहुनि पाळणा आणिला। तेथें एक निर्गुण बाळ पहुडला॥१॥ बाळापें हें नाहीं बाळापें हें नाहीं। अंगुष्ठ पेउनि घेईं निरालंब॥ध्रु०॥ निरालंबीं स्वाद आळवी ब्रह्मीं। तेथें एकु बाळ बोभाये निरंजनीं॥२॥ बाप रखुमादेविवरु अनादि अंतीं। त्याहुनि परती मज गति केली॥३॥

१०५. पांच पाट्या नव खिडकिया पाळणा पहुडया निरंजनीं॥१॥ एकवीस सहस्त्र श्वास हुंकार घाली॥ माया ते मारिली ज्ञानरूपी॥ध्रु०॥ तेथें निरंजन नाहीं कांहींचि नाहीं। तेथें निःशब्द उठती पाहीं॥२॥ बापरखुमादेविवरु बाळका घेऊनि मेला। मरोनियां जाला जितपणेंगे माये॥३॥

१०६. शून्य नाहीं निरशून्य नाहीं॥ तेथें पाळणा पाही लावियेला॥१॥ जातिविण बाळ उपजलें पाही। तेथें परिये देते माय तेही नाहीं॥ध्रु०॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलीं पाळणा नाहीं॥तेथें मी बाळ पाही पहुडलों॥२॥

## घोंगडी.

१०७. आठवितां नुपुरे मोविता न मोववे। सांगतां न सांगवे गुण त्याचे॥१॥ परतलिया दृष्टि काळा देखिला जगजेठी। वेणिभागीं पृष्ठीं कैसा दिसतु असे॥ध्रु०॥ त्या गुणाच्या संगें कैसें अद्वैत जालें। मन म्हणौनि काळेंपण बहु झालें गे माये॥२॥ पुरेपुरे बुद्धि निमाली वेदवाणी। आतां केवीं वर्णूं चक्रपाणी बहु काळें गे माये॥३॥ द्वादश मंडळें वोवाळुनि आलिये। तंव तंव काळें देखिलें रूपडें त्याचें॥४॥ अनुमाना नये अनुमाना नये। परतल्या श्रुति चोजवेना॥५॥ मनें बुडी दिधली दाहीं हारपली। चोवीस मावळलीं अगाध पंथी॥६॥ प्रीतीचें पांघरूण काळें घोंगडें। रखुमादेविवरें विठ्ठलें मज केलें उघडें॥७॥

१०८. रात्री दिवस वाहातसे चिंता। केशव धडौता होईन मी॥१॥ खिरजट घोंगडें फाटकें तें कैसें। वेंचिलें तैसें भोगिजगा॥ध्रु०॥ वित्त नाहीं गाठीं जीवित्वा आटी। उघडी पाठी हींव वाजे॥२॥ घोंगडें देईल तो एक दाता। रखुमादेविवरा मागों रे आतां॥३॥

१०९. तुझें घोंगडें येकचि चोख। दुजें वोळख अमंगळ॥१॥ दे धडुत न घोंगडें मोठें। खिरपटें जळो देवा॥ध्रु०॥ रखुमादेविवरु उदार जाला। धडौता केला ज्ञानदेवो॥२॥

११०. चौऱ्यांशी लक्ष हिंडता हाट। पुंजे दाट सांपडलें॥ हित ये खेपेसी बरवें जालें। सुरंग घोंगडें हाताशीं आलें॥ध्रु०॥ येणें पाडें न माये कोठें। घोंगडें मोठें सांपडलें॥२॥ मनोरथ पुरलेरे आतां। बापरखुमादेविवरा विठ्ठलाशीं ध्याता॥३॥

१११. माझिया घोंगडियावरी ब्रह्माचा गोंडा। बाहिरी सांडा बैसावया॥१॥ घोंगडें संतचरणीं रुळे। श्रीरंगा रंगलें व्योमाकार॥ध्रु०॥ रखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें। अमोलिक जालें मोलेंविण॥२॥

११२. घोंगडी घेऊनि हाटासि जाये। पंढरिये आहे वस्ती आम्हां॥१॥ घोंगडियाचें मोल पैं जालें। चरणीं राहिलें विठ्ठलाचे॥ध्रु०॥ घोंगडें येक बैसलें थडी। उभयां गोडी विठ्ठलाची॥२॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी तो जाणे। शाहाणे ये खुणें संतोषले॥३॥

११३. काळें न सावळें धवळें न पिंवळें। घोंगडें निराळें लाधलों मी॥१॥ मागील रगटें सांडिलें आतां। पंढरीनाथा चरणाजवळीं॥ध्रु०॥ नवें नवघड हातां आलें। दृष्टि पाहे तंव मन हारपलें॥२॥ सहस्त्र फुलीवरी गोंडा थोरू। धडुतें

दानी रखुमादेविवरु ॥ ३ ॥

११४. निरालंब घोंगडें अद्वैत पेठे। तेथें एक भेटे रूपेंवीण ॥ १ ॥ हिरोनि घेतलें हिरोनि घेतलें। मज पैं दिधलें दोषेंवीण ॥ २ ॥ रखुमादेविवरें कामाण केलें। अपकारेंविण उघडें नागविलें ॥ ३ ॥

११५. अद्वैत पेठेहुनी घोंगडें आणिलें। अमोलिक घेतलें पंढरिये ॥ १ ॥ चौ हातांची भरणी आली। तिये चराचरीं ऐसें नाहीं ॥ २ ॥ रखुमादेविवरु विठ्ठलीं नीट। पांघुरविलें वैकुंठ मज देखा ॥ ३ ॥

११६. माझें चवाळें रंगाचें बहुतें। श्रीगुरुनिवृत्तिनाथें दिधलेगें माये ॥ १ ॥ चवाळें शुद्ध चहूं पालवी। व्योमाकारें वेद प्रसिद्ध पांघुरवी ॥ २ ॥ आतां पराहूनि परमेचूचें। बापरखुमाईवरा विठ्ठला अंगींचे ॥ ३ ॥

११७. निरंजना गाई चारूं गेलों। तंव चवाळें तेथें एक पावलों ॥ १ ॥ मज निर्गुणें आड वारिलें। चवाळें हिरोनि जिणें बुडविलें ॥ २ ॥ बापरखुमादेविवरें इतुकें केलें ॥ माझें चवाळें हिरोनि नेलेंगे माये ॥ ३ ॥

११८. ब्रह्माचा गोंडा चहूं पालवा। मन पांघुरे उमप भवा ॥ १ ॥ चौ हातांहून आगळें। द्विकरांहूनि वेगळेंगे माये ॥ २ ॥ बापरखुमादेविवरें सुभटें। मज चवाळें दिधलें गोमटेंगे माये ॥ ३ ॥

११९. चवाळ्याची सांगेन मातु॥ चवाळें पांघुरे पंढरीनाथु॥ १॥ गोधनें चारितां हरि पांघुरला। मज चवाळ्याचा त्यागु पैं दिधला ॥ २ ॥ बाप रखुमादेविवरु श्रीगुरुराणा। चवाळें पांघुरवी निरंजनागे माये ॥ ३ ॥

१२०. निर्गुण चवाळें आणिलें। बापनिवृत्तीनें मज पांघुरविलें ॥ १ ॥ चौघे चान्ही पदर म्हणीतले। पांघुरण झालें सारासार ॥ २॥ बापरखुमादेविवरें विठ्ठलें। माझें चोरूनि जिणें उघडें केलेंगे माये ॥ ३ ॥

१२१. तूं माझा स्वामी मी तुझा रंक। पाहतां न दिसे वेगळिक ॥ १ ॥ मी तूं पण जाऊंदे दुरी। एकचि घोंगडें पांघरूं हरी ॥ २॥ रखुमादेविवरा विठ्ठलराया। लागेन मीं पाया वेळोवेळां ॥ ३॥

१२२. जायाची घोंगडी नव्हती निज। म्हणऊनि तुज विनवीतसे ॥ १ ॥ एक पाहतां दुसरें गेलें। तिसरें झालें नेणों काय ॥ २ ॥ चौथें घोंगडें तेंही नाहीं। रखुमादेविवरा विठ्ठला पायीं ॥ ३ ॥

## पाईक.

१२३. जालेनि पाईकें गोसाविपण जिंकें। परि स्वामिया सेवक साचा होय॥ एकएकेविणें स्वामीसेवकपण। मिरविती हे खुण स्वामी जाणे ॥ १ ॥ पाईक काय स्वामी स्वामिया काय पाईक। असतां एके एक दोन्ही नव्हती ॥ २ ॥ स्वामीचें काज पाईकपणें वोज। करितां होय चोज पैं गा॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलासि वोळगतां। पाईका स्वामी असतां निवृत्ति ऐसा ॥ ३ ॥

१२४. एकुचि एकला जाला पैं दुसरा। एकीमेकी सुंदरा खेळविती ॥ १ ॥ माझिये कडिये कान्हा तुझिये कडिये कान्हा। देवकी यशोदा विस्मो करिती मना ॥ २ ॥ बापरखुमादेविवरू आवडे मना। जगत्रजिवनु कान्हा बाईयांनो ॥ ३ ॥

१२५. पाईका मोल नाहीं देसील तें काई। पाईक न मागे कांहीं भोग्य जात ॥ १ ॥ देसील तें काई न देसील तें काई। पाईक न मागें कांहीं तुजवांचोनी ॥ २॥ बापरखुमादेविवर विठ्ठलाच्या पायीं। पाईका मोल नाहीं तैसें जालें ॥ ३ ॥

१२६. आणिक पाईक मोलाचे तुझे। तैसें नव्हे माझें पाईकपण ॥ १ ॥ न मगे वही मोल जीवन भातें। तें द्यावें मातें पाईकपण ॥ २ ॥ बापरखुमादेविवरा गोसांविया। पाईकपणें मीयां जोडलेती ॥ ३ ॥

१२७. देह दंडुनि पाईक अनुसरसा जीवें। तव स्वामियाचें गूज हातासि आलें ॥ १ ॥ पाईकपण गेलें स्वामि होऊनि ठेले। परि नाहीं विसरलें स्वामियातें ॥ २ ॥ पाईकपणें ऐसा आठवुचि नाहीं। स्वामीवांचुनि कांहीं जाणेचिना ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु विठोजी उदारु। पाईक वो साचारु स्वामी केला ॥ ४ ॥

१२८. जागतां नीज आलें असें हातां। मग पाईक म्हणवितां लाज वाटे॥ नव्हे कोणाजोगा नाईकें हाणितलें। उणेपणें आलें पाईकपणा॥१॥ पाईक शुद्धमति स्वामिया विवेकी। वेंव्हारु लोकिकीं चाळीतु असे॥२॥ निदसुरा होता तो जागसुदा जाला। स्वामिये आणिला आपणापाशीं॥३॥ पाईकपणें गेलें सन्निधान जालें। स्वामी एका बोलें निवांत ठेला॥४॥ मागावें तितुकें खुंटलें। तेथ न मगतां आपणांते जाणीतलें। बापरखुमादेविवरा विठ्ठला प्रसादें॥ पाईक परि अभेदें उरला असें॥५॥

## हमामा.

१२९. हमामा पोरा हमामा। घुमरी वाजे घुमामा॥ध्रु०॥ घुमरिचा नाद कानीं। घुमरी घालूं रानीं। रानीं सीतल छाया। मेली तुझी माया। मायेचें घर दुरी। तुज मज कैंची उरीरे पोरा॥१॥ उरी नाहीं तुज। मजसी मांडिलें जुंझ। जुंझीं अहंकार ढळे। कल्पना समूळ गळे। गळतां गळतां पाहिली। कान्होबा चरणीं राहिलीं। कान्होबा पाहे दिठी। तुज मज पडिली मिठीरे पोरा॥२॥ मिठी मिठी करी पाहासी। आतां कोठें राहासी राहाता ठावो येकु। फटितो तुझा लेंकु। लेंकु गाई राखे। बाप गोरसु चाखे। चाखतां घेतली गोडी। तोचि फांसा तोडीरे पोरा॥३॥ पोरा एक माझी गोठी। राग न धरी पोटीं। रागे काम नासे। अंहकारें बोंचा वासे॥ वासिले रावणें डोळे। भेणें द्वैत कंस पळे। पळतां पळतां लागला पाठीं। तुज मज आतां गोठीरे पोरा॥४॥ पोरा गोठी करी ऐसी। संतासि मानेल तैसी। बापरखुमादेविवरु ध्यासी। तरि वरिल्या गांवां जासीरे पोरा॥५॥

१३०. हमामा घाली बाळा। सांडी खोटा चाळा। फोडिन तुझा टाळा। वाकुल्या दाविन काळा॥१॥ हमामारे पोरा हमामारे॥२॥ हमामा घाली बारे। अंगीं भरलें वारें। चाखतीं पिकलीं चारें॥ जाऊं वरिल्या द्वारेंरे पोरा॥३॥ हमामा घालीं नेटें। सांडीं बोलणें खोटें॥ आतां जासिल कोठें। कान्होबाचे बळ मोठेंरे पोरा॥४॥ हमामा घाली सोई॥ भांभाळी सवा दोहीं॥ एक नेमें तूं राही। तेथें बहु सुख पाहीरे पोरा॥५॥ हमामियाचा नादु वाजे॥ अनुहातें कोपर गाजे॥ बापरखुमादेविवरु विठ्ठल राजे। रत्नजडित मुगुट साजेरे पोरा॥६॥

## अंबुला.

१३१. विचारितां देहीं अविचार अंबुला। न साहे वो साहिला काय करूं॥१॥ सखि सांगें गोष्टी चाल कृष्णभेटी। आम्ही तुम्हीं शेवटीं वैकुंठीं नांदों॥२॥ येरि सांगे भावो जावें वो प्रवृत्ती। तव वरि गति येता नये॥३॥ ज्ञानदेवो प्रवृत्ती निघालीया तत्परा। हरि आला सत्वरा तया भेटी॥४॥

१३२. न गमे हा संसारु ह्मणोनि केला भ्रतारु। लोक अनाचारु म्हणती मज॥१॥ चंचळ जालिये म्हणतील मज। कवणा सांगूं। जिवीचें गूज॥२॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलावांचुनि नेणें। सतत राहणें याचे पायीं॥३॥

१३३. अद्वैत अंबुला परणिला देखा। दुसरा विचार सांडिला ऐका॥१॥ सांडिला पै घराचारु। दुसरा विचारु नाहीं केला॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलेंसी घराचार। ठकला व्यवहार बाईयांनो॥३॥

१३४. अंबुला माहेरीं भोगी धणीवरी। मग तया श्रीहरि सांगों गूज॥१॥ माझें सुख मीच भोगीन। क्षेमेंसि निगेन अंगोअंगीं॥२॥ सांडुनि कुळाचार जालिये निर्लज्ज। तुम्ही काय मज शिकवाल॥३॥ रखुमादेविवरु विठ्ठल मातापिता। मी त्याची दुहिता सर्वांगुणीं॥४॥

१३५. जियेचा अंबुला रुसूनि जाये। तयेचें जीवित्व जळोगे माये॥१॥ आम्हीं रुसों नेणों आम्ही रुसों नेणों। अंबुलीया रुसों नेदूगे बाई॥२॥ ज्याच्यानि अंगें जोडला हा ठावो। रखुमादेविवरु नाहो बुझाविला॥३॥

१३६. अष्टभावें भोगितां न पुरे धरणी। देह उगाणी केली देखा॥१॥ अंबुला निघाला अंबुल्या

गांवा। मी वो तया सवा जातु असें॥ रखुमादेविवरु लागलासे चोरु। मार्ग बुडविला घराचारु॥३॥

१३७. दुरकु अंबुला केलागे बाई। ब्रह्यदिकां तो न पडे ठाईं॥१॥ हालों नये चालों नये। सैरावैरा कांहीं बोलों नये॥२॥ अंबुला केला धावे जरि मन। बुडती बेताळीस जाती नाक कान॥३॥ मागील केलें तें अवघें वावो। बापरखुमादेविवरु विठ्ठल नाहो॥४॥

१३८. सुची अंबुला ज्ञान घराचारु। भक्ति ये साकारु आवडली॥१॥ काय सांगु माये निर्गुण अंबुला। शून्यीं मिळाला नाहीं ठाईं॥२॥ रखुमादेविवरु साकार अंबुला। मज पूर्ण बाई-यांनो॥३॥

१३९. अंबुला विकून घेतली वस्तु। घराचार समस्तु बुडविला॥१॥ उठोनि गेलिये अज्ञान म्हणाल। म्यां तंव कैवल्य जोडियेलें॥२॥ अंबुला सांडूनि परावा केला। संसार सांडिला काय सांगों॥३॥ रखुमादेविवरें मज पर्णुनि नेलें। सुखचि दिधलें काय सांगों॥४॥

१४०. सगुण अंबुला निर्गुण पैं झाला। घराचार समस्त बुडविला॥१॥ आशा हे सासु असतां बुडविली। शांति माऊली भेटों आली॥२॥ रखुमादेविवर विठ्ठलेंसि चाड। अद्वैतेंसि माळ घेऊनि ठेलें॥३॥

१४१. अंबुला होता तो लेंकरू जाला। घराचार बुडाला बाईयांनो॥१॥ झणी अकुळी म्हणाल उणें। तुम्ही जाणते जाणा परमार्थ खुणें॥२॥ रखुमादेविवरें विठ्ठलें भोगिलिये। लंपट जाहालिये सहजानंदीं॥३॥

१४२. स्वरूपाचेनि भानें बिंब हें ग्रासिलें। परि खुण न बोले काय करूं॥ रूपाचा दर्पण रूपेंविण पाहिला॥ द्रष्टाहि निमाला नवल कायी॥१॥ जिकडे जाय तिकडे दर्शन सांगाती॥ उदो ना अस्तु हे नाहीं द्वैतस्थिति॥२॥ पूर्वबिंब शून्य हे शब्दचि निमाले॥ अनाम्याचे नि भले होतें सुखें॥ त्यासी रूप नांव ठाव संकल्पें आणिला। अरुपाच्या बोला नाम ठेला॥३॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि एक॥ भोगी समसुख ऐक्यपणें॥ अदृश्य अंबुला जागतां निविजे॥ परि सेज स्वभावीं दुजें नाहीं रया॥४॥

१४३. सुखाचा निधि सुखसागर जोडला। म्हणौनि काळा दादुला मज पाचारिगे माये॥१॥ प्रेम नव्हाळी मज झाली दिवाळी। काळे वनमाळी आले घरागे माये॥२॥ बापरखुमादेविवर पुरोनि उरला। सबाह्यजु भरला माझे हृदयींगे माये॥३॥

१४४. वऱ्हाड न होतां होतों खेळेमेळे। लग्न लागलें कवणें दुष्ट वेळे॥ तेथुनि अंबुला चालवितो मातें। कैसेनि येथें निस्तरावें॥१॥ मौनेंचि घरवात करावियाची। चाड नाहीं मज या जिवाचीगे माये॥२॥ आया बायांनो ऐका वो न्यावो। येकांतीं सदा वसताहे नाहो॥ अंगभोग नाहीं ऐसा दुरावो। गरुवार होतसे हाचि नवलावो॥३॥ एखादे वेळे मजचि मरितोसी। लाजा मी सांगो कोण्हापासी॥ राग आलिया आवघेया ग्रासी। ऐसी अति प्रीति आम्हां दोघांसी॥४॥ म्हातारा आमुला काय माये। रूप ना वर्ण हात ना पाये॥ तरुणि आपुलें मी रूप न साहे। क्षणभरि या वेगळी न राहे॥५॥ पिसुणा देखतां बुझाविलें माये। बुझवणी माझी शब्द न साहे॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु पाहे। पाहाते पाहाणें जालेंगे माये॥६॥

१४५. द्वैताद्वैत विरहित गौळणी॥ अमृत दुडिया भारोनियां सांजवनींगे माये॥ अभिन्नव करूनि श्रृंगारु माथां गोरसाचा भारु। अजि निघाल्या विकरा करूं मथुरे हाटा॥ प्रेम उचंबळलें चित्तीं हांसें चाले हंसगति। पुढें सखिया खेळती जिवीं जिवलगा॥ दृष्टीं फिटला संदेहो लागे कांबळीचा सोवो। तंव माझरी कृष्णदेवो स्वरूपीं दिसे॥१॥ नवलावगे नवलावगे देखियेला॥२॥ दृष्टीं देखिला लोचनीं लाजिलीये विरोनि। मागति खुंटलिसे मनीं पांगुळलें॥ सरलें नेत्रांचें देखणे श्रुतिश्रवण

ऐकणें। चित्त चोरियलें कान्होनें चैतन्यींवो॥ निमिषें खुणाविलें सहजें तव घडलें सहज। बिंबीं बिंबतसे निज हें जीव हाचि जाला॥ आतां नाहीं मज जरी हा तंव बाहेरू भीतरी। अवघीं अंतरलीं दुरी गेलें मनुष्यपण॥३॥ याचिये वो भेटी पडीली संसारासी तुटी। शब्द मावळला गोष्टी तो मी काय सांगों॥ ऐसा कैसा ह्य दानी करूं नेदितां बोहणी। सुखासाठीं सांवजणी केलें रूपातीत॥ आजि करुनी विकरा रिघु नुपुरे जाव्या घरां। नुरे कल्पनेसी थारा। सरले लिंग देह॥ मी तंव वेंधलिये यासी सर्वेचि जालिये तत्वमसि गुज लपवावें मानसीं तुम्ही सखीयांनो॥४॥ याचिया लागल्या अभ्यासें गेलें मीपणाचें पिसें। केलें आपलिया ऐसें इंद्रियासहित॥ पूर्ण चैतन्य भोगीलें हें तंव दुजें निमालें। देहीं अखंडित ठेलें होतें जैसें तैसें॥ आलिंगुनिया अंतरीं रिगु नुपुरे बाहेरी। निर्विकाराच्या शेजारीं प्रेम दुणावत॥ बापरखुमादेविवर विठ्ठलेसी भेटी। आजि संसारा संसटी घेऊनि गेला॥५॥

१४६. कासयाची चाड मज नाहीं वो साजणी। एकल्या निर्गुणीं वेधियेलें वो माये॥१॥ पवन वेगाचेनि अंतरलें तुम्हासी। आतां मागुती वो कैसी परतेन वो माये॥२॥ ध्यान धारणा तनु मनु करणें। ठेवियेलें ठेवणें गोपाळ चरणीं वो माये॥३॥ ऐसे भुलवणीं भुलविलें नयनीं। रखुमादेविवरें चिंतनीं वो माये॥४॥

१४७.अष्टदळ पाहे पद्म नेत्र दाहे। सोहं मंत्र कोहं ठाकी दुरी॥१॥ आडवीं आडव पारूचा बरव। सखिये तो राव रामराणा॥२॥ उपरती साधि प्रपंचीं अवघी। गुणें गुण उद्बोधी शेजे सये॥३॥ ज्ञानदेवी लपे विज्ञान हारपे। कायम मापें न बाधिती॥४॥

१४८. सम्यक करी शांति बैसे एके पातीं। क्षेमेसि निवृत्ति वाड करी॥१॥ ऐसा हा उपदेश सखी सांगे जीवास। झणी कासावीस होसी बाई॥२॥ सज्ञानी विज्ञान त्रिज्ञानीं नारायण। अन्वयीं शोधून पाहे लक्षीं॥३॥ ज्ञानदेवीं शिवा उन्मनि रिघावा। हरीचा विसावा सर्वांघटीं॥४॥

१४९. येरी म्हणे भेद सृष्टी दाविती शब्द। तत्वीं तत्व बोध कोठें गेले॥१॥ सखी म्हणे बाई आकाराची सोय। तुज मज काय इयें देहीं॥२॥ चपळता सांगों उष्णता घोटी। घोटुनियां होणें समब्रह्मीं॥३॥ ज्ञानदेवीं तट भाग्य जैं उत्कट। तैं हें वाक्पट पडती दृष्टी॥४॥

१५०. सखी सांगे सार शांति क्षमा दया। प्रपंच विलया बरळ पोशी॥१॥ सखी म्हणे एका दुजी म्हणे अन का। अनेक सिंम्यका गुरुगम्य॥२॥ सावध निबंध आध्याचा उकला। रसनेचा पालव रसना तोयें॥३॥ ज्ञानदेव सांगे रखुमादेवी जप। अगम्य संकल्प एक दिसे॥४॥

१५१. सखी म्हणे बाई समपण तें कैसें। येरी म्हणे देश हिंडूं नको॥१॥ आंधीं शोधी आप मग पाही दीप। कोहं सोहं दीप दवडी दुरी॥२॥ त्रिपुटीं झोंबों नको मायावी सकळ। अवघा सरळ हरी आहे॥३॥ ज्ञानदेव बुझवी बुझे ज्ञानधारणा॥ तुज मज सौजन्य येणें न्यायें॥४॥

१५२. ऐक धावे सुनाट एकीनें धरिलें बेट। एकीनें शेवट साधीयेला॥१॥ कोणे तत्वीं हरि कैसी याची परी। नांदे कोणे घरीं सांगीजेसु॥२॥ सखी सांगे बाई भावो घरी देहीं। एकारूपा सोयी येईल घरा॥३॥ बापरखुमादेवीवर विठ्ठल अवचितां। निवृत्ति जे समता सांगितलें॥४॥

१५३. सांवळीये निळी भुलली एकी नारी॥ परेचा वो घरीं शुद्धि पुसे॥१॥ सांगेगे बाईये कोणे घरीं नांदे॥ कैसें या गोविंदें हिंडविलें॥२॥ चहूं मार्गी गेलें न संपडेची वाट॥ मग चैतन्याचा घाट वेंधलीये॥२॥ ज्ञानदेवी समाधि स्थान पैं विठ्ठल। अवघा चित्तीं सळ हारपला॥३॥

१५४. मीपण माझें हरपलें। शेखी ठकचि विशेखीं पपडिलें बाईये॥१॥ काय सांगो तुम्हां कैचा हा गोंवळु। न म्हणे दिन वेळु आम्हा घरीं॥२॥

नवल पैं केलें बुडविलें सगुण। आपणचि निर्गुण होउनि ठेले॥ ३॥ बापरमखुमादेवीवरु जीवन आमुचें। नाहीं पैं साचें कुळकर्म॥३॥

१५५. आजिवरि होते मी मोकाट। तंव डोळे फुकट मोडा तुम्ही॥१॥ समर्थाचे अंगीं पडले अवचिति। तुम्हां ऐसि किती चाळविली॥२॥ बापरखुमादेवीवरा विठ्ठलाचि घरवात जाले। जन्मवरी एकांत करुनि ठेले॥३॥

१५६. त्वचेचिया रानां धाडूं नको मना॥ तेयें नंदाचा कान्हा डोळा घाली गो आइयो॥१॥ गाईचा गोंवळा यमुनेचा पावळा। धरी माझा अचुळा मग मी पळालिये गो॥२॥ ताकपिरी गोंवळी केली मजसी रांडोळी। भावे नारली मग मी पळालिये गो॥२॥ गळा गुंजमाळा गांठी। डांगा मोरविसा वेठी। सोकरु लागे पाठी। नंदरायाचा गो आई ये॥३॥ एक्या करें धरी। विजा करें वेटारी। चुंबन दे हरी। मग मी पळालिये गो॥४॥ ऐसी पळत पळत गेलिये। कान्होनें मोहिलिये। माझी मीचि जालिये। मग मी समोखिलिये गो॥५॥ तुना चार। लागतेगोर। तुना बोर लागतो गोर। तुना बाही माझी चार। माझी आईयो गो गो॥६॥ पूर्वपुण्य फळलें। देह मुक्त जाले। बापरखुमादेविवर विठ्ठलें। ऐसें केलें गो आईयो॥७॥

१५७. ठाकुनी आलिये तुजपाशीं। थिते मुकलिये मनुष्यपणासी॥१॥ भलें केलें विठ्ठला पिकें भरला साउला। घरीचीं कोपतीं सोडी जाऊं दे वहिला॥ध्रु०॥ संसार साउला माझा पालटुनि देसी। तरी मी होईन तुझी कामारी दासी॥२॥ संसार साउला माझा पालटुनि देसी। बापरखुमा-देवीवरा विठ्ठला गुणरासी॥३॥

१५८. में दुरर्थि कर जोडु। तान्हे सेवा न जाणु॥ १॥ मन्हारे कान्हा मन्हारे कान्हा। देखी कां नेणारे मन्हा कान्हारे॥ २॥ तान्हा मराठा देश। मन्ही बागलाणी भाष॥ ३॥ घटि पटि विजार। खंडे भाले तरवार॥ ४॥ बापरखुमादेविवरु जाण। ऐसे मन्हा कान्हा॥५॥

१५९. मज तुरंबा कां वो जिये तिये। जेणें वेधें हरि सोयरा होये। मज लावा कां वो चंदन ऐसिये परीचे। जे लाविलियाचि अनादि पुसोनि जाये वो॥१॥ मज करा कां वो कांहीं एक। जेणें करणें ठाके अशेख। सरा कांवो मज आडुनि मज पाहों द्या। आपुलें मुखगे माये॥२॥ मज श्रृंगारा कां वो तया जोगी। पुढती अंग न समाय अंगी। या मना पासोनी पढिये तो गोंवळु। तोचि तो जिव्हारीं भोगीनगे माये॥३॥ देह पालटा वो तयासाठीं। वरच या देईन अवघी सृष्टी। बापरखुमादेवीवरा विठ्ठलास योगी। तोचि तो त्यागुन भोगीये माये॥३॥

१६०.तुजविण येकली रे कृष्णा न गमे राती। तव तुवां नवल केलें वेणू घेऊनि हातीं। आलिये तेंचि सोय तुझी वोळखिलें गती॥१॥ नवल हें वालभरे कैसें जोडलें जिवा। दुसरें दुरी ठेलें प्रीति केला रिघावा॥२॥ पारुरे पारुरे कान्हा झणे करिसी अव्हेरु। तूं तंव हृदयींचा होसी चैतन्य चोरु। बापरखुमादेवीवरा विठो करि कां अंगिकारु॥३॥

१६१. जळधराच्या धारीं सिंधुजळ जयापरी। पुरोनिया उरे महावरीरे गोवळा॥ तेजें शोकलें काईं आणावया गेलें। तैसी नवल तुझी कुसरीरे गोवळा॥१॥ चाळा लाउनि गोवितोसी दाऊनियां लपसी। लपोनि केऊता जासी तैसी माव न करी आम्हासिरे गोंवळा॥२॥ वायु काय वोखट चांग विचारूनी वाजे। तयाविण कवण ठावो असे॥ तो आपुलि चाडा करि कोडिवरी येरझारा। सेखीं गगनीं सामावला दिसेरे गोंवळा॥३॥ आकाश तेंचि अवकाश तुजमाजि हें विश्व कीं तूं विश्वीं अससी। बापरखुमादेवीवरा विठ्ठला न बोले। तुझें वर्म बोलतां निकरा झणे जासीरे गोंवळा॥४॥

१६२. लेकुरें नसतील काय घरोघरीं काय न वीये ते माया। परि हे दशा वेगळी न बाईहो। हा

न ये त्या आधीं जीव निघों पाहे। आला तरी उरो नेदि कांहीं। जाय तरी जाय। डोळे तळमळिता ठाये। लांचावला जिऊ। राहेगे बाईये॥१॥ तमाळनिळें चांदिणें वो वारि वोवराल आपुलीयेस बये। हें मूळदृष्टी पुढें रिघोनिया झाडा घेत आहे। येणें कान्हयें कासाविस केलेंगे माये॥२॥ नेणो कैसे बाळसें। डौरलें डोळां लासे। माजि महुरजता हे हांसे। भोळिवेचे। देखिलियाचि पुरे। घालुनि दृष्टीचें भुरें। मग तें हृदयीं वावरे। इच्छावसेंगे माये॥३॥ थुरथुर करितु। शक्ति भोळी वाचालतुं। मुग्द्लें गुणें बोलतुगे माये॥ असाबतु सावळिया प्रभा डोळसु नभाचा गाभा। कटीं कर ठेऊनियां उभा। हेंचि जाणगे माये॥४॥ पाहों याची नवलपरी। बरवेपणाची हाउली वरी। दृष्टी करवी झोंबवी। यासि कवण वारी॥ आम्हीच साहातों अळी। परी हे चुबडी भली। रिघोनिया आड घाली। अगंकांतीगे माये॥५॥ पहा वो याचा खेळु आमचे नासे। कोपो तरी खदखदां हांसे। जी जी बाळा म्हणों तरी रुसे वो॥ राहो नेदी सुखें। न राहे निमिष एके। वारा कां गोडी सेविखें। कान्हो दिठीचें माये॥६॥ आतां येईल म्हणोनि सांपडऊं द्वारें। आडऊं तंव झळाळित दिसताहे उजियेडें। भितरींच्या भितरी लांबा धुमाळु चाचरु। मांडी कामापाडीं आवारुगे माय॥७॥ गाऱ्हाण्याचें निमिसें। गौळणी उचंबळता हे ब्रह्मरसें। वान वसे चोपसें। कृष्णाचेनि॥ मालाथुन एक मोहरें। देवपण धाडिलें अनुरे। भावो किं देवों बैसवाल धुरें। पुसे निवृत्तिदासु॥८॥

१६३. आधाराचक्रीं निवणें मांडिलें कैसां डेरिया उपचार केला। तिन्ही संयोग गोमटें घुसळण रविबजो मेरु वो। तेणें आणलें समयातें तेथें वरुवचन लाधलें निरुतें वो॥१॥ विद्यापात्रें गौळणी मंथन करूं ब्रह्मज्ञानी वो। चाल निज निज पंथें कैसें नवनीत आणिलेंसे हाता वो॥ध्रु०॥ गुरुउपदेशें रवि धरी अधऊर्ध्व मांजरी पांचै प्राण मंथन केलें निरुतेंवो। ईडा पिंगळा कुंडलणीया ब्रह्मसूत्र दोरु तो आणिया वो। उभी राहोनि गगनीं अनुहातें अंबर गर्जे वो॥२॥ मन एकतत्वीं करी वो। चित्त दृढ धरी वो। तयामाजि न विसंबे कांहा। ऐसा गोरसु चोखटु। मोलेंविण येतसे फुकटु। यासि न वचे कांहीं। चित्त बैसे समरसें ठाईवो॥३॥ गौळणी गोमटी हातिं कसवटी क्षीरा नीरा निवाडा करी वो। मेघडंबर न विसंबे तेथें घुसळितां थेंबु जो नुसळे वो। जन पाडलेसे धंदा गोरसा गोडी नेणती अंधे वो॥४॥ काया हे नगरी गौळणी गोरसु पुकारी नवहि दारवंटे सांडुनि वो। दशवेद्वारीं पातली कैसी विनटली गोविंदींवो। दंभ विकरा जाला अधर्म धर्म लोपला वो। अवघी काया झांकुळली बापरखुमादेविवरा विठ्ठलीं वो॥५॥

१६४. ज्ञान हेंचि गाय दुध दुहिलें भरणा दोही तया जना हातु नाहीं। ठेविलें अग्निवरी अग्नि नाहीं भीतरी। तापलें पडिभरी साय आली॥१॥ गौळणी चतुरे झडकरी। जाय मथुरे विकरा करी॥२॥ दहियामहियाविण घातलें विरजण। मांडिलें घुसळण रवियेवीण। करिती मंथन वरी आलें जीवन। एकलें आणून काढूं पाहे॥३॥ आलें गिऱ्हाईक। न विकी तूप ताक। नेणती विवेक। गोरसाचा॥ दहियामहियाच्या करुनी घागरी। लटकी उंबरा उबरी। काय करूं॥४॥ ज्ञान हे घागरी। वाईयेली शिरीं। गोरसभीतरीं दाखवितो। एके हातें सावरी। झाकी तया वरी। चोखटिव करी। गोरसाची॥५॥ तंव मार्गी जातां। एकी पुसे गौळणी। पारि बैसले दानीं किं। नाहीं वो। त्यासी नेदीं मी दान। जाईन मी आपण। प्रत्यक्षा प्रमाण। काय करूं॥६॥ ऐसी पाराजवळी गेली। तंव शब्दें वोळखिली। जावों दे गा वहिली। उसिरु जाला॥ या निर्वाणींच्या बोला। सुखिया संतोषला। निरोप दिधला। गौळणीसी॥७॥ ऐसी पावली मथुरा। क्षण न लगे विकरा करा। सर्वेंचि एकसरा। उफखा झाला॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु ग्राहिक मानसीं गोरसु ज्ञानेंसि। मिळोनि गेला॥८॥

१६५. चालतां लवडसवडी। बाहुली मुरडली। माथां गोरसाची दुरडी। जाय मथुरे हाटा॥ सवेंची विचारी जिवीं। महियाते सादावीं। तंव तो अवचिती पालवी। नंदनंदनु॥ पाहेपां सुखाचेनि मिसें। झणी करी अनारिसे। तेव्हां उरलें तें कैसें। माझें मनुष्यपण॥ विनवी सखीयातें आदरें। तुह्मीं गुह्याचीं भंडारे। अघटित घडिलीं या शरीरें। प्रगटीत न करा साजणी वो॥१॥ काय करणें वो काय करणें वो। देखोनी सांवळा तनु। लुब्धला माझा मनु। लागलेंसें ध्यानु। द्वैत निवडे ना। डोळा भरूनिया बाळा देखे श्रीरंगु सांवळा। वेध वेधल्वा सकळां। गोपी गोविंदा सवे॥ ठेला प्रपंचु माघारा। भावो भिनला दुसरा। पडिला मागिल विसरा। कैचें आपुलेंपण॥ सहज करितां गोष्टी। पाहातां पडिली मिठी। जाली जन्में साठी। सखियेसाजणी वो॥२॥ ऐसें सोसितां सोसणी। सखी झाली विरहिणी। आतां मथुरा भुवनीं। मज गमेल कैसें॥ सरलें सांजणें विकणें। निवांत राहिलें बोलणें। पूर्ण गोरसा भरणें। माथा त्यजूनिया॥ जाली अकुळाचें कुळ। तनु जाते बरळ फिटलें भ्रांतीपडळ। दोन्ही एक जालीं॥ बापरखुमादेविवरीं। अवस्था लाऊनि पुरी। भावें भोगूनी श्रीहरी। मन मुक्त साजणी वो॥३॥

१६६. दुडिवरी दुडि साते निघाली। गौळणी गोरसु म्हणों विसरली॥१॥ गोविंद घ्यावो दामोदर घ्यावो। तव तव बोलती मथुरेच्या वो॥२॥ गोविंद गोरसु एकचि नांवा। गोरसु विकूं आलें तुमच्या गांवा॥३॥ बापरखुमादेविवर विठ्ठलेंसी भेटी। आपुले संवसाटी करूनि ठेला॥४॥

१६७. रांगतु रंगणीं चोरितु लोणी धांवोनि धरिती गौळणी। बांधतिचरणीं देति गाऱ्हाणीं यशोदे साजणी। दधि घृत भक्षून तमाळनीळें नवल केलें साजणी॥१॥ कृष्ण आळिवा आळिवा। परतोनि मातें दावा॥ध्रु०॥ कृष्णा कान्हा मधूसूदना कामिनी मनमोहना। योगि ध्याना हरस्मरणा। गोपी ध्याना। मानिती कान्हा। बोलती यमुना॥२॥ नेणवसी नेणवसी। आकळु तूं नाकळसी॥ध्रु०॥ इंद्रनिळा श्रुति जनकिरळा। सुरी जघन सांवळा। कंठीं माळा कौस्तुभ गळा। प्रीति तुळसी दळा। कांसे शेला सोनसळा उभा बळिभद्राजवळा॥३॥ कृष्ण सांवळा डोळसु। सहजे परमहंसु॥ध्रु०॥ सदानंदा श्रीमुकुंदा। श्रीहरि परमानंदा। आनंदकंदा। अभय प्रल्हादा। पावकनादा धेनुलुब्धा। गोविंदा गोपाळा॥४॥ कृष्ण आमुचा आमुचा। खेळिया गौळियाचा॥ ध्रु०॥ कर्पुरगौरा मन स्थिरा। पुराण गुणगंभिरा। विरादिवीरा महाविरापांडवदळ साहाकारा। मथुरा नगरा कंसासुरा। शिक्षा लाविसी चाणुरा। अति सुंदरा तूं पेंडारा॥ बापरखुमादेविवरारे॥५॥ जाणितलें जाणितलें माझें मज दिधलें॥ध्रु०॥

१६८. कान्हया गोवळु वारिलें न करी। दसवंती सांगे नंदा अवधारी॥ चौघी माया श्रृंगार करिती। तेथें विघ्नेश्वरु जाले मुरारी॥१॥ आनंदें दोंदिलु नाचे गदारोळें। पायीं घागूरलि नेंवाळें॥ चर्मचक्षू पडले वेगळे। काढूनियां ज्ञानचक्षु दिधलें डोळेगे बाईये॥२॥ गौळणी दाहा बारा मिळोनि सोळांची टोळी। एकी म्हणती यातें उभाचि कवळु मा काय करिल ते गौळणीगे बाईये॥३॥ आणिकी एकी साचा बोले त्याउपरी असे त्या नागिणी। काय सांगों तिचेविण बहुसाल ते राहिलीसे भानुते धरूनी॥४॥ तव मुक्ता दोन्ही आलिसे धांवोनि म्हणती कृष्णा तूं निघ येथुनि। तीन नानावि तुझा पाठींच लागतील औठावे राहे धरूनि॥५॥ गौळणी म्हणती बाळा कान्हारे। वेल्हाळा सांडीरे। या मना आळारे। ऐसें ऐकोन बापरखुमादेविवरें विठ्ठलें पवनु गिळितया वेळारेरे॥६॥

## विरहिणी.

१६९. माझी शंका फिटले। लाजा सांडिले। आवघे घातलें। मज निरसुनियां॥१॥ अठरा भार वनस्पती। सुरवर वोळंगती। देवोदेवि आदिपती।

कृष्ण काळागे माये॥२॥ ऐसा कृपानिधि सांवळा। कीं बापरखुमादेविवरु गोंवळा। त्याचा मज चाळा। बहु काळागे माये॥३॥

१७०. पांचा दामांचा घोंगडा नेसेन। उरली मोट ते मी जेविनगे बाईये॥१॥ कामारि कामारि कामारि होऊन। या गोपाळाचें घरीं रिघेन गे बाईये॥२॥ त्याचा उंबरा उसिसा करीन। वरि वेरझार मी सारीनगे बाईये॥३॥ निवृत्ति ज्ञानदेवा पुसतिल वर्म। त्यासि कामीन पुरेनगे बाईये॥४॥

१७१. जागृती पुसे साजणी। कवण बोलिलें अंगणीं। निरखितां वो नयनीं। वृंदावनीं देखियला॥१॥ मनीं वेधु वो तयाचा। पंढ- रीरायाचा॥२॥ स्वप्न सांगे सुषुप्ती। असे ममता हे चित्तीं। विठ्ठल होईल प्रतीती। मग गर्जती तुर्ये॥३॥ मग बोलों नये ऐसें केलें। मन उन्मनीं बोधलें। बापरखुमादेविवरु विठ्ठलें। थितें नेलें मीं माझें॥४॥

१७२. सांवळिये बुंथी सांवळिया रूपें। सांवळिया स्वरूपें वेधियेलें॥१॥ काय करूंगे माये सांवळें न सोडी। इंद्रियां इंद्रियां जोडी एकतत्त्वें॥२॥ कैसें याचें तेज सांवळें अरुवार। कृष्णीं कृष्ण नीर सतेजपणें॥३॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचे खुणे। सांवळेची होणें यासी ध्यातां॥४॥

१७३. श्यामाचिया घरा वासना पैं नेती। मनें मन गुंती तये रूपीं॥ बिंबाचें रूपस छाया पै घनदाट। दिननिशीं अविट श्यामतेज॥१॥ तें रूप देखिलें कोण्या भाग्ययोगें। निवृत्तिप्रसंगें आम्हां घरीं॥२॥ दिठिवेचेनि वोपें सानुलें स्वरूप। नुराली वालिप कल्पनेची॥ सांठवले आकार इंद्रियांच्या वृत्ति। श्यामतेजें दिप्तीं धवळलें॥३॥ निराशा संचली आशा पै सार। अनादी अमर तनु जाली। बापरखुमादेविवर विठ्ठलीं गळालें। ब्रह्मसुख सोहळे आम्हां घरीं॥४॥

१७४. मनें करुनि कुटिल उकलुनि श्रृंगारें। ते लावण्याच्या अपारें पडिलें वो माये॥१॥ माझें कुटिळपण गेलें कुटिळपण गेलें। गोविंदें वोजाविलें निजरूप वो माये॥२॥ बापरखुमादेविवरु माझें कुटिळ फेडूं आला। विटेवरी मालाथिला निजरूपें वो माये॥३॥

१७५. येणेंरूपें पाहावासी तरि असुमाय होसी। माझ्या मना नाकळसी सांवळ्या॥१॥ सगुणपणाची तुझी पडिलिसे मिठी। केली जीवा साटी सांवळ्या। वेधला जिऊ माझा सिकवाल काई। सगुणें ठाईं वेधियेलें॥२॥ ये अंगणीं अवचिता देखिला बोलता। कोण ऐसा निरुता न कळेगे माये॥ सगुण म्हणौनि धरूं गेलें पालवीं। तंव नवलपणाची ठेवी प्रगट केली॥३॥ आंतु बाहेरी कांहीं नकळे वो मज। आपआपणया चोज वाटोनि ठेलें॥ बापरखुमादेविवरें माझें मीपण चोरुनि नेलें। आपणा ऐसें केलें बाईयांवो॥४॥

१७६. कृष्णें वेधली विरहिणी बोले। चंद्रमा करितो उबारागे माये। न लवा चंदनु न घाला विंजणवारा। हरिविणें शून्य शेजारुगे माये॥१॥ माझे जिवींचें तुम्हीं कां वो नेणा। माझा बळिया तो पंढरीराणा वो माये॥२॥ नंदनंदनु घडी घडी आणा। तयाविण न वचति प्राण वो माये॥ रखुमादेविवरु विठ्ठलु गोविंदु। अमृतपानगे माये॥३॥

१७७. सांवळे परब्रह्म आवडे या जिवा। मनें मन राणिवा घर केलें॥१॥ काय करूं सये सांवळें गोंवित। आपेआप लपत मन तेथें॥२॥ बापरखुमादेविवरु सांवळी प्रतिमा। मनें मनीं क्षमा एक जालें॥३॥

१७८. पैल विळाचियें वेळीं। आंगणीं उभी ठेलिये। येतिया जातिया पुसे। विठ्ठल केउतागे माये॥१॥ पायरऊ जाला संचारु नवल। वेधें विंदान लाविलें म्हणे विठ्ठल विठ्ठल॥२॥ नेणें तहान भूक। नाहीं लाज अभिमान। वेधिलें जनार्दनी। देवकीनंदना लागोनीगे माये॥३॥ बापरखुमादेविवरु जिवींचा जिवनु। माझे मनिंचे मनोरथ पुरवीं कमळ नयनुगे माये॥४॥

१७९. निळिये निकरें कामधेनु मोहरे। निळेंपणेसरे निळे नभीं॥१॥ घुमत घुमत निळेमाजि मातु। निळेपणीं देतु क्षेम कृष्णीं॥२॥ निळिये सागरीं निळे निळेपणें सुंदरी। रातलीसे हरि विरहिणी॥३॥ ज्ञानदेव सांगे निळियेचे बागे। निळसंगे वोळलेगे निळीमाजी॥४॥

१८०. मग मुरडूनि घातले मनानें। थोर मारु तेथें होत असे॥१॥ पुरे पुरे वो आतां जिणें तें केउतें। येणें वो पंढरिनाथें वेधियेलें॥२॥ नचले नचले कांहीं करणें कामान। याचें पाहाणेंचि विंदान कामानिया॥३॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलासी भेटी। संसाराची तुटी जालीगे माये॥४॥

१८१. निळियेच्या निशीं विरहिणी पिशी। शेजबाजे कैशी आरळ शेजे॥१॥ कृष्णासंगे वाली विव्हळ जाली निळी। चंदन अंगीं पोळी विरहज्वरें॥२॥ ज्ञानदेव प्रेम निळारूप रूपसें सोहळा॥ कृष्णवेधें वेधली वो लाभली वसे॥३॥

१८२. गुणाचेनि आटोपें आकारलें ब्रह्म। भक्तभाग्य सम आलेंसे॥१॥ चैतन्य परिपाठीं ठासा घडलासे साकार। कृष्णचि आकार गोकुळीं रया॥ त्या रूपें विधिलें काय करूंगे माये। नाम रूप सोय नाहीं आम्हां॥२॥ सबाह्य सभोवतें चतुर्भुज सांवळें। सर्वभूतीं विवळे कृष्णरूपें॥ हारपले आकार कृष्णचि क्षरला। वेदांसि अबोला श्रुतीसहित॥३॥ ऐसें परब्रह्म सांवळें दैवत आमुचे। आतां आह्मां कैचें क्रिया कर्म॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु दैवत। मनें घर तेथें चरणीं केलें॥४॥

१८३. सांवळी प्रतिमा घेऊनि सकुमार। खेळत सुंदर गोकुळीं रया॥१॥ त्या रूपें वेधिलें काय करूं माये। अवघें निर्गुणचि होय पाचारीतां॥२॥ मीपणा ठाव नुरेची पैं सर्वथा। प्रपंचाची कथा ब्रह्म जाली॥३॥ बापनिवृत्तिराजे दावितातीं खुण। नाम नारायणा पाठ कीजे॥४॥

१८४. आजि शुभ लवे लोचनु हरिखे सांगतांहे शकुनु स्वप्न देखिलें सुंदरी। अळंकार लेववा चंदन चर्चावा जाति जुती पार्यातिके शेंवती करा आइती सेजारीं॥ शेला काढा कां मेचुचा हा दिन दैवाचा। सोहळा तो आमुचा मंदिरींगे माये॥१॥ गुढिया उभवा मखरें श्रृंगारा भेटी होईल आळंगी। स्फुरण आलें बाहीं क्षेमालागीं पाहीं काचोळी न समाये अंगींगे माये॥२॥ जिवीं जीव सुंदर त्याचेनि सचार तो मज भेटवा सुखाचा विसावा। सुमनें उकलिलीं नित्य दे माळी उचित करि तथा भावा। आजि वेळु कांवो लाविला नेणों पंथीं सीणला बुझाऊं जाऊं त्याच्या गांवागे माये॥३॥ हृदयीं निर्भर प्रेम वारंवार माझें चित्तीं राहो ऐक्य मज। दुजिये वस्तुलागीं रुत जाय माधवी मन्मथ करिताहे वोज। ऐसी तेथवरी जाईन सुखाची होईन नाचेन आनंदाचे भोजेंगे माये॥४॥ ऐसा विपरीत लाघवी लपे सवेंचि दावी वसिपे चौके। अभ्यासें अंतर पडलें येणें तरि मी त्यजीन जिणें म्हणोनि विनवितसें चतुर सुरेखें। रात्रीचा ठायीं देख मेघशाम बोलला अंबरीगे माये॥५॥ ऐसिये निवांत मूर्ति ऐकोनि ठेली श्रुती। आकर्षोनि चित्तचैतन्य भरोनि ठेले लोचन॥ ध्यानीं विसर्जिलें मन परमात्मया रामा तूं एक लाघवी सावेव पावलें ज्ञान। बापरखुमादेविवरा विठ्ठला सुमन संयोगीं आजी सत्य जालें माझें स्वप्नगे माये॥६॥

१८५. त्रिभुवनिंचें सुख पाहावया नयनीं। दिनरात्रीं धणी न पुरे माझी॥१॥ विटेवरी सांवळा पाहतां पैं डोळां। मन वेळोवेळां आठवितु॥२॥ सागरीं भरीतें दाटे तैसें मन नटे। वाट पाहों कोठें तुझी रया॥३॥ बापरखुमादेविवरु पूर्ण प्रकाशला। कुमुदिनी विकासला तैसें जालें॥४॥

१८६. मायबापें आमचीं विठोबा रखुमाई निजाची। त्याचीये गांवींची कोण्ही येतु न्यावया॥१॥ माझा विसावा माहेर पंढरपूर वो। ऐशी वाट पाहातसे जरु॥२॥ ये सासुरा आमुची बहु बाहरु। काम क्रोध मद मत्सरू। मज आटिती दीरु॥३॥ अहंकार खेदिताहे भावा। दंभ प्रपंच

या जावा। येरुनु येरा घालिती हेवा। आपुल्या सवा ओढीतसे॥४॥ आवो चिंतेवोही निके वोढाळे। तुज मज ठायींचें वेगळें। वोढूनि नेसी आपुल्या बळें। तुझ्या सळें नांदतसे॥५॥ आशा लागलीसे सर्पिणी। ग्रासूं पाहातसे पापिणी। रामनामाचिया ध्वनी। आइकों नेदीये श्रवणीं॥६॥ माझें सत्वबळारथीं। धीरु धर्म हा सांगाती। संतीं सांगितलें निवृत्ती। तरी मी जीवें वांचलिये॥७॥ ऐसी दगदगल्यें सासुरवासा। विठोबारखुमाई माझा कुवासा। निवृत्ति दासु तयाचा। जन्मोजन्मीं वोळगणा॥८॥

१८७. पंढरपुरींचा निळा लावण्याचा पुतळा। विठो देखियेला डोळां बाईयेवो॥१॥ वेधलें वो मन तयाचियां गुणीं। क्षणभर विठ्ठलरुक्मिणी न विसंबे॥२॥ पौर्णिमेचें चांदिणें क्षणक्षणा होय उणें। तैसें माझें जिणें एक विठ्ठलेंविण॥३॥ बापुरखुमादेविवरु विठ्ठलुचि पुरे। चित्त चैतन्य मुरे बाईये वो॥४॥

१८८. पैल तो गे काऊ कोकताहे। शकूनगे माये सांगतसे॥१॥ उडरे उडरे काऊ तुझे सोन्यानें मढीन पाऊ। पाहुणे पंढरीराऊ घरा कैं येती॥२॥ दहिंभाताचीं उंडी लाविन तुझ्या तोंडी॥ जीवा पढिये त्याची गोडी सांग वेगीं॥३॥ दुधें भरूनी वाटी लावीन तुझे वोंठीं। सत्य सांगे गोठी विठो येईल कायी॥४॥ आंबयां डाहाळीं फळें चुंबी रसाळीं। आजिचेरे काळीं शकून सांगे॥५॥ ज्ञानदेव म्हणे जाणिजे ये खुणें। भेटती पंढरीराणे शकुन सांगे॥६॥

१८९. सुखाचिये गोठी सुख आलें भेटी। तया लाभाचिये साठीं जीव वेचिलागे माये॥ तंव अवचितें सगुणरूप भरलेंसें नयनीं। बोलतां अंगणीं म्यां वो देखियेलें॥१॥ जिवाचा जीऊ माझा भेटवा यादवराजा। उचलल्या चारी भुजा देईल क्षेम॥२॥ न करा उपचार न रंगे हें मन। दृष्टिपुढें ध्यान ठसावलें। आवडी गिळूनि येणें सुख विहरोनी ठेले। चित्त माझे गोविलें गोवळेनी॥३॥ आतां भरोवरी उरवितां नुरे उरी। आनंदें अंतरीं कान्हो संचरला॥ बापरखुमादेविवरु विठ्ठल निर्गुण। तो सुखाची सांठवण गिळूनि ठेला॥४॥

१९०. घनु वाजे घुणुघुणा। वारा वाजे रुणुझुणा। भवतारकु हा कान्हा। वेगीं भेटवा कां॥१॥ चांदवो चांदणें। चापेवो चंदनु। देवकी नंदनु। विण नावडे वो॥२॥ चंदनाची चोळी। माझें सर्व अंग पोळी। कान्हो वनमाळी। वेगीं भेटवा कां॥३॥ सुमनाची सेज। सीतळ वो निकी। पोळे आगिसारिखी। वेगीं विझवा कां॥४॥ तुम्हीं गातसां सुस्वरें। ऐकोनि द्यावीं उत्तरें। कोकिळें वर्जावें तुम्हीं बाइयांनो॥५॥ दर्पणीं पाहातां। रूप न दिसे वो आपुलें। बापरखुमादेविवर विठ्ठलें। मज ऐसें केलें॥६॥

१९१. जीवाचिया जीवा प्रेमभावाचिया भावा। तुज वांचूनि केशवा अनु नावडे॥१॥ जीवें अनुसरलिये अझून कां नये। वेगीं आणा तो सये प्राण माझा॥२॥ सौभाग्यसुंदरु लावण्यसागरु। बापरखुमादेवीवरु श्रीविठ्ठलु॥३॥

१९२. मी माझें म्हणतां ठकचि ठेलिये। आपुले जाति कूळ विसरूनि गेलिये॥१॥ गुणाचा दुकाळ पडिला देशीं। निर्गुणासी कैसी रातलिये॥२॥ बापररखुमादेविवरु विठ्ठलु सये। सेजारासी नये काय करूं॥३॥

१९३. अवचिता परिमळु झुळकला अळुमाळु। मी म्हणे गोपाळु आलागे माये। चांचरती चांचरती बाहेरी निघालें। ठकचि मी ठेलें काय करूं॥१॥ मज करा कां उपचारु अधिक ताप भारु। सखिये सारंगधरु भेटवा कां॥ध्रु०॥ तो सांवळा सुंदरु कासे पीतांबरु। लावण्य मनोहरु देखियेला॥ भरलिया दृष्टि जंव डोळां न्याहाळी। तव कोठें वनमाळी गेला गे माये॥२॥ बोधोनि ठेलें मन तंव जालें अने [illegible]। सोकोनि घेतले प्राण माझेगे माये। बापरखुमादोविवरु विठ्ठल सुखाचा। तेणें

कायामनेंवाचा वेधियेलें॥३॥

१९४. पेंडारा दाऊनियां थोकसी। देखिलें पण केविं जाये अंग लपविसी। तरी वेधा काय करिसी। मा शहाणपण तुझें नव्हेरे गोंवळा॥१॥ आम्ही येकविध जीवें तुवा केलें अधातुरें वर्षावो वोसरलिया बोल्हासु जाय तैसी न होत प्रेमळ उखरे गोंवळा॥२॥ देखी गुंफलिया फुलें डाळलिया आहाच तंव कांहीं न दिसेरें। परि घ्राणा इंद्रियांच्या अंगसुखा समर्थ कोण असेरे गोंवळा॥३॥ या बोला मानवोंनि बापरखुमादेविवरे विठ्ठलें दिधलें आप आपणियातें। तैंपासुनि तें लपणेंचि पारुषले उभा पंढरिये येणें वेषेंरे गोंवळा॥४॥

१९५. जातिकुळ माझें गेलें हारपोनि श्रीरंगावांचुनी आनु नेणें॥१॥ किती वो शिकवाल मज वेळोवेळां। मी तया गोवळा रातलिये॥२॥ अष्टभोग भोगणें माते नाहीं चाड। भक्तिप्रेम गोड लेईलेंगे माये॥३॥ बापरखुमादेवीवरु जीवींचा जिव्हाळा। कांहीं केलिया वेगळा नव्हेगे माये॥४॥

१९६. ज्याचिये आवडी संसार त्यजिला। तेणें कां अबोला धरिलागे माये॥ पायां दिधली मिठी घातली जीवें गांठी। साऊमा नये जगजेठी उभा ठेलागे माये॥१॥ भेटवा वो त्यासी चरण झाडीन केशी। सगुणरूपासि मी वो भाळलिये॥२॥ क्षेमालागीं जीउ उतावेळ माझा। उचलोनि चारी भुजा देईन क्षेम॥ कोण्या गुणें कावो रुसला गोवळु। सुखाचा चाबळू मजसी न करीगे माये॥३॥ ऐसें अवस्थेचें पिसें लाविलेसें कैसें। चित्त नेलें आपणिया सारिसेंगे माये॥ बापरखुमादेविवरें लावियेलें पिसें। करूनि ठेविलें आपणिया ऐसेंगे माये॥४॥

१९७. देऊनियां भेटी मजसी न करी गोठी। लांचावला जीउ पाठी न राहेवो। निष्ठुर म्हणो तरी अपंगीतो मातें। व्यापूनि जीवातें उरी उरवितो॥१॥ तो दाखवावो माये धरिन त्याचे पाये। तयालागीं जीऊ आहे उतावेळु॥२॥ भेटीचेनि सुखें मनचि होय मुकें। तें रूप देखें परि बोलावेना॥ सगुण गुणाचा म्हणोनि घातली मिठी। तंव तो आपणया समसाठीं करूनि ठेलें॥३॥ काय नेणों कामाण कैसें वो जालें। चित्त चोरुनि नेलें गोवळेनें॥ बापरखुमादेविवरु विठ्ठले अंग लपवूनि। चैतन्य चोरुनि नेणों माये॥४॥

१९८. सुख सेजारीं असतां कळि जाली वो पाहतां। देठु फेडूनि सेवतां अरळ केलें॥१॥ अंगणीं कमळणी जळधरू वोले करी। वाफा सिंपल्यावरी वाळून जाये॥२॥ मोतियाचें पाणी वाहे निळिये सारणी। गुणाची लावणी लाऊनि गेला॥३॥ अंगणीं वोळला मोतें वरुषला। धन्य दिवसु जाला सोनियाचा॥४॥ चोरट्या मधुकरा कमळीं घेतलासे थारा। मोतियांचा चारा राजहंसा॥५॥ अंगणीं बापया तूं परसरे चांपयां असुवीं माचया भीनलया॥६॥ वाट पाहे मीं येकली मज मदन जाकली। अवस्था धाकुली म्हणोनिया॥७॥ आतां येईल ह्मण गेला वेळु कां लाविला। सेला जो भिनला मुक्ताफळीं॥८॥ बावन चंदनु मर्दिला अंगीं वो चर्चिला। कोणें सदैवें वरपडा जाला वो माये॥९॥ बापरखुमादेविवरु माझे मानसींचा होये। तयालागी सये मी जागी सुती॥१०॥

१९९. प्रभा कळिकादीप शून्याकार हें स्वरूप। मुनिजनमानसींचें सुख येकलेपणें॥ बिंब अर्धबिंब अर्धमार्तृका तुर्या नातळे ज्यासी। आनु तो दिठी केविं धरावा। गुणातीत निर्गुणीं जे सहजीं सहजची सगुणीं विखुरेरया॥१॥ आपआपणिया पडे माय विसरु। मज आवडे तो नंदाचा कुमारुगे माये॥२॥ म्हणौनि डोळियाचे अंजन आणि मेघःशाम बुंथीचें दर्शन। निडारलें वृत्ति नयन पाहों जावो। तेथें तो अनुमतें नलगे मतांतरें भावें देखणे होय देवोरया॥३॥ डोळ्याचा डोळसु विचरे हा परेशु तोचि परमात्मा सर्वी असे। बापरखुमादेविवरु विठ्ठलु उघडा पुरविला सौरसुगे माये। आम्हां जितांचि मरणें किं मेलिया कल्पकोटी जिणें। निवृत्तीनें

दाविला परेशु रया ॥ ४ ॥

२००. भेटिसी गेलीये तंव तीच जालिये। भुलली ठेलिये मज न कळे कांहीं। परतलिया दृष्टी जंव मागुता न्याहाळी। तंव काळी ना सावळी मूर्ति चोजवेना ॥ १ ॥ काय सांगो माये न कळे तयाची सोये। येणें मनाचे मोडुनि पाये वेधियेलें ॥ २ ॥ आंतु बाहेरी कैसी भरलेनि रंगें। क्षेम देऊं गेलें अंगें तंव तो जडूनि ठेला ॥ वारितां नावरे काय सांगो माय गोटी करूनि ठेला साठीं जीवित्वेसी ॥ ३ ॥ आशेचिये हावे तंव तो परतीचा धावे। निराशेसी पावे वेळु न लागतां। बापरखुमोदीववरु विठ्ठलीं उपावो। ज्ञानदेवा भावो निवृत्तिपायीं ॥ ४ ॥

## गाईच्या रूपकानें हरीचें वर्णन

२०१. आधी चरे पाठी प्रसवे। कैसी प्रतिदिनी गाभास जायेरे। विउनियां वांझ जालीरे। ती उन्हाळा मासां वोळलीरे कान्हो ॥ १ ॥ दुहतां पान्हा न संवरेरे। पैल पर्वता सुटले झरेरे कान्हो ॥ २ ॥ मोहें वाटायाच्या चाडेरे। दोहीं तयावरि पडेरे। वत्स देखोनि उफराटी उडेरे। तया केलीया तिन्ही बाडेरे कान्हो ॥ ३ ॥ तिहीं त्रिपुटी हे चरतां दिसेरे। तिहीं वाडियां वेगळी बैसेरे। ज्ञानदेव म्हणे गुरुतें पुसारे। ते वोळतां लयलक्ष कैसेरे कान्हो ॥ ४ ॥

२०२. गावी तिचें निरंजनीं वाडेरे। तीसवें पाडेरे। तिनें दैत्य मारिले कुवाडेरे गाईचें सांगतां बहुत कुवाडेरे कान्हो ॥ १ ॥ ते सांग पा धेनु कवण रे। तिसी नाहीं तिन्हीं गुणरे कान्हो ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुरे। ते उभी पुंडलिकाचे द्वारींरे कान्हो ॥ ३ ॥

२०३. तिही त्रिपुटीचे वाडेरे। सवालक्ष चरावया जायरे। ते दैत्यापाठी हुंबरत लागेरे। भक्ता घरीं दुभे सानुरागेरे कान्हो ॥ १ ॥ तिचें नाम शांभवी आहेरे। तिची रूपरेखा कायरे कान्हो ॥ २ ॥ येकी चौमुखी गाय पाहेरे। तिचा विस्तार बहू आहेरे। तिच्या नाभिकमळीं जन्म वासु सांगेरे। तिसी आदि पुरुषु बापमायेरे कान्हो ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु पाहींरे। ते भक्ता ओळली आहेरे। ते दोहतां भरणा पाहेरे। चारी धारा वर्षत आहेरे कान्हो ॥ ४ ॥

२०४. काळी कोसी कपिला धेनुरे। तिचें दुभतें काय वानुरे। तिसी बापमाय दोन्ही नाहींरे। ते असक्रिया वेगळी पाहेरे कान्हो ॥ १ ॥ ते अखरीं चरेरे। सर्वसाक्षी वरती जायरे कान्हो ॥ २ ॥ पैल येकी सहस्त्रमुखीरे। तिहीहूनि येकी आहेरे। तिचीं नावें अनंत पाहेरे। तिसी बापमाय कोणरे कान्हो ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरी विठ्ठली पाहेरे। ते पुंडलिकाचे द्वारीं जायेरे। तिचें दुभतें अपरंपाररे। तें दुभतें सहस्त्रधारीरे कान्हो ॥ ४ ॥

२०५. आगरींचे क्षीर सागरीं पैल डोंगरी दुभते गायरे। दोहों जाणे त्याचे दुभतें जेवित्याची मेलि मायरे ॥ १ ॥ कान्हो पाहालेरे कान्हो पाहालेरे नवल विपरित कैसें। जाणत्या नेणत्या झांसा पै चतुरा लागलें पिसें ॥ २ ॥ पाणियानें विस्तव पेटविला। वारियानें लाविली वाती। आपें आप दीप प्रकाशला। तेथें न दिसे दिवस रातीरे ॥ ३ ॥ खोकरीं आधन ठेविलें। तेथें न दिसे माझी भाक। इंधनाविण पेटविले। तेथें चुलि नाहीं राख ॥ ४ ॥ जाणत्या नेणत्या झांसा। पैल चतुरा बोलिजे ह्याळीं। निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले ढिवर पडिले जाळीं ॥ ५ ॥

२०६. साई खडियातें घेवोनिया माते। तैसा संसारातें येत रया ॥ १ ॥ सोय ध्यान उन्मनि पांचांची मिळणी। सत्रावीचे कानीं गोष्टी सांगे ॥ २ ॥ दुभोनिया खडाणि नैश्वर्य ध्याय गगन। चेतलिया मन क्षीर देत ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं समभाव त्रिगुणी नाहीं ठाव। आपेआप राणिव साई खडिया ॥ ४ ॥

## एकविध

२०७. काय करिसी सकळ देवांचें वैभव विलास। माझिया स्वामीविण ते अवघे उदास रया ॥ १ ॥ तपन त्या कमळा कमळीं विकाशु। सुकवि मयंकुरा करिसी अरे बा सुधांशु ॥ २ ॥

सातही वारांचे दिवसु एकियाचि सुरिजे। तैसें सर्वा सर्वपण माजीयेन श्रीराजे॥३॥ सर्वज्ञ सुंदर देव होतुकां भलतैसे। परि जडातें चेष्टविते आणिकां पै नसे॥४॥ जया नांव नाहीं रूप चिन्ह काहीं। नामरूप चिन्ह स्वयेंचि पाहीं॥४॥ बापरखुमादेविवरु आहे तैसाचि पुरे। काय करिसी आणिकां देवांचीं गोवारें रया॥५॥

२०८. पूर्वदिशे भानु उगवला नळनी कमळणी विकासु केला। उष्णकरु अस्तु जाला सीतकरु प्रवर्तला कमळणी संकोचु केलाग बाईये॥१॥ पढियंते मानसीं बहुवसे। असे दुरी तें जवळीच वसे रया॥२॥ दोलक्षीं सोम अंबरीं। त्याचे गुण उमटती सागरीं। अंवसे कळाहीनु येरु दिसे अंधारीं। तैसा समंधु ये शरीरीं रया॥३॥ गगनीं वोळली घनुचरें तेणें क्षितिवरी नाचती मयूरें। सोम शीतळपणें कळा मिरवी अमृत घेवों जाणती ते चकोर रया॥४॥ वोळलीं स्वातीचीं अंबुटें तें तत्व झेलिती शुक्तिका संपुष्टें। येरें नक्षत्रें वरुषती निकटें काय जळ तयाचें वोखटें रया॥५॥ चातकु चंद्रातें चिंतितु। तो तयाचे मनोरथ पुरवितु। बापरखुमा-देविवरुविठ्ठलु तो मी सदां असे हृदयीं ध्यातु रया॥६॥

२०९. पतीचा जिव्हाळा म्हणोनि सासुऱ्याचे साहिजे। येऱ्हवीं वाहिजे चामाची मोट॥१॥ न पाहे वास न धरी मनीं आस। वायां निकण भुस काय उपणिसी॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि पुरे॥ चाड नाहीं आम्हां दुजेविण॥३॥

## ज्ञानेश्वरमहाराजांचा बुद्धिरूपी सखीशीं संवाद

२१०. ममता पुसे सये जिवशिवा ठाव। पूर्णता पाऱ्हाये कोणे घरीं॥१॥ ऐके सखिये पुससी बाईये। परब्रह्म सामाये पुंडलिका॥२॥ नाहीं यासी ठावो संसार पै वावो। एकतत्वीं रावो घरीं वसे॥३॥ बापरखुमादेविवरु उदार वोळला। विश्वजनपाळा ब्रीद साजे॥४॥

२११. चित्तींचें चैतन्य रूपीचे अनुकार। रूप असे साचार नयनांमाजी। तेजाचें तेज दीपीं कळिका सामावे। दीपक माल्होवे तेज तेजीं॥१॥ काय सांगो सखिये तेज पै अढळ। इंद्रियें बरळ देखतांची॥२॥ घनदाट रूपीं एकरूप तत्व। दीपीं दीपसमत्व आप दिसे। निराकार वस्तु आकार पै अपार। विश्वीं चराचर बिंबलीसे॥३॥ प्राण प्रिया गेली पुसे आत्मनाथा। कैसेनि उलथा गुरुखुणे॥ बापरखुमादेवीवर विठ्ठलीं उपरति। रूपीं दीपदीप्ति एक जाली॥४॥

२१२.प्राणासवें सखि आत्मा हा बिंबला। सवेगुणी निमाला याच्या वृत्ति॥ ध्यान गेलें ठायां मन गेलें सुखा। नयनीं नयनसुखा अवलोकीं॥१॥ तेंचि सखि रूप वोळखे स्वरूप। विश्वीं विश्वरूप एका तेजें॥२॥ द्वैत पै नाहीं दिसे अद्वैत सुरवाडु। एक दीपें उजेडु सर्वा घटीं। विराल्या कामना अमूर्त परिपाठीं॥ चैतन्याची दृष्टी उघडली रया॥३॥ सखी ह्मणे सुख प्राणासि भुललें। आत्मपणें मुकलें काय करूं। बापरखुमादेवीवर विठ्ठलें रूप। दाऊनि स्वरूप एक केलें॥४॥

२१३. प्राणाची पै सखी पुसे आत्मयासी। ईश्वरीं ध्यानाची वृत्ति गेली॥ पांगुळल्या वृत्ति हरपली भावना। निमाली कल्पना ब्रह्मीं रया॥१॥ हें सुख साचार सांगे कां विचार। आत्मयाचें घर गुरुखुणें॥२॥ चेतवितें कोठें गुंफलें सगुण। निर्गुणीं पै गुण समरस॥ तें सुख अपार निळीये वेधलें। कृष्णरूप देखिले सर्वांरूपीं॥३॥ या ध्यानीं गुंफलें मनामाजि वेख। द्वैतभानसुख नाठवे मज॥ अद्वैत घरकुलें गुणाचें पै रूप। मनामाजि स्वरूप बिंबलें रया॥४॥ विस्मृति गुणाची स्मृति पै भजन। दृष्टादृष्ट जन ब्रह्मरूप॥ याचेनि सुलभे नाठवे संसारु। ब्रह्मींचा आकारु दिसत असे॥५॥ वेगी सांग ठसा कोण हें रूपडें। कृष्णचि चहूंकडे बिंबलासे। बापरखुमादेवीवरु विठ्ठल सखी। कृष्णरूपीं सुखी तनु जाली॥६॥

२१४. तत्वता पै तत्व धरितां नये हातां। मग ममतेची चिंता तयासि पुसे॥१॥ बाई कोणे घरीं सांगे वो जिवित्व। परेचें परतत्व कोणे घरीं॥२॥ सखी सांगे गोष्ठी बाईये रूप वो धरीं। आपणचि घरीं सांपडेल॥३॥ निवृत्तीनें खुणें सांगितलें ज्ञान। रखुमादेविवर ध्यान विठ्ठल वरदा॥४॥

२१५. येऊनि वऱ्हाडिणी बैसल्या टेकी। कोण तो नोवरा नाहीं वोळखी॥१॥ मी कवणाची मज सांगा कोण्ही। वऱ्हाड आलिया वऱ्हाडिणी॥२॥ कवण ते वरमाय कवण तो वरबाप। कवण तो नोवरा कवण तो मंडप॥३॥ वऱ्हाड नव्हे स्वप्नगे माये। बापरखमादेविवराचे वेगी धरावे पाये॥४॥

## संतपर

२१६. अखंड हरि वाचेसी। जरी सुकृताची राशी। तरीच हरि ये मुखासी। धन्य जन्मासी तो आला॥१॥ देखता ज्याचे चरण। यम जातसे शरण। ऐसें सुकृताचें वर्णन। कवणें करावें तयाचें॥२॥ तोचि एक साधु देखा। नित्य पुसावें त्या विवेका। तो कांहीं न धरी शंका। हरिनाम म्हणतसे॥३॥ ज्ञानदेवी निजसूत्र। तोचि धन्य शुद्ध पवित्र। हरिवांचूनि त्याचें वक्र। नेणें आणिक दुसरें॥४॥

२१७. आनंदलें वैष्णव गर्जती नामें। चौदाही भुवनें भरलीं परब्रम्हें॥१॥ नरोहरि हरि हरि नारायणा। सनकसनंदनमुनिजनवंदन॥२॥ गातां गातां नाचतां। प्रेमें उल्हासें। चराचरींचे दोष नाशियलें अनायासें॥३॥ हरि मनीं हरि चित्तीं हरि अंकु शरीरी। तयातें देखोनि हरि चाऱ्ही बाह्या पसरी॥४॥ अंघ्रिरेणु ज्याचा उद्धरितो पतिता। प्राकृत वाणी केविं वानूं हरिभक्ता॥५॥ तीर्थे पावन जिहीं धर्म लेला घडौती। कैवल्यकल्पद्रुम ते त्रिजगतीं॥६॥ मत्स्यकूर्मादिक ज्याचे महिमेसी आले। धन्य वैष्णव तेज रविशशिसीं पाहालें॥७॥ बापरखुमादेविवरा पढियंती जीया तनु। तया संताचरणीं स्थिर हो कां मनु॥८॥

२१८. श्रवणें कीर्तनें जाले ते पावन। सनकादिक जाण परम भक्त॥१॥ जाली ते विश्रांति याचकां सकळां। जीवीं जीवनकळा श्रीमूर्तिरया॥२॥ पादसेवनें आक्रूर जाला ब्रह्मरूप। प्रत्यक्ष स्वरूप गोविंदाचें॥३॥ सख्यपणें अर्जुन नरनारायणीं। सृष्टि जनार्दनीं एकरूप॥४॥ दास्यत्व निकट हनुमंतें केलें। म्हणोनि देखिले रामचरण॥५॥ बळि आणि भीष्म प्रल्हाद नारद। बिभीषणावरद चंद्रार्क॥६॥ व्यास आणि वसिष्ठ वाल्मिकादिक। आणिक पुंडलिकादि शिरोमणी॥७॥ शुकादिक योगी रंगले श्रीरंगी। परिक्षितीचा अंगीं ठसावलें॥८॥ उद्धव यादव आणि ते गोपाळ। गोपिकांचा मेळ ब्रह्मरूप॥९॥ अनंत भक्त राशी तरले ते वानर। ज्ञानदेवा घर चिदानंदीं॥१०॥

२१९. संत भेटती आजि मज। तेणें जाला चतुर्भुज। दोन्ही भुजा स्थुळीं सहज। दोन्ही सूक्ष्मीं वाढल्या॥१॥ आलिंगनीं सुख वाटे। प्रेम चिदानंदीं घोटे। हर्षे ब्रह्मांड उतटे। समुळ उठे मीपण॥२॥ या संतासी भेंटतां । हरे संसाराची व्यथा। पुढता पुढती माथां। अखंडित ठेवीन॥३॥ या संतांचे देणें। कल्पतरुहूनि दुणें। परिसा परीस अगाध देणें। चिंतामणि ठेंगणा॥४॥ या संतापरीस उदार। त्रिभुवनीं नाहीं थोर। मायबाप सहोदर। इष्टमित्र सोईरे॥५॥ कृपाकटाक्षें न्याहाळिलें। आपुल्यापदीं बैसविलें। बापरखमादेविवरे विठ्ठलें। भक्तां दिधलें वरदान॥६॥

२२०. भाग्याचा उदयो किं दैवाचि गति। मज जोडली संगती संताची॥१॥ माझें मीच भांडवल घेउनिया निगुती। लाभाची गति श्री विठ्ठलु॥२॥ देशदेशाउरा न लगेची जाणें। ठाईच जोडणें एक्या भावें॥३॥ खेपखेपांतर अनेक सोशिलें। मुदल उरलें लेखा चारी॥४॥ मुदल देउनि वाणेरा फेडिला। उत्तीर्ण जाला दोही पक्षी॥५॥ चौघे साक्ष देवउनि अंतरीं। वेव्हार ज्ञानेश्वरी खंडियला॥६॥

२२१. आकार उकार मकार करिती हा विचार। परिविठ्ठलु अपरंपर न कळे रया॥१॥ संताचे संगति प्रेमाच्या कल्लोळा। आनंदें गोपाळामाजिं खेळे॥२॥ बाळे भोळे भक्त गाताती साबडें। त्यांचें प्रेम आवडे विठोबासी॥३॥ बापरखुमादेविवरू परब्रह्मपुतळा। तेथिल हे कळा निवृत्ति जाणे॥४॥

२२२. शर्करेची गोडी निवडावया भले। साधु निवडिले सत्संगती॥१॥ सत्संगें प्रमाण जाणावया हरी। येर ते निर्धारी प्रपंचजात॥२॥ भानुबिंब पाहा निर्मळ निराळा। अलिप्त सकळ तैसे साधु॥३॥ ज्ञानदेव हरि जपोनि निर्मळ। सदा असे सोज्वळ निवृत्तिसंगें॥४॥

२२३. सोळा कळि चंद्र पूर्णिमे पूर्ण बोधु। संतजना उद्बोधु सागरन्यायें॥१॥ नित्यता पूर्णिमा हृदयीं चंद्रमा। आलिंगन मेघश्यामा देतु आहे॥२॥ ज्ञानदेवा मोहो नि:शेष निर्वाहो। रूपीं रूप सोहं एका तेजें॥३॥

२२४. खळें दान देसी भोक्तया सांपडे। ऐसें तुवां चौखडें रूप केलें॥१॥ ज्ञान तेंचि धन ज्ञान तेंचि धान्य। जालेरें कारण ज्ञानदेवा॥२॥ तळवटीं पाहे तंव रचिलें दान अपार। वेदवक्ते साचार बुझावले॥३॥ सा चार आठरे भासासी। उपरति भूसि निवडली॥४॥ मोक्ष मुक्ति फुका लाविली तुवां दिठि। तुझा तूं शेवटीं निवडलासी॥५॥ निवृत्ति केलें तुवां ज्ञाना। ब्रह्मीब्रह्म अगम्या रातलासी॥६॥

२२५. आवेगे ज्ञानजननी ज्ञाना आईगे। ज्ञाननाथेगे ज्ञानें कामधेनु तूं माझीयेगे॥१॥ ज्ञानई तूं माय माझीगे। ज्ञानाई तूं बाप माझागे॥२॥ ज्ञानाई गुरुदेव ज्ञान ध्यान। साधन परत्रपावन॥३॥ इह तुजवांचून आन मज कोणगे। बाई नुपेक्षीगे ज्ञानबहिणी॥४॥ राउळीचे कऱ्हे हारपले हाटीं। माणुसप्रति झाडा घेताती वोठी॥५॥ नवल विपरीत देखिलें सृष्टीं। माणुसप्रति झाडा येतातिवोटी॥६॥

२२६. उंच पताका झळकती। टाळ मृदंग वाजती। आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचें॥१॥ आले हरीचे विनट। वीर विठ्ठलाचे सुभट। भेणें जाहले दिप्पट। पळति थाट दोषांचे॥२॥ तुळसीमाळा कंठीं। गोपीचंदनाच्या उटी। सहस्त्र विघ्नें लक्ष कोटी। बारा वाटा पळताती॥३॥ सतत कृष्णमूर्ति सांवळी। खेळे हृदयकमळीं। शांति क्षमा तया जवळी। जीवेंभावें अनुसरल्या॥४॥ सहस्त्र नामाचे हातियेर। शंख चक्राचे श्रृंगार। अतिबळ वैराग्याचे थोर। केला मार षड्वर्गा॥५॥ ऐसें एकांग वीर। विठ्ठल रायाचें डिंगर। बाप रखुमादेवीवर। तींही निर्धारी जोडिला॥६॥

२२७. कुंचे पताकाचे भार। आले वैष्णव डिंगर। भेणें पळती यमकिंकर। नामें अंबर गर्जतसे॥१॥ आले हरिदासांचे थाट। कळिकाळा नाहीं वाट। विठ्ठलनामें करिती बोभाट। भक्तां वाट सांपडली॥२॥ टाळ घोळ चिपळिया नाद। दिंडि पताका मकरंद। नाना बागडियाचे छंद। कवच अभेद नामाचें॥३॥ वैष्णव चालिले गर्जत। महावीर ते अद्भुत। पुढें यमदूत पळत। पुरला अंत महादोषा॥४॥ निवृत्ति संत हा सोपान। महा वैष्णव कठीण। मुक्ताबाई तेथें आपण। नारायण जपतसे॥५॥ ज्ञानदेव वैष्णव मोठा। विठ्ठल नामें मुक्तपेठा। स्नान दान घडे श्रेष्ठा। वैकुंठ वाटा संत गेले॥६॥

२२८. पूर्वजन्मीं सुकृतें थोर केलीं। तें मज आजि फळासि आलीं॥१॥ परमानंदु आजि मानसीं। भेटी जाली या संतासी॥२॥ मायबाप बंधु सखे सोयरें। यांते भेटावया मन न धरे॥३॥ एक एका तीर्थाहूनि आगळे। तयामाजि परब्रह्म सांवळे॥४॥ निर्धनासि धनलाभु जाला। जैसा अचेतनीं प्राण प्रगटला॥५॥ वत्स विघडलिया धेनु भेटली। जैसी कुरंगिणी पाडसा मीनली॥६॥ हें पियुष्या परतें गोड वाटत। पंढरिरायाचे भक्त भेटत॥७॥ बापरखुमादेविवर विठ्ठलें। संत भेटतां भवदु:ख फीटलें॥८॥

२२९. आजी सोनियाचा दिनु। वर्षे अमृताचा घनु॥१॥ हरी पाहिलारे हरी पाहिलारे सबाह्यभ्यंतरीं अवघा व्यापक मुरारी॥२॥ दृढ विटे मन मुळीं। विराजीत वनमाळी॥३॥ बरवा संत समागमु प्रगटला आत्मरामु॥४॥ कृपासिंधु करुणा कर। बापरखुमादेवीवर॥५॥

## सद्‌गुरु निवृत्तीनाथाचे प्रसादानें प्राप्त झालेल्या स्थितीचा विचार

२३०. कापुराचे कळीवर अनळाचा मरगळा। भेदोन द्वैताचा सोहळा केविं निवडों पाहे॥१॥ बोलु अखरीच वळला भीतरी नाहीं आला। तो केविं विठ्ठला पावेजी तुम्हां॥२॥ मन बुद्धीसी जें आद्य तयासी जें वेद्य। कळिकाळा कवळेना संधि जडोनि जाये॥३॥ वाचाळपणें परा येवो न ल्हाये दातारा। अनुभवो भीतरा बाहेजु वेडावला॥४॥ निरयदृष्टी ती खोली येऊनी राहे बुबुळीं। लवण ठाव घेऊनी जळीं केवि निवडों पाहे॥५॥ निवृत्तिदासु तेथें निवृत्ति करुनी पातें। श्रीगुरुनिवृत्तिनाथें पुढें केलें॥६॥

२३१. व्यक्ताव्यक्त दिठी घालूनि कल्पांता कल्पना नुरोचि तेथें आतां॥१॥ पाहाणियाचा प्रपंचु पाहता। निमाला कवणा बोलु ठेऊं आतां॥२॥ दुजें ह्मणो जाय तंव मी माजी हारपे। नवर्णवे तुझी सत्ता रया॥ गोडियेचें गोडपण गोडि केविं मिरवे। तुजमाजी असतां ते वेगळीक रया॥३॥ निशीं जागरणीं निमाला कीं तंतुचि तंतीं आटला। रसीं रसु दुणावला तुझ्या ठाई॥४॥ तेथें कल्पनेसि मूळ विरोनियां पाल्हाळ। तैसें उभय संदीं तूं विदेहीरया॥५॥ या लागीं बापरखुमादेविवरु विठ्ठलु उदारु दिठीचे दिठीं माजी अंजन। सुखीं सुख दुणावलें चौघा पडिलें मौन्य। येणें निवृत्तिरायें खुणा दाऊनियां सकळ। डोळ्यांविण दिठी प्रबळ रया॥६॥

२३२. अनुभव खुण मी बोले साजणी। निरंजन अंजन लेईलें अंजनी॥१॥ गुरुमुखें साधन जालें पै निवृत्ति। तत्वसार आपणचि जाली निवृत्ति॥२॥ बापरखुमादेंविवरा विठ्ठल कृपाचित्तें। पुंडलिका साधलें प्रेम तत्त्वार्थे॥३॥

२३३. पदोपदीं निजपद गेलें वो। कर्म संचित सकर्म जालें वो॥१॥ तेथें आपुलें नाठवे कांहीं वो। आपआपणा न संपडे डाईवो॥२॥ श्रीगुरुप्रसादें ज्ञान बोधु झाला वो। नव्हे तें ठाउकें पडिलें माय वो॥३॥

२३४. इवलेंसें रोप लाविलें द्वारीं। त्याचा वेल गेला गगनावरी॥१॥ मोगरा फुलला मोगरा फुलला॥ फुलें वेंचिता अतिभारुकळियांसि आला॥२॥ मनाचिये गुंती गुंफियेला शेला॥ बापरखुमादेविवर विठ्ठलीं अर्पिला॥३॥

२३५. प्रकृतीचें पूजन प्राप्तीविण जाण। प्राप्ति सिंचन दोन्हीं वायां गेलीं॥१॥ पूजन कवणा करूं सिंचन कवणा करूं। नाहीं नव्हे तें धरूं गुरुमुखें॥२॥ रखुमादेविवर गुरुमुखा भ्याला॥ होता तो लपाला नाहीं ते ठाई॥३॥

२३६. जन्मा आवर्ती येरझारी फिटली। ब्रह्मसमदृष्टी जाली गुरुमुखें॥१॥ भागल्याचा सिणु भागल्यानें नेला। भाग्योदय जाला भाग्येविण॥२॥ रखुमादेविवरु भाग्यें जोडला। जोडोनी मोडला कांहीं नव्हतेपणें॥३॥

२३७. दृश्यादृश्य नातळे स्थूळ प्रपंचभान। तेथें मायेचें कारण हेत नाहीं॥ म्हणोनि ज्ञानविज्ञान कल्पना लक्षण। तेथें सुखासि सुख जाण भोगिताहे॥१॥ नामावांचुनि संवादें निवृत्ति अभेदपदें। निज भजनीं स्वानंदें नवल पाहे॥२॥ तेथें दिवस ना रात्री सर्वहेतुविवर्जितु। स्वयंभासक तूं नवल त्यांचें॥ चिन्मय ना चिन्मात्र वेद्य सर्वगत। स्वसंवेद्य साक्षभूत। आपणवासीं॥४॥ स्वसंवेद्य सन्मुखता भेदु नाहीं आतां। भक्ति आणि परमार्था हेंचि रूप॥५॥ निवृत्तिप्रसादें संपर्केसि बोध। नीत नवा आनंद ज्ञानदेवा॥६॥

२३८. अंतरींच्या सुखा नाहीं पै मर्यादा।

अहंकारें तेणें केविं होय आत्मप्राप्ती। जंव येणें देहें विनीतता शरण गेला नाहीं संताप्रती। बापरखुमादेविवरु विठ्ठलु चिंतितां। सर्व सुखाची होय निजप्राप्ती रया॥४॥

४६०. तोंडें जाले संन्यासु। भोगावरी धावें हव्यासु॥१॥ ते नेणती ब्रह्मरसु। वायां होति कासाविसु॥२॥ ब्रह्मकर्मानें साधु जाती। वायां चुकली तुझी भक्ति॥३॥ सर्वत्र आपणचि म्हणती। अभक्ष्य भक्षण करिती॥४॥ तोडी दंभ माया धंदा। शरण रिघे रे गोविंदा॥५॥ चुकले विठ्ठला उदारा। बापरखुमादेविवरा॥६॥

४६१. विटंबुनि काया दंड धरी करीं। हिंडे घराचारी नवल पाहे। असमाधानी विषयीं विव्हळ। तरी दंडु केवळ काजा काई॥१॥ सिद्धचि असतां कां गा विटंबिसी। संन्यासी तूं जाण कैसा॥२॥ निजाश्रमींच वास संकल्पासी त्यागी। सर्वस्वें वैरागी। तोचि तो संन्यासी। संगीं असंगता तोचि जाण संन्यासी। स्वरूप तयापाशीं जवळी आहे॥३॥ बापरखुमादेविवरु उघडाचि संन्यासी। तोचि पूर्ण भासीं भरला असे। निवृत्तिरायें खुणा दाखविला निरुता। तो जाणण्या परता सदोदितु॥४॥

## खऱ्या त्यागाचें वर्म न कळतां बाह्य गृहादि त्यागयास उपदेश.

४६२. घरदार वोखटें त्यजूं म्हणसी तरी शरीरा येवढें जाड। मायबाप वोखटी त्यजूं म्हणसी तरी अहंकार अविद्येचें कोड॥ बंधु सखे त्यजूं म्हणसी तरी काम क्रोध मद मत्सर अवघड। बहिणी पाठीच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा माया अवघड रया॥१॥ त्यजिलें तें काय कासया म्हणिजे सांग पा मजपांशीं ऐसें। जया भेणें तूं जासी वनांतरा तें तंव तुजचि सरिसें रया॥२॥ स्त्रीं वोखटी त्यजूं म्हणसी तरी कल्पने येवढी भोगती। पुत्र अपत्य त्यजूं म्हणसी तरी इंद्रियांसि नाहीं निवृत्ति। सकळ गणगोत त्यजूं म्हणसी तरी हे अष्टधा प्रकृति। आवघेंचि त्यजूं पाहे म्हणसी तरी मना नाहीं निज शांति रया॥३॥ अवघींचि तुज जवळी दुमदुमित असतां वरीवरी मुंडिसी कां करिसी विटंबना। सहज संतोषें असोनि तैसा जैसा परि तो सद्गुरु पाविजे खुणा। आपुले आश्रमीं स्वधर्मी असतां सर्वत्र एकुचि जाणा। बापरखुमादेविवरुविठ्ठलु इतुकिया साठीं नेईल वैकुंठभुवना॥४॥

४६३. प्रपंचाचें जगड्वाळ दुस्तर जरी मानिसी। त्याग करूनि केउता जासी। जें जें त्यागिलें तें तें तुज माजी। त्यागिलें तें काय सांग आम्हांसी। तुझें तुजचि माजि प्रपंचेंसि तूं सर्वांमाजी वर्तसी। ऐसें जाणोनिया कां विटंबिसी बापा। टाकूनि केउता जासी रया॥१॥ मनेंसि विचारी निर्धारूनि योग करी। तुझें तुजमाजि अरे आतां विचारी बापा। अरिमित्रसम होऊनि मनें हें शुद्ध होय। तेंचि तूं होऊनि राहे जाण बापा॥२॥ बाह्य त्यागिसि तरी तो त्यागुचि नव्हे पालटिसी तरी ते विटंबना। धरिसी तरीचि तो बंधु मोक्ष मागता हे जडपणा। तरि गेलिया जड तो मोक्षाचि नव्हे साचा चुकलासि उगाणा। वृत्तिशून्याकारें अवलोकितां तंव तेणें नव्हें तुज वस्तुज्ञान। ऐसें जाणोनी कां सिणसीरे बापा। हेचि धरुनि राहे निज खुण रया॥३॥ म्हणौनि आतां इतुकें करी। साच तें हें धरी तुझें मन होय तुज अधिकारी। तैं सर्वही त्याग तुज फळती बापा। जैं एकचि होऊनि निर्धारी नलगे सिणणें दंडणें येणेंचि आश्रमभावें ऐसेंचि मनें निर्धारी। बाप रखुमादेविवरुविठ्ठलु चिंतितां सर्व प्रपंचाची जाली बोहरी। निवृत्तिरायें खुणा दाऊनि सकळा। निजीं निजाचे निज निर्धारी रया॥४॥

४६४. आलियाचा संतोष गेलियाची हानी। त्याचा अतिसो वेंचे तयाची काहणी॥ ऐसे संकल्प नाहीं विकल्प देहीं वरि वरि मुंडिलिया होय कांहीं। तरि बहुरूप्याच्या ठाईं काईं काई नटु नसे रया॥१॥ आधीं भीतरी दंडावा पाठी बाहिजु मुंडावा। नाहीं तरी योगभांडिवा कां करिसी रया॥ध्रु०॥ मागितलीया भीक जरि होय

निर्दोष। तरि सणिये रजक काय न मागती॥ देवपणें फुग धरिसील गाढा। तरी वायाविण मूढा सिंतरलासी॥२॥ थिगळी घालोनि गळां म्हणसी न भियें कळिकाळा। तरि काय कर्मा वेगळा कै हो पाहासी॥ योगिया म्हणिजे कैसा भीतरी काश्मिरी जैसा। मीनालिया पदार्थासरिसा होउनी मिळे॥३॥ हृदयीं नाहीं जालेपण क्रोधें भवंडिसी लोचन। अंगीं भस्मउधळण राख राखेल काई॥ खर लोळे उकरडां काय परत्रचिया चाडा। तैसा मठीं बांधोनि मूढा वर्म चुकलासी॥४॥ तीर्थ-व्रत-जपस्नान वाउगें करिसी ध्यान। ऐसें करितां आने आन मार्ग चुकलासी॥ शुद्ध करूनियां मन सेवी निवृत्तीचे चरण। विठ्ठलविठ्ठल म्हण नाहीं तरी नाडलासी॥५॥

४६५. येणेचि आश्रमें नित्यनैमित्यें कर्मे। वर्णाश्रमधर्म त्यागून कोठें जासी। म्हणोनि येकचि विचारी बापा। जेणें सार्थक होय संसारासी। विकल्प नको धरूं। अंतर धरुनि राहे या सगुणासी रया॥१॥ आवडी धरुनी गोडी घेई का ध्यानीं। परतोन मग योनि नाहीं तूज॥२॥ सांडीं सांडीं त्याग नास्तिकाचे मत नलगे करणें अटणें। नानाविधि वाउगे जड कां सिणवणें। केंवीं मन होय शुद्धी। एकलेंचि मन करूनि स्वाधीन। सगुणींचि काय सिद्धि नलभे रया॥३॥ म्हणोनि येकाकारवृत्ति सगुणीं बैसली। प्रीतिचि निर्गुणीचि आर्ति जाण संपदा। याची सांडि मांडी न करी। निरूतें चित्तीं धरी। स्वस्वरूपीं असे सदा बापरखुमादेविवरुविठ्ठलु चिंतितां सुख सगुणींची जोडे आनंदु रया॥४॥

४६६. कां सांडिसी गृहाश्रम। कां सांडिसी क्रियाकर्म। कासया सांडिसीं कुळींचें धर्म। आहे तें वर्म वेगळेंची॥१॥ भस्मउधळण जटाभारु। अथवा उदास दिगंबरु। न धरि लोकांचा आधारू। आहे तो विचारू वेगळाचि॥२॥ जप तप अनुष्ठान। क्रियाक्रर्म यज्ञ दान। कासया इंद्रियां बंधन। आहे तें निधान वेगळेंचि॥३॥ वेदशास्त्र जाणीतलें। आगमीं पूर्ण ज्ञान झालें। पुराण मात्र धांडोळिलें। आहे तें राहिलें वेगळेंचि॥४॥ शब्दब्रह्में होसि आगळा। म्हणसि न भियें कळिकाळा। बोधेंविण सुख सोहळा। आहे तो जिव्हाळा वेगळाचि॥५॥ याकारणें श्रीगुरुनाथु। जंव मस्तकीं न ठेवि हातु। निवृत्तिदास असे विनवितु। तंव निवांतु केंवि होय॥६॥

## मनास उपदेश.

४६७. अरे मना तूं वांजटा। सदा हिंडसी कर्मठा। वाया शिणशीलरे फुकटा। विठ्ठल विनटा होई वेगीं॥१॥ तुझेन संगें नाडले बहू जन्म भोगिताती नित्य कोहूं। पूर्व विसरलें ॐ हुं सोहुं। येणें जन्म बहूतांसी जाले॥२॥ सांडि सांडि हा खोटा चाळा। नित्य स्मरेरे गोपाळा। अढळ राहे तूं जवळा। मेघश्याम सांवळा तुष्टेल॥३॥ न्याहाळितां परस्त्रीं। अधिक पडसीं असिपत्रीं। पाप वाढिन्नलें हो शास्त्रीं। जप वक्त्री रामकृष्ण॥४॥ बापरखुमादेविवर। चिंती पा तुटे येरझार। स्थिर करीं वेगीं बिढार। चरणीं थार विठ्ठलाचे॥५॥

४६८. अरे मना तूं पापिष्टा। किती हिंडसी रे तूं नष्टा॥ सैरा सिणसी रे फुकटा। विठ्ठलविनटा स्थिर होई॥१॥ येणें पैलपार पावसील॥२॥ तूं अनिवार नावरसी। तुझेनि संगें नाडले ऋषी। तूं तंव अपभ्रंशीं पाडिशी। म्हणोनि गेले गुरूसी शरण॥३॥ न सोडी हरिचरण। नाहीं नाहीं जन्ममरण। अविट सेवी नारायण। तेणें मी तूं पण एक सिद्ध॥४॥ ज्ञानदेव शरण हरी। मन हिंडे चराचरी। न सोडी चरण अभ्यंतरी। नित्य श्रीहरी हृदयीं वसो॥५॥

४६९. आजि लाधलें तुमच्या पायीं स्तुति करु काई। हेंचि तुम्हा पाहीं विनवीतसे॥१॥ निवृत्त बाप निवृत्त माये। निवृत्त पाहें विवळलिये॥२॥ देखणें देखिलें तेचि होई पा रे मना। निवृत्तिचरणीं स्थिर राही पा रे जाणा॥३॥

४७०. श्रवण घ्राण रसना त्वचा आणि

लोचन हें तों दैन्याचीं द्वारें वोळगसी। यांचें यांसीचि न पुरे तुज पुरविती काये। यालागीं धरिजेसु आपुली सोयरे बापा॥ १ ॥ अरे मनारे अरे मनारे। न संडीं न संडीं हरिचरण कमळारे॥ २॥ स्वप्नीचें धन तें धनचि नव्हे। मृगजळीचें जळ तें जळचि नव्हे। अभ्रींची छाया ते साउली नव्हे। ऐसें जाणोनिया वेगीं धरिजेसु आपुली सोयरे रया॥ ३॥ तूं जयाचा तेथोनि जिवें जितासी। त्या श्रीहरीतें रे नोळखसी। बापरखुमादेविवरा विठ्ठला चिंतिसी। तेणें पावसी तूं सुखाचिया राशी रया॥ ४॥

४७१. ध्येय ध्याताहे दोन्ही नाहीं। तेथें ज्ञेय ज्ञाता उरे काई॥ १ ॥ अरे मना परापर परतें पाहीं। तें तूं स्वयें आपण पाहें रे मना॥ २॥ रखुमादेवीवरा विठ्ठलाची आण। जरी बुझसी तरी तूंचि निर्वाण॥ ३॥

४७२. सुख आपलें आपण तो पाहे। स्वरूप आपुलें आपण ध्यायरे मना॥ १ ॥ लक्ष निवृत्ति चरणी धीरु राहे। भेदभ्रम सांडी सावध होय॥ २॥ बापरखुमादेविवरु एकचि पुरे। जाणतिल या सर्व सुख मोहरे॥ ३॥

## जनांस उपदेश.

४७३. तैं सत्वरजतमें धुतलिया आशा। वेगीं त्या निराशा फळेवीण॥ १ ॥ तैसें हें टवाळ हरिविण पाल्हाळ। कैसेनि मायाजाळ निरसे रया॥ २॥ त्रिपुटीचे पेठे वानवसा दिठा। वैकुंठ चोहटा पिकला रया॥ ३ ॥ बापरखुमादेविवरुविठ्ठलु साजीरा। मार्गी मार्ग एकसरा नामें तारी॥ ४॥

४७४. स्वप्नींचेनि सुखें मानितासि सुख घेतलिया विख जाईल देह॥ १ ॥ मोलाचें आयुष्य दवडितोसि वायां। माध्यान्हींची छाया जाय वेगीं॥ २ ॥ वेग करी भजनां काळ यम श्रेष्ठ। कैसेंन वैकुंठ पावसील झणें॥ ३ ॥ बापरखुमादेविवरुविठ्ठल उभा। सर्वत्र घटीं प्रभा त्याची आहे॥ ४॥

४७५. बुद्धिमात चित्त धन वित्त गोत। निजानंदें तृप्त करी रया॥ १ ॥ नैश्वर्य ओझें ऐसें तूं बुझें। वायां मी माझें म्हणसी झणी॥ २ ॥ सांडी सांडी मात उभया दुरित। हरिविण हित घेवों नको॥ ३ ॥ ज्ञानदेवा गांग जाले असे सांग। वेगीं श्रीरंग पावले तुज॥ ४॥

४७६. कर्पुर अग्नीसी स्वदेहा नाशी। चंदनीं मासी न थरे देखा॥ १ ॥ घ्राणची कळिका भ्रमर रुंजीका। तेथील झुळुका रुंजी करी॥ २॥ मोतियाचा चारा राजहंसा सैरा। दुजिया पाखिरा काम नये॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे घेती ते शहाणे। येर ते पाहुणे यमाचे रया॥ ४॥

४७७. शाहाणे सिंतरे व्याहाणे मोहरे। भणंग धुरें आतुडे कैसें॥ १ ॥ या अवचित्या गोष्टी भाग्यें होय भेटी। प्रालब्ध सृष्टीं भोग देत॥ २॥ येत जात वाटा शरीरीं भरे फांटा। मदमत्सरताठा भ्रमकुळीं॥ ३॥ ज्ञानदेवो म्हणे या खुणे मी नेणें। पंढरिचे राणे उगविती॥ ४॥

४७८. दीपीं दीप सामावे तेथें कैचा विचारु। राहिला निर्द्धारु नाना मत्ता॥ १॥ जें जेथें होतें तें तेथें नाहीं। परतोनि काई पाहातोसि॥ २॥ मौनाचिये मिठी सगळेंचि नाहीं। तैसा इंद्रियां दाही चोजवेना॥ ३॥ ज्ञानदेवो बोले सामावलें मन। मन नायकती कान तेथील कथा॥ ४॥

४७९. एका पांडुरंगें नव्हेचि पै जोडी। दया गेले ठाया मज आला रहावया। मत्सर गिळावया कुळासहित॥ १॥ क्षमा गेली परती अहंकार सांगती। ते वोढूनियां नेती अघोराशी॥ २॥ गति म्हणे मी थोर प्रवृत्ति निघाला घोर। राहों न शके घरी निवृत्ति तेथें॥ ३॥ ज्ञानदेवो सांगे असे मज पांडुरंगें। लक्ष्मीये रिघे शरण आडवा॥ ४॥

४८०. विष्णुवीण मार्ग घेसील अव्यंग। तरी वायांचि सोंग करणी तुझी॥ १ ॥ येऊनि संसारा वायांचि उजिगरा। कैसेनि ईश्वरा पावशी हरी॥ २॥ नरदेह कैचें तुज होय साचें। नव्हेरे हिताचें सुख तुज॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे शरण रिघणें। वैकुंठींचें पेणें अंतीं तुज॥ ४॥

४८१. कानीं घालुनियां बोटें नाद जे

पाहावे। न दिसतां जाणावें नऊ दिवस॥१॥ भोंवया पाहातां न दिसें जाणा। आयुष्याची गणना सात दिवस॥२॥ डोळां घालोनियां बोट चक्र जें पाहावें। न दिसतां जाणावें पांच दिवस॥३॥ नासाग्राचें अग्र न दिसे नयनीं। तरी तेंची दिनीं म्हणा रामकृष्ण॥४॥ ज्ञानदेव म्हणे हें साधूचें लक्षण। अंतकाळीं आपण पहा वेगीं॥५॥

४८२. जंववरिरे तंववरी जंबुक करी गर्जना। जंव त्या पंचानना देखिले नाहीं बाप॥१॥ जंववरिरे तंववरी वैराग्याच्या गोष्टी। जंव सुंदर वनिता दृष्टी देखिलीं नाहीं बाप॥ध्रु०॥ जंववरिरे तंववरिरे मैत्रत्व संवाद। जंववरी अर्थेसि संबंध पाडिला नाहीं बाप॥२॥ जंववरिरे तंववरी युद्धाचीं मात। जंव परमाईचा पूत देखिला नाहीं बाप॥३॥ जंववरिरे तंववरी समुद्र करी गर्जना। जंव अगस्ती ब्राह्मणा देखिलें नाहीं बाप॥४॥ जंववरिरे तंववरी बांधी हा संसार। जंव रखुमादेविवर देखिला नाहीं बाप॥५॥

४८३. चोराचियासंगें क्रमितां पैं पंथ। ठकूनियां घात करितील॥१॥ काम क्रोध लोभ घेऊनियां संगें। परमार्थासि रिघे तोची मूर्ख॥२॥ बांधोनियां शिळा पोहूं जातां सिंधू। पावें मतिमंदु मृत्यु शीघ्र॥३॥ देहगेहभ्रांती सोडुनीया द्यावें। साधन करावें शुद्ध मार्गे॥४॥ ज्ञानदेव ह्मणे तरीच साधेल। नाहीं तरी चळेल मध्यभागीं॥५॥

४८४. वेदवाणी चांग स्मरतां स्मरण नित्य नारायण हृदयीं वसे॥१॥ तेथिल गव्हर जाणता विरुळा। ब्रह्मीं ब्रह्मकळा साधुमुखें॥२॥ जाप्य जप होम बुद्धि विधान हरि। हृदयीं श्रीहरि न कळे मूढा॥३॥ ज्ञानदेव म्हणे श्रीहरि हृदयस्थ। ऐसी आहे भाष्य वेदशास्त्रीं॥४॥

४८५. कामारिकरुणा करुर्णावव झोंबे। करुनिया बिंबें अलिप्तपणें॥१॥ कामधाम हरि ब्रह्मार्पणव करी। आपणचि कामारी होये हरी॥२॥ चक्षुपक्षपादयुगळ अधिष्ठान। हरिविण करूं नको॥३॥ ज्ञानदेव सोहं मंत्र तंत्र ध्यान। मनाचे उन्मन हरिपायीं॥४॥

४८६. नाद भेद सिद्ध अवघेचि विरुद्ध। जेणें तुटे भेद तेंची जपे॥१॥ सुताचिये गुंजे सुतचि पैं माजे। हरिचरणांबुजें निवडिती॥२॥ रुक्मिणीचा नाहो हाचि पैं उगवो। प्रपंच ते वावो जावो परतां॥३॥ ज्ञानदेवा चित्त हरि गोत वित्त। विज्ञान उचित ज्ञानघनें॥४॥

४८७. चिंतिलें अपैसें पाविजे सायासें। तरी कामा नसे सायास या॥१॥ देखणें स्वप्नींचे भुरें मायेचें। भ्रमित देहाचे हरिविण॥२॥ आयुष्याची पेंठ संसाराचे तट। गुरुविण वाट कैची रया॥३॥ त्रिपुटिसी वर्त्ते वैकुंठ सरतें। प्रेमेंविण भरितें कैसें येत॥४॥ ज्ञानदेवि घर केलें पै सपुर। संसार येरझार हरिचरणीं॥५॥

४८८. दीप दीपिका शशी तारा होतुका कोटिवरीरे। परि नसरे निशि नुगवे दिवसु दिनकरनाथें जियापरीरे॥१॥ नुद्धरिजे नुद्धरिजे नुद्धरिजे गोपाळेंविण नुद्धरिजे॥ध्रु०॥ नगर भ्रमतां जन्म जावो परि प्रवेशु एक्या द्वारेंरे। तैसा यजिजो भजिजो पूजिजो परि उकलु नंदाकुमरुरे॥२॥ सर्वावयवीं शरीर सांग परि विरहित एका जिवेंरे। तैसा धिक् तो श्रोता धिक् तो वक्ता जो वाळिला विठ्ठलदेवेंरे॥३॥ गळित शिर हें कलेवररे उदकेंविण सरिता भयंकररे। रविशशीविण अंबर तैसें हरिविण जिणें असाररे॥४॥ अंतःकरणीं रुक्मिणीरमणु परि त्या श्वपचाहि स्वरूपा बंधन नघडें नघडेरे। येरु यति होकां भलतैसा परि तो भव अगाडीहूनि न सुटे न सुटेरे॥५॥ शिखिपक्षींपत्रींडोळे जेंवि अकाळ जळद पडळेरे। तैसीं गोकुळपाळकबाळेंविण कर्मे सकळेंविफळेंरे॥६॥ यम नियम प्राणायाम प्रत्याहार हे सकळ उपाय परि अपायरे। जंव तमाळनीळ सांवळा हृदयीं ठाण मांडूनि न ऱ्हायेरे॥७॥ मी उत्तम पैल हीनु भूतीं द्वेषाद्वेष ठेलेरे। केलोंनि कर्मे उफकां निफजे सुख तें दुरी ठेलेरे॥८॥ आतां

असोत हे भेदाभेद आम्ही असों एक्या बोधे रे। बापरखुमादेविवरु विठ्ठल निवृत्तिमुनिराय-प्रसादेरे॥९॥

४८९. दुर्लभुरे दुर्लभुरे दुर्लभु संसारु तुम्हीं कां नेणा। आहारनिद्रेसाठीं दवडितां माणुसपणा॥१॥ आड न विहिरी बावि न पोखरणी। सरिता ना सागर कल्पतरू रानोरानीं॥२॥ बा याची खुण ज्ञानदेवो जाणे। तयाचें करणें तैं अधिकचि होणें॥३॥

४९०. धरसील तरी हाति लागे बापा। सोडसील तरी जाईल दिगंतरा॥१॥ जतन करिरे जिवाचिया जिवा। सांगतसे ठेवा जुगादीचा॥२॥ निवृत्तिनिरोप बुझे आपें आप। आधि पुत्र मागें बाप जन्में रया॥३॥

४९१. हे पृथ्वी तुझे लंकेसि आधारुरे रावणा तें त्वां अपराधें बाधकेविण आणिली। नेणो किती वानर पद्में देखतांचि रविशशी गिळिलेरया॥१॥ विरोध न कीजे विरोध न कीजे पाडू न पाहतां मागें करिसि तें नव्हेरे रावणा। प्राणुचि पारखा जालासे गव्हारा जिणें केंवि सिद्धि जाईलरे रया॥२॥ दों भूतांचि दशा जाणोनिरे रावणा तयाचा आगम सागरिं रिघाला। तयाच्या गडे गड मेळउनी सापें डाव शिळीं बाधला॥३॥ हनुमंत वायूचेनि मिसें तो आधींची पाईकी करी। तयाचेनि रोखें हीं रतलीं पंचभूतें उभा राहासि कास्यावरिरे रावणा॥४॥ आकाश तेंचि अवकाश भीतरि आत्माराम आवेशला तुजवरी। तया म्हणोनि बाणजाळ घातलें वरी येरी येरें कवळी वरच्या वरीरे रावणा॥५॥ आतां तुज देहो कैचारे रावणा आत्मा तोचि राम जालारे। बापरखुमादेविवर विठ्ठले चरेना जुंजतां तें काये केलेंरे रया॥६॥

४९२. मी माझे म्हणतां संसारीं गुंतलें। तंव परत्र परतेंचि राहिलें। हे ना म्हणउनि तया झोंबिन्नले तंव सिद्धासिद्ध हातींचें गेलें॥१॥ पुढीला चुकला मागिला मुकला तैसि परी जाली मातें। आपआपणातें गोंवीत बुद्धीं दोष ठेवी कवणातें रया॥२॥ आतां एक बुद्धि आठवली गेलें तें परतेना मागुतें। बाप रखुमादेवीवराविठ्ठलु ध्याईजे तरी सकळिक होईल अपैतें॥३॥

४९३. मृगजळाचा जळीं चाळिसि जळचरें। कैचें जळ तेथें कोठें मत्स्यरे॥१॥ नाथिलिच खटपट करील किती। गगनींचीं सुमनें तुरंबिसि मस्तकीं॥२॥ वांझेचिया सुता रचसिल मारे। कैचा पुत्र तेथें कायि संव्हारे॥३॥ कोल्हैरीचे वारु आणिसिल सावया। कैचा राऊत कोणा जिंकिसील रया॥४॥ ऐसीं नाथिलींचि नाटकें आचरसी किती। ज्ञानदेव म्हणे सहजें निवृत्ति॥५॥

४९४. मृगजळाचे डोहीं मारिसील जळचरें। कैचें तेथें कैचें मत्स्यरे॥१॥ लटकीच खटपट लटकीच खटपट। लटकीचि खटपटरे साळोबा॥२॥ वांझेचिया पुता घालसिल मारे। तेथें कैचा पुत्र मृत्यु कोणा संहारे॥३॥ रोहिणीचे वारु आणिसी सावया। कैचे वारु काय जुंझसी रया॥४॥ स्वप्नींचिया धना बांधिसी कळांतरा। कैंचें धन काय होसी व्यवहारा॥५॥ निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव म्हणे। स्वप्नीचें सुख तें साळया जाणे॥६॥

४९५. वोजावलिया वोढी। वोढी पाडीजे ते नाहीं। ऐसें विचारूनि पाही आपुला मनीं। मग राहिजे सुतत्व निर्वाणीं॥१॥ दुर्लभ दुर्लभ संसार त्यात दुर्लभ माणुसपणा। ये जन्मीं नोळखसी। पशु होउनी जन्मसी। मग तुज सांगेल कवण रया॥२॥ जंव देहीं आहे देवो तव या वेदे त्याच्या लाह्या। मग तुज रात्री जाईल जडभारी। बापरखुमादेविवरु विठोजी पंढरपुरीं। तो वोळगे वोळगे जन्मवरी॥३॥

४९६. आनंदुरे आजि आनंदुरे बाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदुरे॥१॥ एक आणि दोन तीन चारी पांच सहा। इतुकें विचारुनि मग परमानंदीं रहा॥२॥ सातवा अवतार आठवा वेळोवेळां। बापरखुमादेविवरु विठ्ठलु जवळा॥३॥

४९७. निर्जिवां दगडांची काय करिसिल सेवा

तो तुज निर्दैवा देईल काय॥ १ ॥ कवणे गुणें भुली पडली गव्हारा। तीर्थाच्या माहेरा नोळखिसी॥ २ ॥ अष्टोत्तरशें तीर्थे जयाच्या चरणीं। तो तुझ्या हृदयीं आत्मरामु॥ ३ ॥ देह देवळीं असतां जासी आना तीर्था। मुकलासि आतां म्हणे ज्ञानदेवो॥ ४ ॥

४९८. या पिकलिया अमृताची गोडी। केंवि जाणती इतर जन। वाचा बोलिजे सेवितां निवे प्राणुगे माये॥ १ ॥ सुखाचा साचा केंवी बोलिजे। जिवातें केंवि सुईजे॥ २ ॥ अमृतकराचे रश्मी चकोर सेविती। तें सुख कोण कैसें बोलिजे रया॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु भेटलिया। तें सुख कोण कैसें सांगिजे रया॥ ४ ॥

४९९. चुकलीया चुके। आपादिलिया भलें होय। तरी दु:ख दारिद्र भोगी कवण। तरि अवघेंचि विश्व कां सुखी नव्हे रया॥ १ ॥ म्हणोनियां भ्रम सांडी नाथिला। जें जें कांहीं करीन म्हणसी होणार तें होईल। न होणार तें नव्हेल। तूं फुकाचि नाडसी रया॥ २ ॥ होणें न होणें निढळींच्या अक्षरीं। वोरबार करसील काह्या। पाईक वोळगे अठेप्रहर सेखीं दैव तंव आणील ठायां रया॥ ३ ॥ देखणें डोळा ऐकणें कानीं। जिव्हे कडु रस मधुर वाणी श्वासोश्वास हे जयाची करणी। अनुभवी जाणती ज्ञानी॥ ४ ॥ नाथिलाचि धिंवसा करूं पाहासी। दुराशा जवळि असतां। आकाश झोंबतोसी। आतांचे चिंतिलें आतांचि न पविजे। पुंढें कोण जाणे काय पावसी रया॥ ५ ॥ उपजत देहे मृत्युमुखीं पडलें। मी माझें करिसी किती। उठी उठी जागे आपुलिया हिता। बापरखुमादेविवराविठ्ठलाची करी भक्ति रया॥ ६ ॥

५००. सुंदरु राजसु सकुमारु बिंदुलें न साहे ज्यासी। स्वबुद्धि अळंकारला परा ग्रासूनि ठेला मौन्य पडलें या शब्दांसी। पाहों जाय तंव पाहाणेंचि ग्रासी नवलावो काय या सुखासी। न अवलोकवे मना अवधारूनि ध्यानी आतां न विसंबें तुझिया पायासीं॥ १ ॥ हेम अळंकारु भेदु हा काय सगुणीं निर्गुणीं आहे तैसे गुण। गुळाचेनि अंगें गोडीपणें पाहातां न निवडे आतां मी काय करूं॥ २ ॥ म्हणौनि मन समावेश करणें तुझें तुजमाजीं घालणें येणें तुज अळंकारणें मध्यमणी मन चतुष्ट पदीं पदक तेंचि बैसका चोखट मन मनीं रुतलें ठेलें। आवडीचेनि अभ्यासें कोंदलिया दाही दिशा म्हणोनि प्रीति धरी सगुणीं रया॥ ३ ॥ उभारलेनि सिडें जेथें स्वराज्य तारूं न बुडे ऐसें घडें वाडें कोडें तेचि कीजे। जेथें मनासीं कवण स्वप्नीं राज्य रक्षी जाण। आपुलें पारिखें नेणिजे म्हणोनियां आतां। बापरखुमादेवीवरा विठ्ठला शरण जाईजे रया॥ ४ ॥

५०१. उपजलें देह बाळपणें गेलें तुझें तुजचि देखतां तारुण्यपण मत्सरें आटलें आतां वृद्धपणीं कायिसि अवगणी रया॥ १ ॥ कवण्यागुणें चुकी साठीं पडली कासया श्रमलेंसि गव्हारा। सिद्धचि सांडूनी आनेआन जल्पसी तरी न चुकती तुझ्या येरझारा रया॥ २ ॥ अजागळाचे अजस्तन। तेथें कैचें अमृतपान। तैसें काय करिसी वाउगें चिंतन परपीडा जागृती कारण। तरी तयाचिये चरणीं स्थिर ठेवी मन रया॥ ३ ॥ जीवनजळीं ब्रह्मकमळ विकाशलें। आतां पाहे पां तयाचा मेळुरे। ऐसी जीवीं चिंता। तुजवांचूनिया कवण करील आमुचा सांभाळु रया॥ ४ ॥ जीवनजळीं ब्रह्म कमळ विवळे तैसे वाट पाहतां सिणले माझे डोळें। नको नागवे हा संसार नको तूं तंव निवांत निराळा रया॥ ५ ॥ ऐसा जगाचा जीवनु अमूर्त मूर्ति लेईलों डोळां। बापरखुमादेविवराविठ्ठला वांचूनि कोण पुरविल सोहळा रया॥ ६ ॥

५०२. चौऱ्यांसि लक्ष योनि क्रमुनि सायासीं। नरदेहा ऐसें भांडवल पावलासी। जतन करीरे गव्हारा। भजे न भजे या संसारा। बीज सांडूनि असारा वायां झोंबतोसी॥ १ ॥ हातींचिया लागीं भूमि चाळितासी।आप नेणतां तूं पर काय चिंतिसी

मन एक स्वाधीन तरी खुंटलें साधन। सर्व सुखाचें निधानहरि पावसी रया॥ २ ॥ तृणें पशु झकविले ते क्षीरातें। तैसा विषय पाल्हाळें निज चुकलासी। कोटि युगें जन्मवरी। येतां जातां येरझारीं। दुःख भोगिसी दुर्धर रया॥३॥ पुत्रकलत्र भवविभव विचित्र। होय जाय सूत्र तूं आप न म्हण। तुझा तूंचि नाहीं ऐसें विचारूनि पाहीं। चेतवी चोरलासी वेगीं सावध होई रया॥४॥ तुज नाथिलाचि धिवसा। आस्तिकपणाच्या आशा। असते सांडूनि आकाशा। वायां झोंबतोसी। दिवस आहे तो धांवावें। नाहीं तरी फुटोनि मरावे। मृगजळ हें अघवे पाहे रया॥५॥ स्वप्नीं साचचि जोडे। थोडें ना बहुत हातां सांपडे। तुटले प्रीतीचे कुवाडे। ऐसें जाणोनिया शरण जाई निवृत्ति। तो सोडविल संसृति। बापरखुमादेविवरा विठ्ठलाचे भक्ति रया॥६॥

५०३. सुढाळ ढाळाचें मोतीं। अष्टै अंगें लवे ज्योती। जया होय प्राप्ति। तोचि लाभे॥ १ ॥ हातींचें निधान जाय। मग तूं करिसी काय। पोळलियावरी हाय। निवऊं पाहे॥२॥ अमृतें भोजन घडे। कांजियानें चूळ जोडे। मग तये चरफडे। निती नाहीं॥ ३ ॥ अंगा आला नाहीं घावो। तंव ठाकी येंक ठावो। बापरखुमादेविवरा-विठ्ठलु नाहीं॥४॥

५०४. सकुमार साकत कापुरें घोळिली। गोडी परिमळु दोन्ही उरली॥ १ ॥ मित्रत्त्व करा जीवनाहूनि वेगळें। पढियंते आगळें प्रेम जाण॥ २ ॥ तरुमाजी जैसा एक चंदनु। राहिला वेधूनु वनस्पती॥ ३ ॥ बापरखुमादोविवरु जीवींचा जिव्हाळा। कांहीं केलिया वेगळा नव्हेगे माये॥४॥

५०५. असे तें न दिसें। दिसे तें नाहीं होत। यापरि दिसें दिस जुगें जाती परंपार। ऐसें जाणत जाणत तुझें चित्त कां भ्रमित। अझुनि न राहासी निवांत तरि भलें नव्हे॥१॥ सांडीं माया मोह द्वंद्व दुराशा। ज्यालागी शिणसीतें तुजसी उदासा॥२॥ स्वप्नींचे धन तें धनचि नव्हे। मृग जळींचे जळ तें जळचि नव्हे। अभ्रींची छाया तें छायाचि नव्हे। तैसें विषय सुख नव्हे नव्हे रया॥ ३ ॥ स्पर्शे मातंग दीप्तीं पतंग नादें मृग घ्राणें भृंग रसनें मीन या पांचाही विषयीं पांचही मारिलें सेखीं निर्धारूनि पाहातां पांचही तुज पाशीं तुज केवीं निकें होईल रया॥४॥ कापुराचिये मसी मेघ माखीन म्हणसी कापुर कां वायां जाळितोसी। क्षण एका तेथें कापुर नामसी उफका सिण कोठे पाहसी रया॥५॥ उपजतांचि देह मृत्यूच्या तोंडी मी माझें म्हणतां न लाजसी। शरण जाई त्या निवृत्ति। तो तारील संसृति बापरखुमादेविवराविठ्ठलाचिये रया॥ ६ ॥

५०६. उपजोनि संसारीं आपुला आपण वैरी। मी माझे शरीरीं घेऊनि ठेला। या देहातें म्हणे मी पुत्र दारा धन माझें। परि काळाचें हें खाजें ऐसें नेणतु गेला॥ १ ॥ कामक्रोधमदमत्सराचेनि गुणें। बांधला आपण नेणे भ्रमितु जैसा। मिथ्या मोह फांसा शुक नळिके जैसा। मुक्त परि अपैसा पळों नेणें॥ २ ॥ जळचर आमिष गिळी। जैसा का लागलासे गळीं। आपआपणापें तळमळीं। सुटिका नाहीं॥ तैसें आरंभीं विषयसुख गोड वाटे इंद्रियां फळपाकीं पापिया दुःख भोगी॥३॥ राखोंडी फुंकितां दीप न लगे जयापरी। तैसा शब्द ब्रह्मकुसरी ज्ञान न पवे। व्रत तप दान वेचिलें पोटा दंभाच्या खटपटा सिणतु गेला॥४॥ मृगजळाची नदी दुरूनि देखोनि। धांवे परी गंगोदक न पवे तान्हेला जैसा तैसें विषयसुख नव्हेचि हित। दुःख भोगितो बहुत। परि सावधान नव्हे॥५॥ परतोनि न पाहे धांवतो सैरा। करितो येरझारा संसारींच्या। ज्ञानदेव म्हणे बहुतां जन्मांचा अभ्यासु। तरीच होय सौरसु परब्रम्हीं॥६॥

५०७. दुजेपणाचा भावो वायां वाढविसी गव्हारा। उतराई या देहा कैसा होसील। दुजेपणें पाहसी तरि देहीं देवो पाही। सेखीं दुजेपणे नाहीं तूंची येकला रया॥१॥ भ्रांति पडलिया मना नेणसी सुख ब्रह्म चुकलासि वर्म अरे मुढा॥ २॥

ते कल्पिलिया नकळे गुरुकृपे वेगळें। वायांविण उगलें कां धांवतोसि सैरा॥३॥ बापरखुमादेविवरुविठ्ठलु जन्मोजन्मीं वोळगिला अससी तरि ते खुण पावसी निभ्रांतरया॥४॥

५०८. आउट हात आपुले आपण होतासी। येर तें सांडितासी कवणावरी। ऐसेंनि सांडिसी तरी थोडें तें सांडी। कां सकळैक मांडी तेणें सुखिया होसी रया॥१॥ कळिकाळ ते आपण। प्रभा अनु कोण। करितां दीपें लाजिजे। घरामाजी घरकुल करूं पाहासी तें दैन्यचि वाउगें येर सकळैक तूं आहासी रया॥२॥ पृथ्वी येवढा घडु लाघे यावा। मा गगन भरूं जावें अनाठायां। अस्ति नास्ति दोन्ही येकेचि पदीं। आकाशाची भरोवरी घटे केविं कीजे रया॥३॥ धावतां धावतां वेगें। तुजचि तूं आड रिगे पाय खोंवितु खोंवितु मार्ग ठाके काई जासलट ज्या वाही त्याचि सवा पाहीं। वायां तूं हावे जासी रया॥४॥ जागणेंन काय जन्मलासी निजेलेनि काय निमालासी। स्वप्नें काय केलासि तडातोडी। ऐसा जाणत नेणत तेथींचा तेथें आभासत असे तूंचि तूं भल तेथें रया॥५॥ आपला आरोहणीं लाऊ पाहातोसि निशाणी। तरी सांगेन ते वाणी लाविजेसु। श्रीगुरुनिवृत्तिनाथा चरणकमळीं। पाखोवीण होय अलिया म्हणे ज्ञानदेव॥६॥

५०९. ये सातें आलिया वोळंगा सारंगधरु। नाहीं तरि संसारु वायां जाईल रया॥१॥ कवणाचे मायबाप कवणाचे गणगोत। मृगजळवत जाईल रया॥२॥ विषयाचें सम सुख बेगडाची बाहुली। अभ्राची सावुली वायां जाईल रया॥३॥ ज्ञानदेव म्हणे पाहातां पाहलें। स्वप्नींचें चेईलें तैसें होईल रया॥४॥

५१०. स्वप्नींचा घाई विवळें साचें। चेईलिया वरी म्हणे मी न वाचें॥१॥ जन कैसें माया भुलले। आपलें हित चुकले॥२॥ आपींआप देखिलें। परतोन पाहे तों येकलें॥३॥ आपीं आप असे। मी काय जालोंसें लोकां पुसे॥४॥ सकळहि शास्त्र पढिनले। नुगवेचि प्रपंचीं गुंतले बापरखुमादेवीवरा विठ्ठलें। कैसें गुरुमुखें खुणा उगविलें॥५॥

५११. वहिलिया येईरे सौरभ्य घेऊनि जाईरे। तिया इया जिवित्वाच्या लाह्यारे भ्रमरा॥१॥ सुमनाचे जीवन विरुळेविपाये। वियोगु जालिया केहीं न साहेरे भ्रमरा॥२॥ येर सकळिक पाल्हाळरे। बापरखुमादेविवरु सुखाचें निधान रे भ्रमरा॥३॥

५१२. सुखाचिया गोठी आतां किती हो करणें सुखें सुख अनुभवणें ऐसें करी॥१॥ पढियंते बाईये गुणेविण हातां नये। साचेविण सये तेथें आवडी कैची॥२॥ कैसेनि कीजे मनासी रक्षण। भावासी बंधन केवीं घडे॥३॥ बापरखुमादेविवरुविठ्ठलुचि पुरे। सुखीं सुख मुरें ऐसें करी वो बाईये॥४॥

५१३. त्रिभुवना परतें दाविसी दुरी। आधीं तूं आपुली शुद्धी करी। उदयो अस्तु कवणिये घरीं। पिंडा माझारीं सांग बापा॥१॥ जाग्रतीमध्यें कवण जागत। सुषुप्ती मध्यें कवण निद्रिस्त। दोघे भ्रमलिया स्वप्न देखत। जीव कीं मन सांग पा रे॥२॥ जाग्रति वरुन काढीं चेतना। सुषुप्ति मध्यें रिघता ज्ञाना। दोन्ही चेईलिया स्वप्ना। मग अनुवादती कवण॥३॥ इंद्रीयें सूत्रें दारें दाटली। जागत होती तें काय झालीं। सांग पा कवणें ठाई लपालीं। मग मिळालीं कवणे ठाईं॥४॥ शब्दातें नाइकती श्रवण। पहात पहात डोळे जाले हीन। नासाग्रीं ठेवूनियां सुमन। परि नेणिजे परिमळ॥५॥ पाहेंपां येथें अनुवादु काईचा। मी माजी हरपली खुंटली वाचा। ज्ञानदेव ह्मणे सद्गुरु साचा। अढळपदीं बैसविले॥६॥

५१४. परियेसी गव्हारा सादर। कर्मे निर्वंश झाले सगर। भिल्लें विंधिले शारंगधर। झाला पुरंदर सहस्त्र नयन॥१॥ कर्मे मन्मथ झालासे राख। कर्मे चंद्रासि घडला दोष। कर्मे भार वाहती कुर्मशेष। कर्मे खरमुख ब्रह्मा देखा॥२॥ कर्मे वासुकी

लंके दिवटा। कर्मे हनुमंता उदरीं कांसोटा। कर्मे शुकदेव गर्भी कष्टा। पाताळवाटा बळी गेला॥३॥ कर्मे दशरथ वियोगें मेला। कर्मे श्रीराम वनवासा गेला। कर्मे रावण क्षयो पावला। वियोग घडला सीतादेवी॥४॥ कर्मे दुर्योधनादि रणीं नासले। कर्मे पांडव महापंथें गेले। कर्मे सिंधुजळ शोषिलें। नहुष जाला सर्प देखा॥५॥ कर्मातें शंभु मानी आपण। किती पळसि कर्माभेण। बापरखुमादेविवरविठ्ठला शरण। केलीं कर्मे निवारी नारायण॥६॥

५१५. वृंदावनीं वनमाळी। खेळे गोपींसी धुमाळी। मदनमेचूची नवाळी। रसाकाळीं मनोहर॥१॥ तयाचे करी पा स्मरण। आळसु न करी अंतःकरण। भीतरलीया सुमनपण। निहारण होईल॥२॥ बरवेपणाचेनि मिसें देवातें वाणि या सौरसे। जडत्व फिटेल तया सरिसें। रसनें ऐसें चुकों नको॥३॥ तरी हा देवो तूं न्याहाळीपां। पिसाटपण फिटेल बापा। पावन होसी परमस्वरूपा। नेत्री ऐसा चुकों नको॥४॥ वेगीं क्षेम देऊनिया निविजे। ऐसें दैव कैं लाहिजे। जरी तो हृदयीं ध्याईजे। तै पाविजे अंगसुखा॥५॥ मन भ्रमर येकी हेळा। झेपावे पदकमळा। बापरखुमादेविवरा विठ्ठला। होईल जवळा सौरसु॥६॥

५१६. रुणुझुणु रुणुझुणुरे भ्रमरा। सांडीं तूं अवगुणुरे भ्रमरा॥१॥ चरणकमळदळरे भ्रमरा। भोगी तूं निश्चळरे भ्रमरा॥२॥ सुमनसुगंधुरे भ्रमरा। परिमळ विद्गदुरें भ्रमरा॥३॥ सौभाग्य सुंदरुरे भ्रमरा। बापरखुमादेविवरुरे भ्रमरा॥४॥

५१७. परदींपींहूनि सूक्ष्म मार्गे। आलासी पवन वेगें। विंदुनिया। नवमासवरि पेणें केलें मातापुरीं। सोहं सोहं परी। परतेसिना॥१॥ निर्लज्जारे तुज शिकवूं किती। न गमे दिनराती बळिया देवो॥२॥ त्या येउनियां वाटा तुज ऐसें गमलें। कोहं कोहं ठेले प्रकाशत। पुसुनीयां तळ वरी सूदलासी मळ घोरीं। क्षुधा आड उरीं आदळली॥३॥ ऐशीं बाळपणीं सांकडीं। बहु ठेली झडाडी। सडाडां वोसंडी। शांति सैरा। तरुण्याचेंनि भरें वित्तविषयचोरें। बांधिलासि संसारें। हालों नेदिती॥४॥ ऐसा वोस मार्ग पुढें अवघा वेळु पाहला। वारितां वारिता निघाला मारिजसी। पुढें पडलिसे वाट। ते ऐकरे बोभाट। परतले घायवट अर्धजीवें॥५॥ ऐसे पायळ पुढें गेले पांगूळ मागें ठेले पैल तीर पावले परम तत्त्वेंसी। बापरखुमादेविवरु। विठ्ठलु सैरारे सावधु। ज्ञानिया प्रसिद्धु उपदेशितु॥६॥

५१८. वायुनें वळावें धूमें मिळावें अभ्रें पाणिये गळावें। आकाश पोकळ म्हणौनि क्षोभा जाऊं नये। निज चेईलया केउतें पळावें रया॥१॥ निराळ निराळ सहज तें निराळ। तें क्षीरचातका दुभे॥ एक धरुनियेरे सकळिक वावो। मा काय काय तेथें नलभे रया॥२॥ स्तन ना वाहे जयाचिये माये। तें बाळक केहीं न धायेरेरे। दृष्टी वोळलें तेंचि क्षीर जालें। कासविचें गोत्र पाहेरेरे॥३॥ केळि पोकळ ह्मणोनि सांडिसील झणें। तरी फळवरी निवांत राहेरेरे। नाहीं नाहीं म्हणोनि थरारिसि झणें नाहीं तें तेथेंचि पाहीरेरे॥४॥ रत्नाचिया आशा घात जाला तया राजहंसा॥ झणें भुलों नको ते सारेरे॥ द्रोणाचेनि नावें मातिये सळ चढे। होई त्या कोळिया ऐसारेरे॥५॥ बापरखुमादेविवरु हृदयींच्रा जागता। सांडुनि अनु सुखाची कायसी चाड। सिद्धचि सांडुनी अनेआन जल्पसी तरि सहजचि पडिलेंसी द्वार रया॥६॥

५१९. शब्द निर्गुणें भावावें। थितिया सगुणसि मुकावें। वेदद्रोही व्हावें। कां ऐसें किजे। कर्म उच्छेदु करुन। अहंब्रह्म म्हणतां तिथिया सुखासी आंचविजे। कर्मेचि ब्रह्म ऐसें जाणोनि दातारा। हृदयीं सगुण धरुनि राहिजे रया॥१॥ जवळी असतां सांडी मांडी करिसि। वायां सिणसी तुझा तूंचि रया॥२॥ मुळी विचारितां मन देह तंव। कर्माधीन तेथिचें संचित क्रियमाण प्रारब्ध पाहीं। तें ठेऊनि जडाचिया माथां। कीं वेगळें होऊनि पाहातां हें तव तुज नातळे कांहीं। ऐसें निरखूनी पाहातां

सगुण धरुनि आतां। मग तुज विचारितां भय नाहीं॥३॥ हा तंव कल्पनेचा उभारा। मनाचा संशय दुसरा। जेणें घडे येरझारा जन्मांतर। म्हणोनि ऐसें कां सोसावें। एकचि धरुनि राहावें। जेणें चुकती येरझारा। तेचि प्रीति जागृति स्वप्न आणि सुषुप्ति। ऐसाचि हो कां थारा। बापरखुमादेविवरु विठ्ठलु चिंतितां। सुख अंतरीं जोडेल सोयरा॥४॥

५२०. बरवें पाउलें पाउलें। सुंदर सकुमार पाउलें॥१॥ शीतळ हरिचीं पाउलें। गोमटें हरिचीं पाउलें॥२॥ ध्रुवासि उपदेशिले। तेंचि प्रल्हादें स्मरिलें॥ ३॥ उपमन्या प्रसन्न जालें। तेंचि गजेंन्द्रें चिंतिलें॥४॥ अहल्येसि उद्धरिलें। तेंचि द्रौपदिये धांविन्नलें॥५॥ यशोदेनें वोवाळिलें। तेंचि गोवर्धनी रंगलें॥६॥ शकटा अंगीं जें उमटलें। तेंचि बळिपृष्ठीं शोभलें॥७॥ शिवें शक्तिप्रती कथिलें। धर्मराजें तें पुजिलें॥८॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलें । ते विटेवरी दाविलें॥९॥

५२१. बहुतादां वऱ्हाडा आलीसी बाळा। हांसती लोक परी न संडी चाळा॥१॥ एकाचें खाये एकासि गाये। लाज नाहीं तिसी सांगावें काये॥२॥ वऱ्हाडियांच्या भुलली सुखा। सुख भोगितां पावली दुःखा॥३॥ नाथिलें पुसे भलत्यासि रूसे। जयाचें लेणें लेऊनि थोर संतोषें॥४॥ क्षणाचा सोहळा मानिलें हित। आपस्तुति परनिंदेचें गीत॥५॥ कवणाचें वऱ्हाड भुललीस वायां। शरण रिघें रखुमादेविवरा नाह्या॥६॥

५२२. लक्ष लावुनि त्रिपुटी ठाण त्रिभंगी चोखडें। सगुण सांवळें म्हणोनि प्रीति मना॥ तें देखतांचि पडे मिठी दृश्यातें निवटी। मना गांठी विरोनि ठेली॥१॥ जवळिल निधान सांडूनि सिणसील बापा। तरि जन्मांतर न चुकेविजें रया॥२॥ कल्पना काळीमा वेगळी त्यागी। अहंभावाचा मोडी थारा॥ आशा दासी करून नातळे कोठें। नावेक मनकरी स्थिर॥ सगुणीं धरूनि प्रीती। मना हेचि अवस्था। तरि उणीव नये संसारी रया॥३॥ मन हें मूर्तिमंत कीं निर्गुण भासत। पाहतां नाहीं भेदर्थ इंद्रियासी॥ आपलें म्हणोनि एके वृत्ति भजतां। बापरखुमादेविवरुविठ्ठलु ध्यातां हृदयीं सुखें रया॥४॥

५२३. षड्चक्रीं कुंभार घडीतसे मातीं। तैसें मज किती चाळविसी॥१॥ रातीचा दिवसु कीं दिवसाची राती। वावधणी वाती लावितोसी॥२॥ ज्ञानदेव म्हणे अवघेंचि मृगजळ। सांडूनि पाल्हाळ नित्य ध्याई॥३॥

५२४. मलयानिळ शीतळु पालवी नये गाळूं। सुमनाचा परिमळु गुंफितां नये॥१॥ तैसा जाणा सर्वेश्वरु म्हणों नये सान थोरु। याच्या स्वरूपाचा निर्धारु कवण जाणें ॥२॥ मोतियाचें पाणी भरुं नये वो रांजणीं। गगनासीं गवसणी घालितां नये॥३॥ कापुराचें कांडण काढितां नये आड कण। साखरेचे गोडपण पाखडतां नये॥४॥ डोळियांतील बाहुली करूं नये वेगळी। धांवोनि अचळीं धरितां नये॥५॥ विठ्ठलरखुमाईचे भांडणीं कोण करी बुझावणी। तया विठ्ठल चरणीं शरण ज्ञानदेवो॥६॥

५२५. चातकाचे जिवन घनु तरि तो सये एका धिनु। आला वेळु भुलावणु जैसा नळिनि सिना नाहीं भानु॥१॥ चंद्रासवें चकोर मिळोनियां पूर्णिमेसि विरोधु मांडिला। तो योगु निमिळे म्हणोनि तो प्रसंगु विपाईला वेगळा रया॥२॥ तैसें माणुसपण सहज तनुवरी देवाचा वारा। स्वाधिनु तैसा बापरखुमादेविवरु विठ्ठलु न विसंबावा एकुक्षणु॥३॥

५२६. संसारा येऊनी लागले फांसे। गुंतला आशा मायामोहें॥१॥ न खंडे न तुटे कर्माची बेडी। अनुभवेंविण तोडी तो योगिया॥२॥ कर्माची सांखळी पडली असे पायीं। गुरुमुखें खुणें उगउ पाहीं॥३॥ ज्ञानदेवो म्हणे तुझे कृपेवीण न तुटे फांसा। निवृत्तीनें कैसा उगविला॥४॥

५२७. द्वीपोद्वीपींचे पक्षी मेरुतळवटीं उतरले।

रत्न म्हणोनी त्या स्फटिका झेपावले॥१॥ राजहंस ते भ्रमलें हो पाषाण चुंबिती। आडकलिया चाचू मग मागिल आठविती॥२॥ एक श्रीकृष्ण तें विसरलें ऐसें ज्ञानदेव बोलें। मूर्खेसी संगती करितां शाहणे सिंतरलें॥३॥

५२८. संसारयात्रा भरली थोर। अहंभावें चळे हाट बाजार। कामक्रोध विवेक मद मत्सर। धर्म लोपे अधर्में वेव्हार॥१॥ यात्रा भरली जरिं देविं विन्मुख प्राणी। विषयाची भ्रातिं आडरे॥२॥ एकीं मीपणाच्या मांडिल्या मोटा। अहंभावाच्या गोणिया सांडिल्या चोहाटा। एकीं गाढवावरी भरली प्रतिष्ठा। तन्हि तृप्ती नव्हे दुर्भरा पोटा॥३॥ एक पंडितपण मिरविती श्रेष्ठ। एक ज्ञान विकुनि भरिती पोट। हिंसेलागी वेद करिताती पाठ। चौऱ्यांशीं जिवांभोंवतसे आट॥४॥ अज्ञानभ्रांतीचीं भरलीं पोतीं। सुवस्तु सांडूनि कुवस्तु घेती। सुखाचेनि चाडे सुखाचि प्रीती। अमृत सांडुनि विष सेविती॥५॥ शांति क्षमा दया न धरवे चित्तीं। विषयावरी थोर वाढविली भक्ति। जवळी देवो आणि दाही दिशा धावती। स्वधर्म सांडुनि परधर्मी रति॥६॥ ऐसें जन विगुंतले ठायीं आत्महिताचि शुद्धिचि नाहीं। नाशिवंत देह मानिला जिंहीं। तया तृप्ति जालि मृगजळडोहीं रया। श्रीगुरु निवृत्तीनें नवल केलें। देखणेंचि अदेखणें करुनि दाविलें। मी माजी देवो यानें विश्व व्यापिलें। बापरखुमादेविवरें विठ्ठलें रया॥७॥

५२९. सुख श्रृंगार सुहावा। मिरवितो हरि समाधान बोधुरे॥१॥ हरिचे सुख गिति गातां। समाधान बोधुरे॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुरे। आठवितां समाधान बोधुरे॥३॥

५३०. सकुमार साकार परिमळें आगळें। कर्पूर परिमळें घोळीयेला॥१॥ मित्रपणें करा मधुर आळुमाळा। मधुकर गोपाळा हृदयीं धरा॥२॥ भवतरु भवमूळीं भवमूळ छेदन। तेंचि अंगीं चंदन लाविजेसु॥३॥ बापरखुमादेविवरु सुकुमारु आगळा। वेदश्रुती बाळा वेधिलिया॥४॥

५३१. सुकुमार सुरस परिमळें अगाध। तयाचा सुखबोध सेवी आधीं॥१॥ मन मारी सुबुद्धि तल्लीन मकरंदीं। विषय उपाधी टाकी रया॥२॥ रखुमादेविवरु गुणाचा सुरवाडु। मन बुद्धि निवाडु राजहंसु॥३॥

५३२. बोलतां बोलु मावळला तो मावळोनि उरला। तरि हा भावों केंवि गमलारे बापा॥ कीं इंद्रियांचा भोगु खुंटला कीं समंधि याचा ठावो निमाला। कीं वर्णावर्णु भला विचारु नाहीं॥ तैसे आपुलेंचि करणें आपुलेंचि नवल। खेळ्या होउनि दावी रया॥१॥ तपें अनेक विधी करावीं हे मनाची आधी। करितां करणें सिद्धि नव्हे नाहीं। म्हणोनि वाउगाचि वळसा पडे या धाडिवसा। तैसा कल्पनेचा फांसा मायाबंधु॥२॥ ऐसी याचा पाठी कां होसी हिंपुटी। नलगे तुज सुखाचा स्वादु या गोष्टी येणें ऐसेंचि विचारी॥ एकुचि धीर धरी न लगे या द्वैतासाठीं रया॥३॥ म्हणोनि डोळियांचें देखणें लाघव तो देखणा जाणे। तेथें आपपर पिसुणें न देखे कांहीं॥ तें शद्वेविणे बोलतां निशद्वे ये हातां। ऐसा उपावो करी कांहीं। जोडिलिया धना वाढी बहू असें। तेथें वेचलें न दिसे कांहीं॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु चिंतितां सुखाचेनि सुखें राही। निवृत्तिरायें खुणा दाउनियां सकळ पुनरपि येणें नाहीं॥४॥

५३३. जंववरी जाड नव्हे उजाड नाहीं काढावया प्राणा। मग मूढा पडसी संसार सांकडा। कांहीं कटी आपुला उवेडा रया॥१॥ जाडरे जाडरे सेवटीचा धंदा। पडियेलेंसि भवकुंडा। एकीकडे जन्म एकीकडे मरण न निमेचि धंदा कुवाडा रया॥२॥ थिल्लरीचें जळ मपितरे मिना जंव न तपे आतपु हा परिमळु। जंव हा आयुष्य वोघू न सरे तंव ठाकी अगाधु। पुढें आहे हाल कल्लोळु रया॥३॥ भाड्याचे घर किती वाढविसी रे गव्हारा। दिनु गेलिया काय पंथु आहे। ऐसें

जाणोनियां वेगी ठाकी लवलाहे। बापरखुमादेविवरा विठ्ठलाचे पाय रया॥४॥

५३४. जव या वायूचा प्रकाश तंव या भंडियाचा विश्वासु। वायो निघोनियां गेला ठाईहूनि जाला उदासु रया॥१॥ काळाचें भतुकें श्रृंगारिलें कौतुकें। जातसे तें देखे परी न चले कांहीं॥२॥ ठाईचेचि जाणार कीं नव्हे राहणार यासी जतन ते काई। जेथील तेथें निमोनियां गेलें उपचार नचलेचि कांहीं॥३॥ हें काळाचें भांडें कीं अवघेंचि लटिकें जैसें आहे तैसें सांगेन पुढती। बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि सकळ जीवांचा सांगाती रया॥४॥

५३५. स्वप्नींचेनी धनें भरोनियां लाहे। भला वेव्हार करूं पाहासी। मुद्दलुची नाहीं तेथें कळांतर कैचें धरणें अधरणें घेतासी। लटिकिया साठीं संसार दवडोनी। ठकूनी ठकलासी रया॥१॥ कवण नागवितो कां न गवसी। वेडावलेपणें ठकसील तूंची। चोरोनी तुझें त्वांची नेलें। आतां गाऱ्हाणें कवणा देसी रया॥२॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश। हे सहज परम गुण अंशअंशा आले। येणेंची कष्टें व्यवहार करितां कोठें काय सांठविलें। विचारूनि पाहें तुझें त्वांचि नेलें आतां तुजमाजी हारपलें रया॥३॥ पुत्र कळत्र संपत्ती देखोनी संतोष मानिसी। घडि येकामाजी नासोनी जाईल जैसें कां अभ्र आकाशीं। बापरखुमादेविवरु विठ्ठलुची हृदयीं असतां कां नाडलासी रया॥४॥

## मुमुक्षूस उपदेश.

५३६. सुख सोज्वळ मोतियाचें लेणें। दिधलें जाई जेणें बाईये वो॥१॥ देशीं नाहीं देशा उरी नाहीं। हाटणी नाहीं तें पाटणीं नाहीं॥२॥ लक्षाचेनि लाभें जोडलें निधान। बापरखुमादेविवरा विठ्ठलु जाण॥३॥

५३७. अनुभव रहणीविण कायसें श्रवण। गर्भ अंधु नेणें रत्नकिरण॥१॥ गेले मेले काय सांगाल गोष्टीं। स्वयें आत्मज्ञानी घाली परमात्मीं मिठी॥२॥ जीवा जीवन अंतरीं बाहेजु निर्धारी। सर्व निरंतरी पूर्ण भरित॥३॥ बाह्यजु प्रवृत्ति अंतरीं निवृत्ति। उभयतां गति एक आहे॥४॥ प्रसूतिकाळीं व्याली वांझ आपत्यजवळी। वांझ क्रीडा विनोदें रळि खेळतसे॥५॥ अनुभव रहणीविण जाला भगवा दिगांबरु। जैसा नग्नवरु हिंडे हाटाबिदीं॥६॥ तीर्थक्षेत्र व्रत दान यागादिक साधन। अनुभव रहणीविण शून्य धिक् गेले॥७॥ सगुण निर्गुण पाहीं या दोहिमाजि होऊनि राही। तरी निवसि ठाईच ठायीं अरे जना॥८॥ सगुण निर्गुण पाहीं जया पासोनि। ते राहे अनुभउनि येर वाउगेचि रया॥९॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलेंसि एकांतु। द्वैताद्वैताची मातु उरेचिना॥१०॥

५३८. स्वरूपावबोधु बोधु कां फावला। इंद्रियीं डवरिला प्रेमभावो॥१॥ जाणते निवाले नेणते गुंतले। भजनेंचि गोविले विसर जावो॥२॥ शांतता समता निवृत्ति उदारु। वर्षो न उद्गारु देतु असे॥३॥ ज्ञानदेवा धीर घटमठीं सामा। अधउर्ध्व व्योमा हरि दिसे॥४॥

५३९. सायुज्यसदनीं ज्ञानाचा उद्गार। विज्ञानें अमर पावताहे॥१॥ साधनबाधन धन गोत वित्त। हरिविण वित्त मनीं नाहीं॥२॥ मार्गीचा कापडी धरुनिया वोढी। ईश्वरीं उघडी उडी घाली॥३॥ ज्ञानदेवा सिद्धी साधन सपूर। कलेवर कापूर मुरालासे॥४॥

५४०. काळें ना सावळें। श्वेत ना पिंवळें। नादबिंदाहुन वेगळें। तें कवणरे चांगया॥१॥ ज्ञानदेव म्हणे जाण कां माझे उमाणे॥२॥ गोडापरिस गोड गगनाहूनि वाड। चौदाभुवना ज्याची चाड। तें कवणरे चांगया॥३॥ ज्ञानदेवो मानवलें। माझें मज सांगितलें । दोहीचे मिळोनि एक जालें। भलें केलें चांगया॥४॥

५४१. आवो कमळनयनीं चांदिणें भासिलें। तयामाजी एक निराकार देखिलें॥१॥ हेंही नव्हे तेंहि नव्हे कांहीं नव्हे तोचि पैं होय॥२॥ बापरखुमादेविवरु नव्हताचि पैं जाला। होऊनियां

फावला फावो सरला ॥ ३ ॥

५४२. मेरुपरतें एक व्योम आहे। तेथें एकु पाहे तेजःपुंजु ॥ १ ॥ तेज नव्हे तेजःपुंजू नव्हे ॥ २ ॥ शितळ नव्हे शांतही नव्हे ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलही नव्हे। नव्हे तो होये चतुर्देहेंविण ॥ ४ ॥

५४३. पाहातां पाहाणें दृश्याही वेगळें। तें कैसें आकळे म्हणतोसि ॥ १ ॥ आहे तें पाहीं नाहीं तें होई। ठायींच्या ठायीं तुंची होसी ॥ २ ॥ स्वरूपीं समता हृदयस्था आप। तयाचें स्वरूप आदि मध्यें ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु सगुणी समाये। निर्गुण दिसताहे जनीं रया ॥ ४ ॥

५४४. त्रिपुटि उलटु निर्गुणि अरुता। पाहातां दृष्टांता भेदु नाहीं ॥ १ ॥ भेदु अभेदु अवघाचि गोविंदु। बिंबे बिंब छंदु हरि लीळा ॥ २ ॥ नाहीं आला गेला शब्द पैं दृष्टांतें। दृश्यादृश्य भूतें एकतत्वीं ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु अर्ध उर्ध्व शेज। वेंगीं तूं उमज अरे रया ॥ ४ ॥

५४५. व्यक्ताचे अव्यक्ती पाहतां पैं न दिसे आपीआप रसे व्यक्त हरि ॥ १ ॥ बाहेजु भीतरी आदिमध्यउर्ध्व। हृदयीं सन्नद्ध बिंबलासे ॥ २ ॥ ऐसीये दशे ते अव्यक्त भुंजसी। मी माझे मोहासी सांडी रया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवर अव्यक्त व्यक्ती अव्यक्त। अवघे संचित हरि आहे ॥ ४ ॥

५४६. नित्यता समाधी असोनि पै साधी। मायेची शुद्धि पुसे रया ॥ १ ॥ साधन विधान पुजा अनुष्ठान। नित्यता कीर्तन सोहंभावें ॥ २ ॥ स्मरण विलास तत्वीं तत्व हाला। उपदेशु बोला बोलों नये ॥ ३ ॥ ज्ञानदेवा सिद्धि नित्यता समृद्धि। जीवशिवबुद्धि समाधि त्याची ॥ ४ ॥

५४७. पाहोनिया दिठी नवजाय भूली। मायेची घरकुली खेळतुसे ॥ १ ॥ माया मन पाही मायेसीही पर। परते सत्वर निमिष्य नाहीं ॥ २ ॥ खेळतां बाहुली स्वप्नचि वर्तवी। रावोरंक दावी भेदबुद्धी ॥ ३ ॥ बापरखुमादेविवर अभेदुनि अभिन्न। हरिरूपीं लीन जिवशिवीं ॥ ४ ॥

५४८. अहंते न पाहे नाहीं तेची पाहे। भुलिसवें जाय काय करूं ॥ १ ॥ सोहंभावें सोकरी कोहं भावें हो जरी। पाहे दुरीच्या दुरी एकतत्वीं ॥ २ ॥ आदि हें माजिठें रूपीं रूप पैठें। असोनियां द्रष्टे न पाहे भुली ॥ ३ ॥ बापरखुमादेविवर भुलिभुरेंहरि। माजिठा श्रीहरि आपरूपें ॥ ४ ॥

५४९. जनवन हरि न पाहतां भासे। घटमठीं दिसे तदाकारु ॥ १ ॥ फिटती भुरे धुम उठी तेजा। अक्षरीं उमजा गुरुकृपें ॥ २ ॥ खुंटलिया मुक्ति राहिले अव्यक्तीं। एकरूप ज्योती तदाकार ॥ ३ ॥ ज्ञानदेव क्षर अक्षर उमजे। बापरखुमादेवीवर हृदयीं विराजे ॥ ४ ॥

५५०. दिव्य औषधीची वार्ता ऐकोनियां कानीं व्याधी टाकी तनु। धालियाचे सुख भूकेला जेवि जाणे कैसे निवे त्याचे मनु रया ॥ १ ॥ सुखाचा अनुभव कैसेनि जाणावा। भेटिचें आर्त सकळांसही सारिखें होईजे देखा ॥ २ ॥ आपण झालिया जागा नलगे सांगावें। बापरखुमादेविवरविठ्ठल भेटलिया। तरि तुझीं तुटतील सकळिक विंदानें रया ॥ ३ ॥

५५१. सर्वांग देखणा हाचि भावो जाण। येर निराकारणें वाया वोझें ॥ १ ॥ शक्तीचा पडिभरु वाहासिल माथा। श्रीगुरुपायां शरण जाईं ॥ २ ॥ नसंडी वेदसिंधु सांडी मांडी कर्म। उपाधीचा धर्म करूं नको ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरदेखणा सर्व दृष्टी। तेथें प्रपंच गोष्टी मुरलिया ॥ ४ ॥

५५२. संसारकथा प्रपंच चळथा। मनाचा उलथा विरुळा जाणे ॥ १ ॥ होतें तें पाहीं नव्हे तें घेई। द्वैतबुद्धि ठायीं गुंफों नको ॥ २ ॥ चित्तवृत्ति ध्यानीं मनाची निशाणी। भ्रमभेद कानीं ऐकों नको ॥ ३ ॥ ज्ञानदेव गंगा निःसंगाच्या संगा। वेगीं श्रीरंगा शरण जाईं ॥ ४ ॥

५५३. ऐके तूं ज्ञान सुख विश्रांति रूपा। हरिरूप दीपा पाहे ऐसा ॥ १ ॥ चित्तवृत्तिचिया आदिमध्य अंतीं। रूपींरूप आनंदीं समरसें ॥ २ ॥ निवृत्ति सांगे ज्ञाना योगाचि धारणा। जीवशिव

करणा चक्षु दृढ करी ॥ ३ ॥

५५४. येथें तेथें दुरि तो नांदे मंदिरीं। आत्मा चराचरीं एकपणें ॥ १ ॥ ऐसा पाहे दृष्टि चैतन्याची सृष्टि। तरि सुदर्शन घरटीं आपेआप ॥ २ ॥ जातजात येणें प्रपंच साधणे। गाळूनियां गगन हंस घेई ॥ ३ ॥ ज्ञानदेव संधी साधूनिया सिद्धि। छपनाची संधी टाकुनि गेला ॥ ४ ॥

५५५. सार सप्तमीसि हारपली निशी। दशवे द्वारेसीं उभा राहे ॥ १ ॥ तेथें तूं सावध अवघाचि गोविंद। देहीं देहाभेद करूं नको ॥ २ ॥ इंद्रियांच्या वृत्ति दशवे द्वारीं गति। देहागेहउपरति होईल तुज ॥ ३ ॥ विस्तारी विस्तार गुण गुह्य सार। एकाएकीं पार सार साधी ॥ ४ ॥ विकृति विवर प्रकृति साचार। तत्त्वाचा निर्धार समरसीं ॥ ५ ॥ निवृत्ति सांगे ज्ञाना एक तूं करी। तरी तुतें कामारी होईल चित्तें ॥ ६ ॥

५५६. शांतिक्षमादया निवती निर्विंग। होउनी सर्वांग आत्मभोगी ॥ १ ॥ नाहीं अंतरूप सर्वही चैतन्य। चिदानंदघन बिंबलेंसे ॥ २ ॥ मायीकवृत्तीचा झणी धरिसी संग। इंद्रियाचा पांग सांडी रया ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे कल्पना काजळी। दिपीं दीपमेळीं पाजळी वो जगीं ॥ ४ ॥

५५७. असार घेईजे सार परखुनियां विचार। जेणें तुटे येरझार मरणजन्मीं ॥ १ ॥ तें रूपस रूपडे पहा न संपडे। हृदयीं सांपडे ज्ञान गोष्टी ॥ २ ॥ सांगता अनुमान अद्वैत सार पूर्ण। ज्ञानाज्ञानीं सज्ञान विरुळा जाणे ॥ ३ ॥ ज्ञानदेव सोपान सांगितलिया संपन्न। हरितत्त्व अनुप्रमाण लाधे पूर्वपुण्यें ॥ ४ ॥

५५८. निर्मिला म्हणसी परेचा विस्तार। तेथें हा विचार वांयावीण ॥ १ ॥ पर नाहीं तेथें अरुतें कैंचे। आदिमध्य साचें कळिका हरि ॥ २ ॥ नाहीं त्या सन्मान विकृति उपरमु। दिपीं दीप समु शेजेबाजे ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु परेसि परता। हा विचारु अरूता दिसे भान ॥ ४ ॥

५५९. सज्ञानीं पाहातां अज्ञान तत्वतां। अज्ञानीं अमृता सद्‌गुरु जाणे ॥ १ ॥ गुरुगम्य सत्ता शिष्य होय सरता। पूर्णी पूर्ण हातां ब्रह्म येत ॥ २ ॥ आदि मध्य घर हरीचा शेजार। हरिविण थार नाहीं कोठें ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं चित्त गुरु धर्म वित्त। अवघें जीवित हरि केला ॥ ४ ॥

५६०. मनाची सृष्टि स्वप्न वर्तवी दृष्टी। अळंकारलें उठी गंधर्वनगर। तेथेंचिये राणिवेसाठीं कां भ्रमु धरितासि पोटीं। जेथें जेथें पाहातां पाहणें नुठी तोचि होई। म्हणोनि देखणीया जवळीके कीं दृष्टिविण सुके तैसें स्वानुभवें स्वानुभव मावळे ज्याच्या ठायीं। ते अवस्थेविण दृष्टि गोचर होई वेगीं तें देखणेंचि दृष्टि विठ्ठल रया ॥ १ ॥ तुझें तूंचि विंदान जाणोनि पाहीं। आपेंआपवीण विचारू नाहीं ॥ २ ॥ म्हणौनि एकमेका मज आठवे आठवेचि विसरोनि फावे। पैं देहद्वयभाव विरोनि जाय तेथें पदत्रयाची मांडणी कीं तत्वत्रयाची वाणि या पांचांते जेथ न फावे। कर्मेंद्रिया ज्ञानेंसी ज्ञानेंद्रियें जो नेमेसी तंव ते विस्मो करूनि पाहे सुखस्वानुभवादुःख प्रकाशले ते सुख केवि फावे। याचिया गुणागुण न गुंजिजे हृदयीं सुखावोनि तेंचि तूं राहे रया ॥ ३ ॥ मग आंग शेजबाज कीं हे बाह्येंद्रियांचे उपभोग मानिसीं साच। जरी सोंग स्वप्नींचें असे ऐसें जाणतां निदसुरा होसी दातारा या स्वप्नींच्या वोरबारा बापा वोथरसि कांपा। म्हणोनि बापरखुमादेविवरुविठ्ठलु उघडे डोळांचि निधान देखिजे तवं मार्ग सोपा। म्हणोनि तेथींच्या तेथें पाहतां याविण नाहीं दुजें। वाया खटपट करिसी बापा रया ॥ ४ ॥

५६१. शून्याशून्य धार शून्यशेजे हरी। शून्या-माजि घरीं बिंबलासे ॥ १ ॥ आधीं आप पाही शून्या शून्य देहीं। मज उमजोनी ठायीं घेईजे सुख ॥ २ ॥ शून्य ते कांई शून्याशून्य पुशिलें। हृदयस्था जालें कोण्या गुणें ॥ ३ ॥ बापरखुमादेविवर विठ्ठल अवघा। शून्याशून्य वेगा ज्ञानघन ॥ ४ ॥

५६२. शांति दिसे ओहं पर दिसे सोहं। क्षमा हे कोहं कारुण्य सदां ॥ १ ॥ स्नेहाची दिवाळी फेडूनी

काजळी। या दीपें वोंवाळी जीवशिवीं॥२॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान दृश्याद्रष्टा दीप्ती। रूपीं रूपस्थिति अंकुरलासे॥३॥ बापरखुमादेवीवर विठ्ठल साच। मी माझें आहाच वांयावीण॥४॥

५६३. साउमा जंव जाये तंव हृदयींच आहे। चित्त विकासु पाहे चित्तामाजी॥१॥ तंव चतुर्भुज हरि हृदयमंदिरीं। तया नमन करी विज्ञानेसी॥२॥ शांति धरुनि बाही आपेंआप पाही। मननीं निर्वाही न्याहाळिला॥३॥ ज्ञानदेवा रूप बिंबोनी। समीप प्रपंचदुःख सुख जालें॥४॥

५६४. औट हात चर्म देह बांदवडी। त्रिगुणाची घडी नुगवे रया॥१॥ सोकरितां धाया काय करिल माया। श्रीगुरुच्या थायां विरुळा जाणे॥२॥ सोहंकारा सोहंकारा हरी पोकारा। वायांच मायेचा वारा भरूं नका॥३॥ सप्तद्वीप पृथ्वी नव खंडें देव। स्वर्गभोगभाव राणिव व्यर्थ॥४॥ ज्ञानदेवीं सार हरिपंथ पार। एकतत्व उच्चार तिहीं लोकीं॥५॥

५६५. दीपकेमाजि दीपक दीप्तीसि सतेज। बिंबोनिसहज बिंबीं मिळे॥१॥ बिंब नाहीं पाहासील काई। ठायींच्या ठायीं होऊनि राही॥२॥ सर्वी सर्वरस समरसोनी आहे। उभारूनि बाहे वेद सांगे॥३॥ ज्ञानदेव निजीं निजोनि सहज। देहींचा निर्लज्ज रुसला सये॥४॥

५६६. जिणें देउनि देहीं निःशंक होईजे। मां मरणें मरण तयासि म्हणिजे॥१॥ जिणें तें काई मरणें तें काई। जिणें मरणें दोन्ही चोजवेना॥२॥ सिंधु बुडबुडा क्षणामाजि आटे। सिंधु बुडबुडा कांहीं ते नाटे॥३॥ बापरखुमादेविवराच्या पायीं। ज्ञानदेवो पाही मरण जाणें॥४॥

५६७. सायखडियाचें बिक। अचेत परि करी पाक। जनदृष्टीचें कवतुक। स्फुरे वेगीं॥१॥ तैसें हें देहरूप जालें। न होतेंचि होणें आलें। तंव सद्गुरु जाणितलें। येथींचें रया॥२॥ सतधनि म्हणे गुरु। जत सांभाळी विवरु। ऐसेंनि तुज वोगरु। वाढिला ब्रह्मीं॥३॥ निराकार अलिप्त वसे। शरीरीं असोनि तूं नसे। एकत्व मनोद्देशें हृदयीं ध्यायें॥४॥ सोडी रसाची रससोये नको भुलों माया मोहें। सत्रावी दोहतु जाये। जीवन भातें॥५॥ ज्ञानदेव म्हणे श्रीगुरु। ऐसा सांगति विचारु। मग ब्रह्मीं चित्तानुसारु। निरोपिला सर्व॥६॥

५६८. आप आपीं माये तेजी तेज समाये। पवनगे माये पृथ्वी जाये॥१॥ हंस कोठें गेला तूं पाहो विसरला। भ्रमेंचि भुलला कोई शब्दें॥२॥ सांडी तू रे जाती होई रे विजाती। येणें रूपें समाप्ती प्रपंचाची॥३॥ ज्ञानदेवा घर विठ्ठल आचार। वेगीं परंपार हंसपावे॥४॥

५६९. अनंतीं अनंत तत्त्वता तंव एक। विरुळा जाणे एक बिंबताहे॥१॥ एका तेजी बहु बहुतेज घृष्टी। एकतत्व सृष्टी मेळु शिवीं॥२॥ तर्काचाही तर्क विवेक सकळ। तेणेंविण गोपाळ आकळेना॥३॥ ज्ञानदेव म्हणे जाणे प्रसाद निवृत्ति। मौनाची मुक्ति वाट आहे॥४॥

५७०. स्वभावें विचरतां महीं। सम ब्रह्म दिशा दाही। एकु एकला आस पाही। सर्वाघटीं बाईये वो॥१॥ दुजें द्वैत हेतु सांडी। एकतत्वसार मांडी। हरिविण इये पिंडीं नाहीं वो माये॥२॥ काय सांगो याच्या गोष्टी। अवघा दिसे हाचि सृष्टि। विश्वरूप किरीटी। अर्जुना दिठीं दावियलें॥३॥ ज्ञानदेव दीप उघड। उजळुनी केलासे वाड। माय देवीं आम्हां नाही चाड। अवघा गोड हरि आमुचा॥४॥

५७१. बाहिजु भीतरी भीतरलेपणा ऊरी। ऊरी ऊरैल साचारी जेणें निवविजे॥ तेथचिया सारा मुसें मुसल्या आकारा। सोय सांडु नको येरझारा चुकतील॥१॥ सहज भक्तिसुख पावसील। जाणु असतां कां नेणु होतासी। मागिली ये तुटी साठीं। लाभु ये खेपेचा मनुष्यपणाचेनि मापें घेइजेसु रया॥२॥ येकवटु वटवटाच्या पोटीं। बिजीं बिजा आंतवटु आपण पैं। तिहीं रजीं रजु सरे सरोनियां जें उरे। तैसें एकसरां धुरें तूं अनुसरे पां॥३॥ रविरश्मीचिया तेजा कवण बैसविलिया

वोजा। कैशा सांगताति गुजा सामवलेपणें॥ जळीं तरंगु भेदु तैसा परमात्मा परमानंदु। ऐसा सांडूनि गोविंदु झणें विलया जासी॥४॥ जळें जळ पियींजे तेथें काय उरे दुजें। ओघें ओघुचि गिळिजे बाप सागरा पोटीं॥ सिंधु नेणे अव्हांटा नदीचिया वाटा तैसा करीलरे हरि सांठा तुज आपणामाजी॥५॥ तेथे जगचि परतलें जग जगपणा मुकलें। मोहो अभावीं उरलें उरतां ठायीं॥ तेथें सिंधुचि अवघा अवघेपणें नये मागा। यापरी लागवेगी हरि पावसी रया॥६॥ ऐसे सुखाचे सोहळे माजी सुख प्रेमवोळे। कवण सुख बोले सुख सुकाळे मातलें तें॥ तेथें मीतूं सरे सेखीं भक्त तोही नुरे। शिवीं शिव विरे मोहरे जालया रया॥७॥ अमृतीं अमृता गोडी बोल बोलतां बोबडी। पुण्य मनोधर्मी गुढी उभारिली जेणें॥ अमरवोघाचेनि वोघे आफाविजे जिवलगें। बापरखुमादेविवरा विठ्ठलासंगें सांपडलें॥८॥

५७२. दृष्टीचें सुख अंतरी देख। ओंकार अरुष बोलताती॥१॥ नादुले ऐकसी बिंदुले ते देखसी कोंदलें चौपासी सांवरेना॥२॥ तें आतु न बाहेरी आणि अभ्यंतरी। एकलेंचि निर्धारी वर्ततसे॥३॥ उफराटिये दृष्टी निवृत्तीच्या शेवटीं ज्ञानदेवा भेटी होउनि ठेली॥४॥

५७३. सांगेन तें ऐक दाविन तें पाहे। या मनाचि मूळ सोय आठवी पां॥१॥ आठवितां तूं तया ठकसिल कैसा। सांजवेळें लाहासि उदो कां जैसा॥२॥ बुडोनिया राही आनंदसागरीं। आठवितां असें जन्मवरी रया॥३॥ पडतासि दृष्टी निवृत्तीच्या चरणीं। ज्ञानदेवो मनीं धरूनि ठेला॥४॥

५७४. जिता जिणें लागे गोड परत्रि तें अवघड। आवधियाहुनि तनु वाड मरण भलें॥१॥ जिता मरिजे मरोनिया उरिजे। इतुजे जाणिजे तरि जपणेचि नलगे॥२॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलाच्या पायीं। ज्ञानदेव पाहीं मरण सांगे॥३॥

५७५. देखणें देखाल तरी हरे मन। सामावलें जीवनमुक्तरत्न रया॥१॥ भला भला तूं भलारे ज्ञाना। निवृत्ति आपणा दावियेलें॥२॥ गुरुमुखें ज्ञान पाविजे निर्वाण। तें निवृत्ति म्हणे ज्ञाना पावसील॥३॥

५७६. सकळहि कळा बिंबोनि निराळें। तें तूं घेउनि उगलें राहे रया॥१॥ तें तत्वता तत्व घेईका एकत्व। या मना महत्व देउनीया॥२॥ निराळ निराकार पाहे तें आपरंपार। तें तूं परात्पर होउनि राहें॥३॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु सकळहि कळा प्रकाशकु। तोचि सर्व व्यापकु जाणौनि राही॥४॥

५७७. जगत्र धांवताहे सैरा म्हणौनि धांवसी। थोर कष्टलासी वायाविण॥ धांवोनि जावोनि काय करिसी। सहज अहिर्निशी भेटी नाहीं॥१॥ जीव जाणवेना जीव जाणवेना। जिवाचें वर्म तें चोजवेना॥२॥ जिवाशिवा दोन्हि भिन्न भेदु नाहीं। विचारूनि पाहि हृदयामाजी॥ जिउ सर्वाठायीं असे योगिया न दिसे। कुडी सांडूनि वसे कवणें ठायीं॥३॥ जिउ जैसाचि आला तैसाचि गेला। तो कोठें सामावला जाणतेनो॥ ज्ञानदेवो म्हणे जिउ कोठें गेला। जिवा जन्म जाला कवणे ठाई॥४॥

५७८. भलें बोलोनि दाविलें मज। आत्मज्ञान सांगेन तुज॥१॥ मनाचा प्रकाशु थोरु। मनेंचि ब्रह्म उजियेडु॥२॥ निवृत्ति सेवियेला सुघडु। तेणें मज जाहला ब्रह्माचा पाडु॥३॥

५७९. आपणासि आपण उपदेशु कीजे। गुरुमुखें बुझिजे तेंचि तूं॥१॥ मी तें कवण हें तूं जाण। बुझें निर्वाण तेंचि तूं॥२॥ सिद्धचि सांडूनि निघसी अनानीं ठाईं। तूं रिघेपां सोई संताचिये॥३॥ जें तपाव्रतांचे ठायीं ते येथेंचि पाही। परि ते ठाईच्या ठाई म्हणे ज्ञानदेवो॥४॥

५८०. पिंड निर्माण जीवकळा सरिसी। गति प्रवेशीं कैसी जाली॥१॥ तेथींची रचना न कळे हो देवा। अनुभवाचा ठेवा काढुनी पाहे॥२॥ वारपंगाचें लेणें लेवविसी जाई जेणें। परी घरांतील ठेवणें

नुमगसी ॥ ३ ॥ अणुचें प्रमाण न साहे डोळां। कैसा मुक्तीचा सोहळा घेवों पाहसी ॥४॥ जळीं नांदला तो तरंगीं उमटला। मिळोनियां गेला सागरासी ॥५॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला उदारा। ज्ञानाचा वेव्हारा होई बापा ॥ ६ ॥

५८१. पाहणें पाहाते सांडुनि निरुते। पाहिलिया त्यातें तूंचि होसी ॥ १ ॥ तेंचि तें आपण तत्व तें तूं जाण। नलगे साधन आन कांहीं ॥ २ ॥ भानुबिंबेवीण भासलें तम। ज्ञानदेव वर्म अनुवादला ॥ ३ ॥

५८२. तूं तो माझें मी तो तुझें। ऐक्य जालें तेथें कैचें दुजें ॥ १ ॥ तूं तो मी गा मी तो तूं गा। अज्ञानें बापुडीं नेणती पैं गा ॥ २ ॥ निर्गुण होतें तें गुणासि आलें। अज्ञान निरसूनि एकचि जालें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे परतूनि पाही। जीवाचा जीवनु कवणें ठायीं ॥ ४ ॥

५८३. अमोलिक रत्नें जोडलेंरे तुज। कारे ब्रह्मबीज नोळखसी ॥ १ ॥ न बुडे न कळे न भीये चोरा। ते वस्तु चतुरा सेविजेसु ॥ २ ॥ ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें। आणुनि ठेविलें गुरुमुखीं ॥ ३ ॥

५८४. पढियंते कीं सिंह दुरी जाणसी तरि तो ठावो दृष्टीसी दुरी। मोकारेविण प्रतिबिंबासी चेतना लाहे ऐसें कीजे रया ॥ १ ॥ आवडी वेचुनियां डोळियां पुढें रितां कां रिगतासी। तूंचि सर्वांभूति ऐसें जरि जाणसी तरि साचे भेटी केउता जासी रया ॥ २ ॥ अरे हा दुजेविण खेळु मांडिला हरि जैत अनुठायीं नाहीं। बापरखुमादेविवराविठ्ठला तूं जाणतयासि काय जाणणें रया ॥ ३ ॥

५८५. मन मुरे मग जें उरे। तें तूं कारे सेवीसिना ॥ १ ॥ दिसतें परि न धरवे हातें। तें संतातें पुसावें ॥ २ ॥ तेथींची खुण विरळा जाणे। निवृत्ति प्रसादें ज्ञानदेवो म्हणे ॥ ३ ॥

५८६. व्रतें तपें तीर्थे तवचि वरी गर्जती। जंव देखिलें नाहीं तुवा तूंतें ॥ जेथें वेदा मौन पडे श्रुति नेति नेति म्हणोनि बहुडे। तें सुख वाडेकोडें भोगिजेसु ॥ १ ॥ नाहीं आपण पै सौरसु कां करिसी हव्यासु। लटिकाचि मायाभासु मिथ्या भ्रमु ॥ सिद्धचि असतां करिसी साधनाची चाड। सुख सांडुनी दुःख वाड भोगितासी रया ॥ २ ॥ या विश्वायेवढा जगडंबरु पसारा। देखोनियां सैरा मन धांवें तुझें ॥ मृगजळ देखोनि मृगें आलीं टाकोनि। जीवन म्हणौनि तान्हा फुटोनि मेलीं ॥ ३ ॥ आतां तुज नलगे कष्टावें जें असेल स्वभावें। नेमिलें देवें तें न चुकें ब्रह्मादिकां ॥ उमप सांडूनि करिसी दैन्याचे डोहळे। निधान देखोनि डोळे वायां झांकूं नको ॥ ४ ॥ थोडें हें सांडी परौतें बहुत तें घेई अरौतें। जें चाळितें तूंतें आणि विश्वातें मागें ॥ जें केलें तें अवघे यांतुचि निमाले। आतां पाहतां तुझियेनि बोलें बंधमुक्त रया ॥ ५ ॥ पुत्र कळत्र वित्त हा तो मिथ्या मोहो। तो आपुलासाचि चावो मानेल तुज ॥ नखापासूनि शिखा व्यापूनिया आहे। बापरखुमादेविवरुविठ्ठलु हृदयींचा ध्यायि सुखें रया ॥ ६ ॥

५८७. नाहीं तें तूं काय गिळिसि। आत्मा वोळखोनि होय तत्त्वमसि ॥ १ ॥ सांडी सांडी सगुणाची भ्रांति। तूंचि निर्गुण आहासि तत्त्वमसि ॥ २ ॥ रखुमादेविवरु विठ्ठलु पंढरियेसी। कांहीं न व्हावा आवघा होसी ॥ ३ ॥

५८८. पाहाणेंचि पाहासी काय पाहणें तेथें नाहीं। पाहाणेंचि पाही पाहाणें रया ॥ १ ॥ खुंटलें बोलणें बोलीं बोला बोलुचि मौन्य ठेला मौन्यामाजि ॥ २ ॥ बापरखुमादेविवराविठ्ठलाचिये खुणें। अनुभविया बोलणें पारुषलें ॥ ३ ॥

५८९. कापुरा अग्नि स्नेह जाला। मी नाहीं तेथें काय उरला ॥ १ ॥ मी नाहीं तेथें कवणिये ठायीं। देखत देखन पाहीं भुललासी ॥ २ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलीं खुण। जणते जाणती ते अनुभविये ॥ ३ ॥

५९०. स्वप्नींचेनि भ्रमें धरिसी स्थुलाकृति। परि सिद्ध नव्हे सत्य त्याच्या पायीं ॥ कारण महाकारण

लिंग आणि चतुष्टय। हे शब्दिक उपाय बोलों ठाती॥१॥ येक नाहीं तेथें दुजें कायिसें। देहद्वय पाहातां दुजें न दिसें॥२॥ तेचि ते संकल्प स्थूळ नैश्वर्याचें भान। त्या म्हणती कारण नवल पाहीं॥ महाकारण लिंगदेह शाब्दिकीं धरिला। तो शास्त्रज्ञीं पाहिलां अर्थी साही॥३॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि देहीं। अवस्थातीत पाही तोचि एक॥ निवृत्तिरायें अंजन लेऊनि। पायाळा निजसदन तें विश्व जालें॥४॥

५९१. बोधलिया अंजनासी पायाळू हा काय। निधान जरी आहे परि शब्द नेणें॥ परादिकां वाचां मौन पडिलें जाण। तेथें पायाळाची खुण कोण लेखी॥१॥ सुखाचा संवाद आपण्यामाजी पाही। देहींचा देही विदेह होऊनि ठेला॥२॥ अविकल्पवृत्ति भानु संकल्पें हा नातळे। कर्म तया न मिळे करिजे कोणे॥ बापरखुमादेविवरु कर्ता कर्म न पडे कांहीं दृष्टि। वायांचि भ्रमें बांधलासी दृष्टि रया॥३॥

५९२. पाहातां पाहाणें दृष्टिही वेगळें। तें कैसें आकळे ब्रह्मतेसी॥१॥ पाहातेंचि पाही नाहीं तेंचि काई। गयनिच्या पायीं तूंचि होसी॥२॥ स्वरूपी रमतां हृदयस्थ आपण। तयाचें स्वरूप आदिमध्य॥३॥ बापरखुमादेविवर सगुणीं न माय। निर्गुणीं दिसताहे जनीं रया॥४॥

५९३. श्रुतीं सांगितलें उपनिषदीं अनुवादलें। आम्हा लाधलें निरुतें वर्म। अनुभवे गोविंदु करितां अनुवादु। परब्रह्म अनुवादु तरि तें नव्हे॥१॥ बोलिजे तें नव्हे दाविजे तें नव्हे। गुरुमुखी पाहावें परमानंदीं॥२॥ अरूप परि बरवे दिसें । भीतरी कैसें निववीतुसे। अनुभविया प्रति बोलिजे लक्षण। ज्ञानदेवें खुण सांगितली॥३॥

५९४. निर्गुणाची वार्ता सगुणीं मांडीली। सगुण निर्गुण दोन्ही एकरूपा आली॥१॥ सगुण नव्हे तें निर्गुण नव्हे। गुरुमुखें चोजवे जाणितलें बापा॥२॥ रखुमादेविवरु साकारु निराकारु नव्हे। कांही नहोनि होये तो बाईये वो॥३॥

५९५. प्रकाशें देखिलें त्याहूनि वेगळें। नाहीं तें धरिलें सोहं मार्ग॥१॥ या मार्गापंथीं तूं तुझें नाहीं। बिंब हारपलें तें तत्त्व पाहीं॥२॥ बीजाचा प्रकाश तुझा तूं नेणसी। हारपलें मन हें दाही दिशी रया॥३॥ पुराणप्रसिद्ध निवृत्ति लाधलें। गुरुमुखें लक्षीं चोजवलें रया॥४॥

५९६. आलाडु आडु पालाडु आडु मध्यें वाहे पाणी। तिही संधी खेळु मांडिला सितादेवि राणी॥१॥ सुखाति चांदिणें राती। बहुतें खेळती येकु देखे॥२॥ खेळतां खेळतां नवल पाहे देखणा खीर खाये। सांपडे ते कोण्हा न संगे भोग्या शिवोन राहे॥३॥ भोगिया सिवोन उतरला डायीं। ज्ञानदेव सांगे निवृत्तीच्या पायीं॥४॥

५९७. एक पाहातां दुजें गेलें। शेखीं पाहातां सर्व शून्य जालें॥१॥ पाहातां तयाचा विचारु। निवृत्ति जाणे तो श्रीगुरु॥२॥ एक मूळ एक आदि। शून्य मांडिली उपाधी॥३। निवृत्ति दासाचें बोलणें। जाणे मीपणा उमाणें॥४॥

## ज्ञानपर

### आपल्या स्थिती संबंधानें जनाशीं उद्गार

५९८. एकत्व बाही उतरला भक्त। द्वैतद्वेषा विरक्त पाहोनि ठेली॥१॥ द्वैताची काजळी क्रोधु दशा पाजळी। नाहीं ते उजळी तमदृष्टी॥२॥ जंववरी कामना आसक्ती मोहो। तंववरी ग्रहो कल्पनेचा॥३॥ ज्ञानदेवा चित्तीं आनंदमय हरी। द्वैताची कामारी नाईके कानीं॥४॥

५९९. आत्मरूपीं रूप रंगलें सहज। रिगोनि निजगुज सतेजीलें॥१॥ तेज बीज बिवडा पेरिलेंनि वाडें। उगवलें चोखडें ब्रह्मरूप॥२॥ शांतिची गोफण उडविला प्रपंच। धारणा आहाच स्थिर केली॥३॥ वेटाळिलें धान्य खळे दान दिठी। दिधलें शेवटीं भोक्तियासी॥४॥ देते घेते जीवें नुरेचि शेखीं। शिवमेव खोपी समरसीं॥५॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदारा। ऐसा एकसरा तुष्टलासी॥६॥

६००. आदि मध्य आंत टाकोनि अवसान। करूं हरिध्यान सोहंभावें॥१॥ दिवसा कामान रात्रीचा बडिवारु। हरिसपरिवारु हरि आम्हां॥२॥ जातीची विजाती नाहीं पैं कुळधर्म। कुळींचा कुळधर्म हरी आम्हां॥३॥ ज्ञानदेव सांगे वेदशास्त्र थोर। सांगतसे विचार आम्हां तुम्हां॥४॥

६०१. अवघ्या बाहीं म्यां व्योम कवळिलें। अवघां हृदयीं अरूप धरिलें॥१॥ अवघेपणें मी त्याचीच जालें। तेंचि पावलें तदाकारें॥२॥ कांहीं नहोनियां कांहीं एक जाले। अवघाचि शोशिला ब्रह्मरसु॥३॥ रखुमादेविवरु अवघाचि धरिला। अवघाचि गिळिला अवघेपणें॥४॥

६०२. तनु चोरिली कोठें मी पाहों । भूक लागली काय मी खावों॥१॥ पाहणें नाहीं काय पाहों। ध्यान नाहीं काय ध्यावों॥२॥ भिंत नाहीं काय चित्र लिहों। चित्र सरलिया तया नाहीं ठावो जी देवा॥३॥ निवृत्तिदास म्हणे कैसें हो काई। रखुमादेविवरा विठ्ठला ध्यायीं॥४॥

६०३. तुडतालेवांचूनि अवस्था काईसी। दुजे तरी बोलों कवणासिगे माये॥१॥ अनुमानालागीं नुरिजे उरी। सांगतां लोकाचारी लाजिजे॥२॥ अबोलणेंसी बोलणें विनोदें। बापरखुमादेविवरा विठ्ठला गुणनिधी॥३॥

६०४. मन सुमन घालूनि माळा। करूनि सकळा कळा गळां पूर्ण वो माये॥१॥ आउट पिठींची दुरुगिळी घातली। तेथें दोघें पुजे बैसविले पुजे वो माये॥२॥ तेथें अद्वैत अंगारु परोपरी वासु। करूनियां सायासु वैराग्य ज्ञाने वो माये॥३॥ ऐसा हृदयमंदिरीं दुर्गादेवीअंतरीं। रखुमादेविवरु निर्धारी वो माये॥४॥

६०५. दुधावरिली साय निवडुनि दिधली। तैसी परी जाली आम्हां तुम्हां॥१॥ धालों मी ब्रह्में उद्गार सब्रह्में। अनुदिनीं प्रेमें डुल्लतसे॥२॥ नाठवे आशा देहावरी उदास। मीतूंपण भाष चोजवेना॥३॥ रखुमादेविवर विठ्ठलीं मुरोनि राहिला। तो आनंदु देखिला संतजनीं॥४॥

६०६. जगासि गौसणी ब्रह्मरूपें देखिली। ते मी अंतरीं पांगुरली अंतरामाजि॥१॥ अंतरींचे सुख अंतरीं निमालें। अंतर बैसविलें ब्रह्मपदीं॥२॥ बापरखुमादेविवर ब्रह्मपदीं देखिला। मजमाजी सामावला अद्वैतपणें॥३॥

६०७. आर्धीच तू ज्ञान वरी जालें। उन्मन हरि हें जीवन हृदयीं आलें॥१॥ स्थिरावलें ध्यान ज्ञानाचीये वृत्ति। विज्ञानसंपत्ति साधलिया॥२॥ अंधकारपट नासला समतेज। रामरूपी पैज दीपज्ञान॥३॥ संत शांतशांति उलथिचा ठसा। कृष्णरूपीं दिशा तेजो तेज॥४॥ अलक्ष लक्षिते अगोचर पर। तेथेंही गव्हर संचलें॥५॥ ज्ञानदेव सुखी जालीसे विश्रांति। परमानंद चित्तीं निरंतर॥६॥

६०८. करीं वो अद्वैत माला केले इसन्यो सहिंवर। सिद्धपुरासि गयो। वोलु नाहीं तया दादुला भवसागरीं न सरत कीयो॥१॥ माह्या वऱ्हाडिणी नवजणी सांगातिणी सवें बारा सोळा। अनुहात तुरे वाजोनि गगनीं जगीं जया सोहळा। मान्हा पतीपर्यंत त्याले देखि वो जग जाया आंथला॥२॥ बाप दिन्हो ज्या घरीं त्या लेवो नाहीं। जाति ना कुळ त्यान्हा पालऊ धरि गयो तंव तो सूक्ष्म ना स्थूळ॥३॥ बिहति बिहति मी गये तंव त्यान्हे माले धरे वो हाती। पाठिमोरा वरु वोलख्या त्याने मी बैसे पाठी॥४॥ निरंजनीं मंडप ध्याल्यावो। लग्नविण जाया पाणिग्रहण ब्रह्माक्षरीं। बोलीनें तंव त्यान्हे नेत्रीं दिन्हीं वो खुण॥५॥ पांचजणी सावधान म्हणीयावो। आशा सवती अडधरी। जननिककरंडिये देहे समाविन त्यान्हे माल दिन्हे चिर॥६॥ त्याचि सखिया मान्हीया येरि वों चौघीजन्हे। मिले सुमले येकी करोलीले। जासो यापरी चालविजे सुघरवासु॥७॥ जान्हे सेजे मी पहुडणे तंव तो नपुंसकू वो। जया इंद्रियांविण जान्हा विस्तारु तो पुरुष जगी कैसा वो जाया॥८॥ सोहं वो घरदारीं नांदतां बोला धन्यो

येक पुत नाराज तोही योगिया चालवा व्याईसने मिवो जाया वांझ ॥ ९ ॥ पांच तान्ही वो पांच पारिठि पांच वो सत्य मान्हा पोटीं। अझुणी मी करणकुमारी वो परपुरुवेंसी नाहीं जाया भेटी ॥ १० ॥ मज चौघे दीर भावे राखती चौघी वो नणंदा आटिती। तेणें लागलें मज पिसें। बाईये वो तत्त्वमसी डोळां लेती ॥ ११ ॥ ज्यानें माझें मन सुखी जाया निरालंबीं निरंतरी। राणे रखुमाई भ्रतार श्रीकृष्ण तो म्या दिठी ठो अंतरीं ॥ १२ ॥ दशदिशा दाही जाण दस वो अकरावें मन। बारा सोळा मान्हा सखिया वेचिवोनी निजसजन ॥ १३ ॥ करिं वो कांकण शिरीं बासिंग दाखडाव्या पंढरपुरासि गयो। बापरखुमादेविवरु विठ्ठलु त्यांणें चरणीं समरस गयो ॥ १४ ॥

६०९. मी माझें मोहित राहिलें निवांत। एकरूप तत्व देखिलेंगे माय ॥ १ ॥ द्वैताच्या गोष्टी हरपल्या शेवटीं विश्वरूपें मिठि देतु हरी ॥ २ ॥ छाया माया काया हरिरूपीं ठाया। चिंतीता विलया एक तेजीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवा पाहा ओहंसोहंभावा। हरिरूपीं दुहा सर्वकाळ ॥ ४ ॥

६१०. आत्मतेजें तेज रवि तेज बिंबे। जीवशिवी बिंबे ज्ञान तेजें ॥ १ ॥ तैसें तुज ज्ञान जालेंरे हें काज ॥ केशवीं विराज चित्त झालें ॥ २ ॥ समाधिचें रूप रूपासि आलें काह्या। पसरुनी बाह्या देता क्षेम ॥ ३ ॥ प्रवृत्ति निवृत्ति दोहींची तटाक। उतरालासि एक सिंधोदक ॥ ४ ॥ क्षीर नीर हरि जाला असे स्वादु। अवघाचि गोविंद नाना देहीं ॥ ५ ॥ निवृत्तिसंपत्ति आलिया पैं हाता। तत्वीं तत्व निमथा उलथा तूं ॥ ६ ॥

६११. प्रथम नमूं तो गुरुदेवो। जेथें निमाले भावाभावो। अनादि स्वरूप स्वयमेवो। तो आदि देवो नमियेला ॥ १ ॥ जे हें मनाचें पैं मूळ। जेथे द्वैताचा दुष्काळ। स्वरूपीं स्वरूप केवळ। तो अढळ नमियेला ॥ २ ॥ हें जग जेणेंसि संचलें। परी कोठें नाहीं नाडलें। जेविं हालिया अंतराळें। तैसा सर्व मेळे असतांही ॥ ३ ॥ ऐसा सर्वांअतीत। परी ऐसा हा जगभरी होत। कनक कांकणीं रहात। तैसा अविकृती निरंतर ॥ ४ ॥ जो मनबुद्धि अगोचर। तोचि झाला चराचर। हा आत्मसुखाचा विचार। आपविस्तार केला जेणें ॥ ५ ॥ तो जाणावा ज्ञप्तिरूप। निवृत्तिनाथाचें स्वरूप। एकदंत नामें ज्ञानदीप। बोध स्वरूप ज्ञान देवा ॥ ६ ॥

६१२. मी तूं प्रवृत्तिसी आलें। समग्र गिळिलें वासनेसी ॥ १ ॥ नाहीं त्यासि मेरु कैसा विवेकु। जनवन लोकु ब्रह्म दिसे ॥ २ ॥ उजडली शांति मावळली निशी। अवघा ब्रह्मरसीं पाजळलें ॥ ३ ॥ ज्ञानदेवा चित्तीं क्षमाचि उपजली। प्रवृत्ति सामावली निवृत्ति रया ॥ ४ ॥

६१३. दुरि ना जवळी त्रिभुवनमंडळी। ते मनाचा मुळीं बैसलेंसे ॥ १ ॥ पाहतां न दिसे भानुप्रकाशें। येऱ्हवी तें असे मशकिं रया ॥ २ ॥ बोलों जातां येणें जिव्हाचि खादली। पाहातां पाहातां नेली चर्मदृष्टी ॥ ३ ॥ दांतेविण जेणें स्थूळदेह खादले। शस्त्रेविण छेदिले लिंगदेह ॥ ४ ॥ त्वंपदिं सिद्ध निवृत्ति लाधलें। गुरुलक्षीं लक्ष हारपलें ॥ ५ ॥ निवृत्तिदासा तुम्ही बहुत न बोला। रखुमादेविवरा ध्याइजेसु उगला ॥ ६ ॥

६१४. अधीक देखणें तरी निरंजन पाहाणें। योगराज विनवणें मना आलें वो माये ॥ १ ॥ देहबळी देउनि साधिलें म्यां साधनीं। यानें समाधान मज जोडलें वो माये ॥ २ ॥ अनंगपण फिटलें मायाछंदा सांठवलें। सकळ देखिलें आत्मस्वरूप वो माये ॥ ३ ॥ चंदन जे जेविं भरला अश्वत्थ फुलला। तैसा म्यां देखिला निराकार वो माये ॥ ४ ॥ पुरे पुरे आतां प्रपंचा पाहाणें । निजानंदीं राहणें स्वरूपीं वो माये ॥ ५ ॥ ऐसा सागरु। रखुमादेविवरु। विठ्ठलु निर्धारु। म्यां देखिला वो माये ॥ ६ ॥

६१५. पंधरयाची खाणी अनर्घ्यरत्नाचें पाणी। तें निरंजनीं वनीं शोभतसे वो माय ॥ १ ॥ गुणांची लावणी लाविली गगनीं। निरंजनीं निर्गुणीं आथिले वो माय ॥ २ ॥ पूर्णानंद सच्चिदानंदकंदु तो

निरंजनीं स्वादु आळवीतो माय॥३॥ लक्ष कोटी एकला अनंतगुणी जाहाला। तो अंगें अंगवला निजस्वरूपीं वो माय॥४॥ ब्रह्मरसें भरला दाहीं दिशा व्यापिला। आनंदु सच्चिदानंदी वोसंडला वो माय॥५॥ ऐसा सुखसंवादु सागर भरला। रखुमादेविवरा विठ्ठला वो माय॥६॥

६१६. पुरे पुरे वो आतां जिणे निमालें। मज निरंजनी आफाविले गोंवळें वो माय॥१॥ आणिकाची चाड न लावावो मातें। एकल्या अनंतें मज बरवें केलें वो माय॥२॥ तें परदीपीं उसळलें अंधारें फेडिलें। कोडे कवतिकें जोडलें स्वरूप वो माय॥३॥ आतां मी वेगळावलें पांचाहुनी जाहालें। परब्रह्म जोडलें किरु वो माय॥४॥ ऐसा जगजीवनु जोगावला जगमूर्ति देखिला। तो जगदेश्वरु फळला निरंजनी वो माय॥५॥ भुक्तीभरीं निडारला निजानंदु घनावला। रखुमादेविवरु स्थिरावला हृदयीं वो माय॥६॥

६१७. ठसावलीं देहीं परब्रह्म मूर्ति। सोहं शब्दीं गती प्राप्त जालीवो माय॥१॥ सहजीं सहज स्थिति। जाली वो माये॥२॥ विरालीं अष्टांगे देखोनि गोमटें। पाहातां प्रेम फुटें पातीं श्रमती वो माय॥३॥ अष्टभुजांचिया रिघालीये खेवा। तंव विश्वाचा बाहूवा देखिला वो माय॥४॥ नसमाय लेववितां लेविविजे कैसेनि। निरंजन अंजनीं लेईजे वो माय॥५॥ हे भुली सांडूनि भुलवी परमबोध बोधवी। तोहा रखुमादेविवरु विठ्ठल वो माय॥६॥

६१८. अमित सूर्य प्रकाशले तेज उदयो जाहाले। ज्ञानज्योति फांकले दुणावोनि वो माय॥१॥ दामोदर नामें मना बांधिलें दावें। निरंजन म्हणावे आपणा वो माय॥२॥ गुणचि नाहीं त्यासी काय लाऊं गुण। अतीत निरंजन देखिला वो माय॥३॥ डोळा जरी पाहीं तरि वो डोळियासि आरुवारु। सेऊं म्हणो तरि पारु न कळे खेवोवो माय॥४॥ आतां असे हव्यासु लागला निजध्यासु। निरंजनीं सौरसु करीतसे वो माय॥५॥ आतां आहे तैसा असो माझ्या हृदयींच वसो। हा रखुमादेविवरु विठ्ठलु वो माय॥६॥

६१९. थोकलें याच्या गुणीं तनुमनासहित। त्या निजतत्त्वीं प्रीत निमालें वो माय॥१॥ साहीं संवादले चौघे अनुवादले। पुरोनि उरलें म्या देखिलें वो माय॥२॥ कापुराची भांडुली परिमळें भरली। दीपीं उजळी रूप नासले वो माय॥३॥ तेथें नाहीं ल्याया रूप ना छाया। ऐसी ज्योती कर्पूराची उजळल्या वो माय॥४॥ तेथें नाहीं उरवणी एकला एकपणीं। देखतांचि नयनी उमळला वो माय॥५॥ ऐसी जाली प्राप्ती खुंटली मागिल गती। रखुमादेवीपती जोडला वो माय॥६॥

६२०. ठकपरी धरिला मनोवेगें बांधला। तो ठेंगणाचि जाहाला अनिवाड वो माय॥१॥ समाधी ध्यान निजध्यासिं आरुढलें। तंव अवघेंचि पारुषलें अभाव वो माय॥२॥ हा असो जैसा तैसा हृदयमंदिरीं ऐसा। परपुरुषीं अपैसा अनुसरलें वो माय॥३॥ बरवा देखोनि न्याहाळीं दिव्य कांति झळाळी। परब्रह्मीं दिवाळी चहूंदिशांची वो माय॥४॥ त्यानें निवाला मनु भेटला जगजिवनु। तो आनंद सुख गहनु उचंबळे वो माय॥५॥ हा निरालंब वोळवा भक्ति भावें मिळाला। रखुमादेवी दादुला विठ्ठल राणा वो माय॥६॥

६२१. पाहातां सप्त पाताळें एकविसांवेगळें। तें निरंजन आगळें खुतलें डोळांगे माय॥१॥ पांवा वाहे तळालोरी नादु उमटे अंबरीं। तया सुखसागरीं बुडालें वो माय॥२॥ सुखसंवादु लागला जिवनी जिवनु भेटला। भेटीं देऊनि गुंतला मनोमंदिरीं वो माय॥३॥ आतां न सोडी न राहे आणिकु न पाहे। तंव हाचि लवलाहे मिळाला वो माय॥४॥ आवडी रिघालें घर आपुलें। सहजीं सामावलें स्वरूपीं वो माय॥५॥ वैराग्य-भक्तिज्ञानाची माउली। ते रखुमादेविवरविठ्ठली भेटलीं वो माय॥६॥

६२२. जनीं वनी हरी आहे निरंतरी। बोलिलीं

वैखरीं व्यासमुखें॥१॥ जगजीवईश्वर क्षरला चराचर। लक्षालक्ष पार अलिप्तपणें॥२॥ चहूं देहां ग्रासी व्याला तत्वें तत्वेसी। हरि वैराटेसी एक वृक्ष॥३॥ ज्ञानदेवो म्हणे वृक्षही वृक्ष न होणें। असोनि नसणें सुमनीं जैसें॥४॥

६२३. संसारसातें आलों मी पाहुणा। दिसे दोन्ही आनंदा पाहवायासी॥१॥ तव त्याचे तेजें झडपिलें मज। मजमाजि काज होऊनि ठेलें॥२॥ चित्त जव निवडी तव आपणहि पळे। अवचितें जवळ येतु असे॥३॥ जाऊं पाहे परता तव नेतु असे पंथा। वैकुंठींच्या कथा आपण सांगे॥४॥ एकरूप दिसे तव सभोंवता आपण। अवघा नारायण अवघा नारायण ज्ञानदेवा॥५॥

६२४. आदिमध्यअंत तुजमाजि बिंबे। ब्रह्मीं ब्रह्म थांबे लवण जळीं॥१॥ तैसें झालें ज्ञाना उन्मनी उलथा। प्रपंच चळथा उडालिया॥२॥ रिगु निगु काज जालें तुझें घर। अवघाचि संसार कळला आम्हां॥३॥ गोप्य गुजराज उमजलासे हरि। दिसे अभ्यंतरीं आत्माराम॥४॥ न दिससि ज्ञाना देहीं तुझ्या राम। घेतला विश्राम ऐसे दिसे॥५॥ निवृत्ति निवांत समरसें पाहात। अवघाचि दीसत देहीं विदेही॥६॥

६२५. सुखीं सुख मुरे तेथें कोण झूरे। जळी लवण विरे तैंसे जालें॥१॥ ज्ञान ते विज्ञान प्रंपचेंसि भान। तेजोरूप गगन बिंबलें दिसे॥२॥ आत्मा आत्मरूप परमात्मा समीप। कोटि कोटिरूप एकलेंचि दिसें॥३॥ नाना तेजी भासे प्रपंचप्रकाशे। विरुळा समरमें ध्याये त्यासी॥४॥ ऐसे जालें तुज प्रगटलें निज। कासवीचें बीज अंकुरलें॥५॥ निवृत्ति निजबोध आनंदादि कंद। शाखाद्रुमभेद हरि जाला॥६॥

६२६. सुवेळेची शेज आवेळे घातली। निवृत्ति मोहिली निसंदेह॥१॥ मोह न खुंटलें ममते तुटलें। एकरसी भरलें तत्वीं तत्व॥२॥ प्रपंचाचे घरीं दिसतें कारण। अवघे निराकारण तत्वीं तत्वमय॥३॥ बापरखुमादेविवर त्रिपुटीं न दिसें। रसीं सर भासे हृदय दीपीं॥४॥

६२७. जुगादीचें जुग युगादिचें युग। लक्षा आदिलक्ष मावळलें गे माये॥१॥ मावळल्यावीण भ्रांति जाल्या कोण्ही। निजब्रह्माची खाणीं ठायीं न पडेगे माये॥२॥ रखुमादेवीवर निघोनि घेतला। निर्गुणचि जाला तयासहितगे माये॥३॥

६२८. आत्मा आंगे प्रसिद्ध देखिला। अंतर्बाह्य अलिप्त व्यापला॥१॥ देखिजेसें नाहीं देखिला म्हणती काई। देखणें तें देहीं देखतुसे॥२॥ रूपरेखा नाहीं लक्षावा कवणें ठायीं। लक्षीं लक्षितांही परतल्या दृष्टी॥३॥ ज्ञानदेव म्हणें आनंद होईल पूर्ण। अनुभवें तेचि खुण देखतसे॥४॥

६२९. गगन डोळां भासलें तें वाहाटुळीनें कवळिलें। तेथें काहीं एक उगवलें रूप अरूप वो माये॥१॥ पूर्ण पीठिका टाकुनी मायास्तंभ उभउनी। निजानंदी माळ घालुनी तंव तो वरिला वो माये॥२॥ हा कामीं कामरंजनु गुणहि निर्गुण। पाहातां परिपूर्ण तरी तो सहज वो माये॥३॥ हा पुरोनि उरला नयनीं वोसंडला। बापरखुमादेविवरा विठ्ठला तरि तो वरिला वो माये॥४॥

६३०. चहूंदारवंटा वोलांडुनि वोजा। अंतरीं आत्मकाजा बोधिलें वो माय॥१॥ आनंदाचे चक्षु उघडी पातीं। शब्दा नि:शब्दां अतीति मी जाहालिये वो माये॥२॥ पांगुळें इंद्रियेग्रामु संवादे आत्मरामु। तो ईश्वरु पूर्णकामु मज भेटवा वो माय॥३॥ तेथें गोरस जालालें ज्ञाना अंतरीं वोजावलें। सदेवपण आलें मज वो माय॥४॥ पाहतां ठेंगणे डोळे न्याहाळितां आगळें। ते पदप्राप्तीवेगळें सगुणनिर्गुण वो माय॥५॥ ऐसा हा दिपीं दीपपरनायकू। रखुमादेववरु एकु जोडला वो माय॥६॥

६३१. गगन डोळां भासलें। तें बाहुलिनें कवळिलें। कांही एक उरलें रूप अरूपीं वो माय॥१॥ पूर्वपिठिका सांडूनि मायास्तंभ

उलंघुनी। निजानंदी माळ घालूनि म्यां वरिलें वो माये॥२॥ तो कामिक कामिनी निरंजन निर्गुण निर्गुणी। पाहातां पूर्णापूर्ण सहज वो माय॥३॥ हा भरोनियां पुरला नयनीं वोसंडला। रखुमादेवीवरू विठ्ठला मिळाली वो माये॥४॥

६३२. नव्हे त्याची दुराश म्यां सांडिली वो आस। ज्ञानवैराग्यभक्तिसार वोळला वो माय॥१॥ संभोगवोवरीं होतिये निदसुरी। योगिणी खेचरी मज जागविलें वो माय॥२॥ ऐसा हा योगिराजु तो विठ्ठल मज उजू। बापरखमादेविवर देऊं ठेलें वो माय॥३॥

६३३. दृष्टीचें गुज संच्चिदानंद सहज। तें चक्षूच्या अंतर निज निरोपिलें वो माये॥१॥ अनुवादु खुंटला एकपणें एकला। संबंधु तुटला मागिलाचा वो माय॥२॥ पुरती दृष्टी पूर्ण ब्रह्मींच भासली। त्या सुखा दोंदुलीं वाढलीवो माय॥३॥ अवलोकितां न अवलोकवे बोलिजे तैसा नव्हे। हा रखुमादेविवरु भावें माथिला वो माय॥४॥

६३४. ब्रह्मपदाची प्राप्ति उमगेल दृष्टी। परम चैतन्यांचे पोटीं विश्वंभरु वो माय॥१॥ अवघाचि देखिला अवघा मालवला। देखोनि निवाला जीवगे माय॥२॥ कापुराची पुतळी कर्पुरदीपु पाजळी। तैसी मी त्याच्या मेळीं जाहाले वो माय ॥३॥ तेथें रूप ना छाया त्रिगुण ना माया। रखुमादेविवराचिया उपाये वो माय।

६३५. अंजनी अंजन साधिलें निधान। द्वैताद्वैतघन विज्ञानेसी॥१॥ सारिलेसें द्वैत अद्वैत सफळ। निर्गुण निर्मळ निवळलें॥२॥ साध्य साधक वस्तु आलिया पैं हातां। मुरडोनि पाहतां वस्तुमय॥३॥ ज्ञानदेवीं साध्य अज वस्तुचें। देहीं देह साचें नुरे तरी॥४॥

६३६. न चुकतां चुकलें। संसार वाटे भांबावलें। अवचितें पडले ज्ञानपेठे वो माय॥१॥ माझा निवृत्ति तूं सारा लाधला विकरा। गिन्हाइक पुरा विठ्ठल गे माय॥२॥ कांहीं नाहीं उरले प्रेम वो माय॥३॥ हा पुरोनिया उरला निजानंदु सांवळा। रखुमादेविवरु जोडला कष्टीं वो माय॥४॥

६३७. न गणवे परिमाणें न बोलवे अनुमानें। तो सहज निर्वाणी ज्ञानें फळला वो माय॥१॥ मुक्ताची साउली मजवरी पडली। ढेसी ढेसी वोल्हावली अमूर्तधारी वो माय॥२॥ तेथें एक नवल वर्तलें वो साजणी। सांगतां मिठी मौनी पडली वो माय॥३॥ ऐसा परोपरी फळला दिव्यरूपें फावला। तो रखुमादेविवरु जोडला वो माय॥४॥

६३८. ज्ञानाचें गरोदर वाढलें परपुरुषें व्यभिचारिणी ऐसें म्हणती लोक वो माय॥१॥ नव्हे व्यभिचारिणी नाहीं मज कोणी। पाहतां निर्वाणी सहज जोडलें वो माय॥२॥ निवृत्ति पुराडला देहेभाव चोखाळला। अंगेंसि मर्दिला ब्रह्मरसु वो माय॥३॥ आतां उजरणी येई भ्रांती नलगे माझ्या चित्तीं। उजरणी सहजगती जाली वो माय॥४॥ आतां असो हें बोलणें दुर्जना हें सांगणें। चिदानंदघन तेणें वाढलें वो माय ॥५॥ ऐसा देखणिया देखिला निजगुप्त प्रकाशला। तो रखुमादेविवरु मज फावला वो माय॥६॥

६३९. आपला गुणग्राम सांडूनियां गेलिये। निवांत राहिलिये निर्गुणी वो माय॥१॥ परोपरी पहातां सर्वरूपीं गोपाळ। तो मजपासीं परी खेळ न लगतां वो माय॥२॥ अनुवाद खुंटला सर्वांगें भेटला। गुणग्राम तुटला सहज वो माय॥३॥ ऐसें म्यां रूप आपुलें आपणचि केलें। रखुमादेवीवरे विठ्ठलें वो माय॥४॥

६४०. पुरे जरी म्हणों तरी अमित पुरला। पुरोनिया उरला तेज:पुंज वो माय॥१॥ ज्ञानाचे खाणीं माणिके निर्वाणी लाधले मी निर्गुणी निरालंब वो माय॥२॥ आत्मत्वाचिया परी खेवणिलीं भूषणें। तें मी आवडीचें लेणें लेइलें वो माय॥३॥ हा सुजडु जडला विटेसि लाधला। त्या रखुमादेविवरा विठ्ठला मी न्याहाळी वो माय॥४॥

६४१. जाणोनि नेणपण अंगीं बाणले। नेणोनियां जाणपण सहज नेणवलें वो माय॥१॥ आत्मज्ञानाची गति जाली वो निवांत। प्रबोधतत्व मी पावलें वो माय॥२॥ पाचारिलें अवस्था स्वभावें जाहल्या। म्हणोनि विसरल्या देहभाव माय॥३॥ गुरुमुखें जै जोडे तें फिटे सांकडे। रखुमादेविवर कोडें कवतिके वो माय॥४॥

६४२. अंजनी संपूर्ण ठेऊनियां जन। ज्ञानी ज्ञानघन निरालंबीं॥१॥ आदि मध्य आंतु दिसोनियां दिसे। पाठीं पोटीं दिसे निघोट रया॥२॥ श्रवणनयन जातिगोतपूर्ण। जीवशिवा खुण आसपणें॥३॥ ज्ञानदेव म्हणें वाच्य वाचक योगें। हरिविण वाउगें नाहीं रया॥४॥

६४३. ज्ञानध्यानपटीं तंतु पैं मनाचा। हरिरूप वाचा सारीपाट॥१॥ स्वरूपकामारी वाग्पुष्पें चारी। विरळा मापारि जाणें खुण॥२॥ त्रिगुण सवडी घालुनि उलथी। एकरूपपंक्तिजेवि नरु॥३॥ ज्ञानदेवा घर तत्वता निर्गुण। परेचें संपूर्ण घर केलें॥४॥

६४४. मृत्युचेनि मापें जे जे गेले प्राणी। तयाची शिराणी यम करी॥१॥ यम नेम धर्म आम्हां नाहीं कर्म। अवघेंचि ब्रह्म होउनि ठेलों॥२॥ द्वैतभाव ठेला अविनाश संपन्न आपेंआप जनार्दन येईल घरा॥३॥ ज्ञानदेव म्हणे काज सरलें संसारी। चारीही मापारी गिळूनि ठेलों॥४॥

६४५. स्वरूपी पाहातां लक्षलिही घेतां। अरुप अनंता गुणी नाहीं॥१॥ कैसेनि स्वरूप प्रकाश पैं दीप। एकीं एका सोप आकळे कैसें॥२॥ नाहीं या आधार आधारासि निर्धार। परेसि परे पार परमतत्व॥३॥ ज्ञानदेवघरीं पश्यंती वोवरी। वेदश्रुती घरीं दीप केले॥४॥

६४६. लवण पवन जळापासाव धीर। पावन समीर रवी तया॥१॥ तेज दीप्तीं आत्मा इंद्रिया प्रकाशी। अमरसुनी ग्रासी दिव्य तेज॥२॥ पंचक दशकत्वता विचारी। एकरूपें सरी ग्रास त्याचा॥३॥ ज्ञानदेवा जप हरि आत्मा माझा। चिंततां नलजाये तूं वेगीं॥४॥

६४७. सायुज्य सदन श्यामाचिये घरीं। हृदयकल्हारीं श्यामतनु॥१॥ सचेत अचेत नित्यता विरक्त। असोनि अलिप्त जन्ममरणा॥२॥ नारायण साध्य साधक साधिता। विग्रह पूर्णता आंगी लागे॥३॥ ज्ञानदेवी मौनीं गुणग्रास धाम। सर्वत्र आराम हरी माझा॥४॥

६४८. मोहाचें मोहाळ सांगितलें एकीं। पाहतां परिपाकीं मोहाळ नाहीं॥१॥ मोहिलेची दिसे मोहामाजी रसें। नसोनियां भासे तदात्मक॥२॥ बिजीं बिज हरि दिसोनि अविट। विटोनीयां नीट कळिका फाकें॥३॥ बापरखुमादेविवरा आबोला सवळे। अवघेचि निवळे गुरुकृपा॥४॥

६४९. एकि म्हणे ग्रह दुजी म्हणे मोहे। एकीनें सोहं सांगीतलें॥१॥ कोहं वाचे वारी सोहं ममतें सारी। वैकुंठीची दरी उघडली॥२॥ ककार भेदीला मकार शोधीला। ओंकार निमाला तये स्थानीं॥३॥ ज्ञानदेवीं ओहं सोहं गिळिलें पैं कोहं। नाहीं आम्हां मोह कल्पनेचा॥४॥

६५०. दुजेपणीचा भावो आम्हां नाहीं ठावो। सर्वी सर्व देवो आकारला॥१॥ कैसें याचें करणें सांग आम्हां माय। कामधेनु होय कल्पनेची॥२॥ नित्यसुखवेधें वेधली कामना। कृष्णीं कृष्णनयना एक तेजें॥३॥ निर्वृत्ति साचार ज्ञानदेवीं आचार। कृष्णचि परिवार क्षरलासे॥४॥

६५१. अवघेनि मनें दोहीलिया धेनु। प्राणापानीं प्राणु जीवविला॥१॥ तें रूप परब्रह्म प्राणे प्राण सम। करुनियां नेम जपों आम्ही॥२॥ नेणो धूर्ति मूर्ति कैची हे प्रवृत्ति। कृष्णेंचि समाप्ति सर्व करूं॥३॥ निवृत्तिचें तारूं कृष्णीं कृष्णसुख। ज्ञानदेवा चोख दिधलें नाम॥४॥

६५२. निर्गुणाची छाया सगुणीं बिंबली। तत्वीं तत्त्वे गेली अनुठाया॥१॥ निश्चळीं निश्चळ नलगे आळुमाळ। तत्वता अढळ तें वेगळेची॥२॥ नातळतां

पंथी शब्दाचा सुहावा। परेसहित दोहावा भरला दिसे॥३॥ ज्ञानदेवी रम्य दिसोनि न दिसे। निराकारी भासे तदाकारें॥४॥

६५३. दिपाचेनि तेजें पैस घेती माया। जाय सांगावया द्वैतभावो॥१॥ द्वैत नाहीं अद्वैत नाहीं। ठाईंचा ठायीं एकतत्व॥२॥ तैसे रसमय तेज स्नेहार्णव बीज। छाया मोहबीज अकळ दिसे॥३॥ बापरखुमादोविवरु वोतली पैं कळा। न दिसोनि सोंविळा दिस दिसो॥४॥

६५४. सगुणीच्या रातीं निर्गुण दिवटा। सांगती चोहटा वाग्पंथें॥१॥ वागेश्वर हरि वाचेचा वाचक। आधीचाही अर्क दीपतेजें॥२॥ साकारीं निराकार बिंबीं बिंबाकार। अवघे माजघर बिंबलेंसे॥३॥ बापरखुमादेवीवरु ॐतत्सदाकार। निवृत्ति निर्धार माजीवटा॥४॥

६५५. सामता वसोनी मायेसी पर । विज्ञान हें घर जीवी वसे॥१॥ ज्ञानीं वसोनि ज्ञानी न दिसे। बिंबी बिंब रसें समता शांति॥२॥ आपी आपरस जनवनदारा। विज्ञान उभारा भावी दीसे॥३॥ बापरखुमादेवीवरु उभारण हरि। दिपु माजघरीं ठेविला असे॥४॥

६५६. वृत्तीचा उच्छेद मना निग्रह। धारण विग्रह तेजतत्वीं॥१॥ बिंबामाजि बिंब हरपलें स्वयंभ। मायेचा पैं लोभ अरता जाला॥२॥ नाहीं तेथें छाया मायेचा विलास। घरभरीं पैस दीपीं रया॥३॥ बापरखुमादेविवर ज्ञानदेवा धन। वस्तूची विवरण तेजाकारें॥४॥

६५७. ज्योतिस ज्योती मेळउनी हातीं। तव अवचिति झोंबिन्नली॥१॥ अद्वैत पाहतां न दिसे गुणमेळु। गुणा गुणीं अडळु ठाउका नोहे॥२॥ शून्याहि परता आदि अंतु नाहीं। तो असोनियां देहीं धांवो सरे॥३॥ बापरखुमादेवीवरु विसरता धांव। हरिरूपभाव दीपकळा॥४॥

६५८. कापुराची सोय कापुरीची माये। परतोनि घाये नेघे तैसी॥१॥ असोनि नसणें सर्वत्री दिसणें। हरि प्रेम घेणें पुरे आम्हां॥२॥ सुखरूप जीव असतांची शिव। हरपले भाव विज्ञानेंसी॥३॥ बापरखुमादेविवरु विठ्ठल सुखाचा। तरंगुही नांवाचा परतेचिना॥४॥

६५९. आदि मध्य अंत सर्वसम हरि। घटमठचारी भरला दिसे॥१॥ देखिलागे माये अलक्ष लक्षीतां। शांति पक्षवाता समबुद्धि॥२॥ भावबळें धन अलोट अभंग। चित्संगें भंग प्रपंचाचा॥३॥ ज्ञानदेव बोले नित्य नाम प्रेम। तेथेंचि विश्राम हरिचा असे॥४॥

६६०. अंतरींचा विस्तारु ब्रह्मीं पाल्हायिला। तेथें एक मनु सिद्ध साधकु भला॥१ ॥ तेणें केलें अनारिसें केलें अनारिसें। पाहों गेलें सरिसें सार पावलेंगे माये॥२॥ तेथें ऋग्यजुःसाम भुलले। तें माझ्या ठायीं फुलले ब्रह्ममय॥३॥ रखमादेविवर अंतरब्रह्मीं तरंगु जाला। ब्रह्मउदधी सामावला मज घेऊनि माये॥४॥

६६१. निर्गुणाचे हातीं व्यवहारु पडिला। दाईजपणें मुकला साभिलाषे॥१ ॥ निरंजनवनीं धरीन मुरारी। भाग अभ्यंतरीं घेईन देखा॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु सोविळा। भाग मज आला हरिहरु॥३॥

६६२. एकभान गिळुं दुजें द्वैत उगळूं। कासेवी चामे गिळूं सगळा॥१ ॥ पोटभरूं येणें वैकुंठीचें पेणें। सेवासुख जाणे कृष्णसुखीं॥२॥ डोंगर सकळे मायेचे मोकळे। प्रपंचा नाकळे या हेतु॥३॥ ज्ञानदेवा साध्य ज्ञानाचे उपाध्य। येर तत्व बोध्य मुक्त कैचें॥४॥

६६३. ध्यानधारणामंत्र साधन। त्रिकाळीं जपन अजपासिद्धी॥१॥ नटकेचि अटकु ठाईचेंचि निर्गुण। मज कवणें ठाईं घेऊनि गेले॥२॥ देश वाढले देश आटले। चहूंद्वारीं कोंदलें ब्रह्मतेज॥३॥ रखुमादेविवरु अठांगी आगळा। सप्तधातूं वेगळा ब्रह्मउदधि॥४॥

६६४. विश्वाचे आर्त माझे मनीं प्रकाशलें।

अवघेचि जालें देहब्रह्म॥१॥ आवडीचें वालभ माझेनी कोंदाटलें। नवल देखिलें नभाकारगें माये॥२॥ बापरखुमादेविवरु सहज निटु जाला॥ हृदयी नटावला ब्रह्माकारें॥३॥

६६५. अनुभव जाला प्रंपच बुडाला। आपुला आपण देखिला सोहळावो माये॥१ ॥ आपण जाणतां आपण मी जालिये। आपणापैं विसरलिये नेहटीं वो माये॥२॥ आपुला म्हणोनि अवघा आलिंगिला। अवघा देखिला अवघेपणें वो माये॥३॥ ऐसे जाणोनि ठकलें ठकोनियां ठेलें। रखुमादेविवरेविठ्ठलें वो माये॥४॥

६६६. दुजेपणींचा भावो। माझिये ठाउनि जावो। येर सकळिक वावो। म्यां त्यजियेला॥१॥ माझें मी जाणें। अनु कांही नेणें। अनुभविये खुणें संतोषले॥२॥ माझा मीचि श्रोता। माझा मीचि वक्ता। मीचि एकु दाता। त्रिभुवनीं॥३॥ एकल्यानें एकला। अनंतरूपें देखिला। दुजेपणा मुकला। ज्ञानदेवो॥४॥

६६७. योगिया दुर्लभ तो म्यां देखिला साजणी। पाहातां पाहातां मना नपुरे धणी॥१॥ देखिला देखिला माये देवाचा देवो। फिटला संदेहो निमालें दुजेपण॥२॥ अनंतरुपें अनंतवेषें देखिलें म्यां त्यासी। रखुमादेविवरीं खुण बाणली कैसी॥३॥

६६८. नादबिंदकळाज्योति स्वरूपीं विलया जाती। श्रुति नेति नेति म्हणती जेथें॥१॥ नाहीं मज चाड सकळ उपाधी। एका मंगळनिधि वांचूनियां॥२॥ श्रीरामीं रमतां मनु निवडितां नये तनु। सुखश्री सांगतां सिणु हारतु असे॥३॥ पदापिंडा दाटणी रुपानिरुपा निरंजनी। विठ्ठला चरणीं ज्ञानदेवो॥४॥

६६९. अद्वैताची झडपणी ब्रह्मीं निमाली। तन्मय तत्त्वतां ब्रह्मचि मुरालीं॥१ ॥ परतोनि पाहणें परतोनि पहाणें। नाहीं त्या ठाया जाणें रूपेंवीण॥२॥ बापरखुमादेविवरु रूपेंविण देखिला। आटकु टाकला द्वैताकारे रया॥३॥

६७०. पाहातां वटाचा विस्तारू कैसा। शाखा फुटलिया कळिया तैसा॥१॥ सांगा लपणें तें काय जालें। वटीं विस्तार दोही हारपले॥२॥ विशुद्धचक्रीं मेरु हा नेडे। तेथें परदीपीं साहित्य जोडे॥३॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला। मनोमानसी तयां सामावला॥४॥

६७१. जाणों गेल्यें तंव जाणणें राहिलें। पाहो गेलिये तंव तेंचि जालेंगे माये। इंद्रियांसहित चित्त ठकलेंचि ठेलें। मी माझें विसरलें स्वयें भाव॥१॥ ऐकोनि देखोनि मन होय आंधळे। परतोनि मावळे नाहीं तेथें॥२॥ अविद्या निरसली माया तुटली। त्रिगुण साउली तेथें रूप कैचें। चांग विचारीलें विवेकें उगवलें। ज्ञान हारपलें तयामाजी॥३॥ मुकियाचे परी आनंदु भीतरी। अमृत जिव्हारीं गोड लागे। बापरखुमादेविवरु विठ्ठलु जाणे। संत ये खुणें संतोषलें॥४॥

६७२. माझें स्वरूप म्यांचि शृंगारिलें। निर्वाणी म्या केलें लयाकार॥१॥ आपुली सोसे वाढवावया गेलें। तव आपणचि ठेलें आपण्याठायीं॥२॥ सहजगुणाचे निर्गुण वो केलें। माझें म्या पाहिलें मन मावळुनिगे माये॥३॥ तीन चारी मिळोनि येके ठायीं घातलीं। बापरखुमादेविवरा विठ्ठलीं फावलीं॥४॥

६७३. येकी सांगे मातु येकी सांगे रेतु। तो कोण दृष्टांतु सखिये सांगे॥१॥ बाई येक सरें नाहीं पैं दुसरें। निवृत्ति दातारें सांगीतलें॥२॥ पांचांची मिळणी साही चक्रपाणी। दशमाची कहाणी येकादश॥३॥ ज्ञानदेवी सार चौवेदीं पार। येकत्वीं विचार विज्ञानेसी॥४॥

६७४. सुखादिसुख तें जालें अनमीष। पाहाणें तेंचि एक पारुषलें॥१॥ काय सांगु मातु वेगळीच धातु। जिवा हा जिवांतु व्यापुनि ठेला॥२॥ नचले नचले कांही कौटाल कामान। देहींच विंदान रचलेंगे माये॥३॥ बापरखुमादेविवरें विठ्ठलें

निटें। वायांविण विटे मिस केलें॥४॥

६७५. आस्वादु स्वादु ये दोन्ही नाहीं। तेरावें पाही साहवा ठायीं॥१॥ तेथें सातवें पंचाक्षरीं जपणें। संहार होणें तमोरूपें॥२॥ रखुमादेविवरु शुद्धसत्वेंविण। शुद्धबुद्ध मी जाण जालेंगे माये॥३॥

६७६. बारावें वरतें तेरावें हारपलें। चौदावें देखिलें चौपोळां॥१॥ चौघांची भाज मी नहोनियां गेलें॥ तंव अनारिसें महाकारण देखिलें॥२॥ रखुमादेविवरु भूतजाता वेगळें। पराहूनि परतें पर पांगुळलें॥३॥

६७७. कापुराचें भांडे म्यां ब्रह्मरसें भरिलें। प्राणीं निमालें परिमळासहित॥१॥ तेथें परिमळु नाहीं स्वादु पैं नाहीं। सुखदुःख नाहीं कांहीचि नाहीं॥२॥ रखुमादेविवरेंसि ठक पडिलें कांहीच नाहीं। चौघे स्वभावीं बोलताती॥३॥

६७८. पांचांची वाट पांचांसवे गेली। येरासि जाहली देशधडी॥१॥ अकरावें होतें धरूनियां नेलें। बारा तेरा गिळिलें धन माझें॥२॥ रखुमादेविवरु चोळु पैं घोटिला। निधन जाहाला शुद्धपणें॥३॥

६७९. आस पुरऊनि आस पुरवावी। ऐसी भूक मज लागों द्यावी॥१॥ तें अनुपम्य कैसेनी सांगावें। जीवा चोरूनि भोगिजें तें जीवें॥२॥ दृष्टि कीर होय जरि निकें। द्रष्टा हो वेडावे जयाचेनि सुखें॥३॥ ज्ञानदेवो म्हणे करुनियां निकें। विठ्ठल परमात्मा भेटेल या फावेतें॥४॥

६८०. मनाचिये वाती लाउं गेलीये ज्योती। ते अवघीच प्राप्ति ज्योतिरूपें॥१॥ तेथें ब्रह्मगर्भा आलें ब्रह्मगर्भा आलें। लयलक्ष उरलें बाईयावो॥२॥ रखुमादेविवरु अप्रमेय देखिला। तोही इच्छितां हारपला माझ्या ठायीं॥३॥

६८१.अष्टही अंगें नवही व्याकरणें। सप्तही त्वचा भेदोन गेलेगे माये॥१॥ तेथें वेदां वाट न फुटे। वेदां वाट न फूटे। येरासी कैंचे पुरपुढेगे माये॥२॥ रखुमादेविवरु मज फावला। देखोनि वोरसला पर पाहीं॥३॥

६८२. जतनेलागीं जीवन ठेविलें। विश्वरूप हारपलें ज्ञानपंथी॥१॥ माझी दोन्ही सामावली दोन्ही सामावली। निजब्रह्मीं गुंडाळिली मनेंरहित॥२॥ अवघा कोल्हाळ एकनिष्ठ जाला। ब्रह्मरसीं बुडाला निवडेचिना॥३॥ रखुमादेविवर जगाचें जीवन। त्याचेंही मीपण गेलें विठ्ठलनामें॥४॥

६८३. स्मरों कैसेनि विस्मरों कैसेनि। दोहिपरि मज अटी रया॥१॥ पाडु पडिला विषमें ठायीं। देतां घेतां नुरेचि कांही॥२॥ रखुमादेविवरु विठ्ठलु नेणिजेसी। तवं तोचि तयासि आठवी रया॥३॥

६८४. कूटाकूट अंती कूटस्थ पैं जालें। अशेष उरलें त्या वेगळे माये॥१॥ गुणा भ्यालों म्हणौनि निर्गुण पैं जालें। तें निराकार आथिलें माझ्या अंगी॥२॥ बापरखुमादेविवरु अधऊर्ध्व वेगळे। अर्धमातृका सामावलें अशेष परेसहित॥३॥

६८५. एकांतीचें गुज पुसों गेलिये सये। मी माझी नाहीं त्यासि कीजे वो काये॥१॥ ऐसी भेटी निवाडे सांगिजे कोणापुढें। मनासी सांकडें पडिलें रया॥२॥ सुलभ सुकुमारु रूपें मनोहरु। रखुमोदवीवरु परेही परता॥३॥

६८६. चातकेंविण अंतरींच ठसलें। तेथें एक वोळले ब्रह्ममेघ॥१॥ तें जीवन अमृत जीवास जालें। त्याहुनि एक आगळेंगे माये॥२॥ रखुमादेविवरू हातेंवीण स्पर्शलें। चक्षुविण देखिलें निज ब्रह्मगे माये॥३॥

६८७. तें अवघेचि नव्हें नव्हें अवघेचि होय। आवघ्याविण सोय आणिक असे॥१॥ अवघे म्हणिजे तें व्योमाकार दिसे। त्याहुनि परतें असेगे माये॥२॥ रखुमादेविवरु पाहता पाहावया गेले। पर तें पराहूनि देखिलें गे माये॥३॥

६८८. तनुमनुधनें पूजन पैं केलें। आत्मलिंग पूंजिलें बाईये वो॥१॥ तंव निराकार देखिलें निराकार देखिलें। मी पूजन लिंग तिन्हीं हारपलें॥२॥

रखुमादेविवरु निजलिंग विवळलें। आवघी आवघे ठायी सामावलें बाईये वो॥३॥

६८९. सगुणाची शेज निर्गुणाची बाज। सांवळी विराजे कृष्णमूर्ति॥१॥ मन गेलें ध्यानीं कृष्णाचि नयनीं। नित्यता पर्वणी कृष्णसुख॥२॥ हृदयपरिवारीं कृष्ण मनोमंदिरीं। आमुच्या माजघरीं कृष्ण बिंबे॥३॥ निवृत्ति निघोट ज्ञानदेवा वाट। नित्यता वैकुंठ कृष्णसुखें॥४॥

६९०. आहे तें पाही नाहीं ते कांही। ठायीच्या ठायीं हरपलें॥१॥ नाहीं आम्हां काज नाहीं आम्हां चोज। आमुचें निज गोविंदराजा॥२॥ बापरखुमादेवीवरु आनंदसोहळा। ब्रह्मानंदकळा भोगीतसे॥३॥

६९१. निर्गुणाचा पालऊ लागला। लय लक्षीं हारपला देह माझा॥१॥ वायांविण गेलें वायांवीण गेलें। अवघी बुडाले ब्रह्मेंसहित॥२॥ रखुमादेविवरु विठ्ठलु मालाथिला। निजपद पावला जिऊ शिवीं॥३॥

६९२. कोटीची भरोवरी सरोनी गेली शरीरीं। संसाराचि उरी कांही नुरेचिगे माये॥१॥ लक्षाचा लाभ मज घडलागे माय। कवणें उपायें चरण जोडले वो॥२॥ चिंतनीं चिंतिता काय चिंतावें। तें अवघेंचि मनीं रूप गिळावेंगे माये॥३॥ बाप-रखुमादेविवरु देहेंवीण आलंगिला। तो समर्थ माल्हाथिला बाईये वो॥४॥

६९३. मी बोल बोलें तो गेला कवण्या ठायां। हें पुसों आलों लवलह्यां वो। कव्हणि न सांगति मागूं धावें काह्या। आतां लाजिलें ऐशा स्नेहागे माये॥१॥ चला कांवो मज आडोनी। रूप पाहोंद्या कां माझें मजलागुनी। वेडावलें मज देखुनी। शेखीं मी माझें गेलें हारपोनिगे माये॥२॥ मी बोला आंतु कीं बोल मज आंतु। सुखें मुरालें रूप रूपांतुवो। बापरखुमादेविवरु विठ्ठलासि येकांतु। आतां पुरला अंतु। दुजेपणागे माये॥३॥

६९४. आम्हीं संन्यास घेतला। देहादिकांचा त्याग केला॥१॥ आम्ही संन्यासी संन्यासी। सदा राहों एकांतेंसी॥२॥ चित्तचतुष्टया निरसिलें। अज्ञाना तिळोदक दिधलें॥३॥ ज्ञानाचें विज्ञान आलें हातां॥ आम्हां नाहीं शरीरममता॥४॥ ब्रह्माहमस्मि शुद्धज्ञान। तेथील सांडिला अभिमान॥५॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु हृदयीं। तोचि सबाह्य-अभ्यंतर ठाई असे रया॥६॥

६९५. माझी प्रकृति निष्कृति जालीं। ब्रह्मीं सामावली बाईये वो॥१॥ देहेविण ब्रह्म देखे देहेविण ब्रह्म देखे। तेणें निर्गुण राखे रोखावलें॥२॥ जाणतां म्हणौनि नेणतां पै गेलें। शेखीं आपणातें विसरलें बाईये वो॥३॥ रखुमादेविवरु नेणोनि जाणीतला। जाणपणें निमाला माझ्या ठायी॥४॥

६९६. समर्थ सोयरा बोळावा केला। परि मार्गु गमला सुखाचा बाईये॥१॥ भय आमुचें गेलें न व्हावें तें जालें। तो चोरुचि वोळखी जाला बाई ये॥२॥ लक्षाचा लाभु जोडला ठावो। रखुमादेवि-वरुविठ्ठल नाहो॥३॥

६९७. काळा लपंडाई काळेरात्री खेळे। मी स्वसवें वेधली जाय काळ्याछंदें॥१॥ काळेंनिळें हें अभ्र भासलें। ऐसे रूप देखिलें निर्गुणाचें॥२॥ ऐसा हा सांवळा माझिये दृष्टी माल्हाथिला। ऊजरूनि गेला हा विठ्ठलुगे माये॥३॥ ऐसे भुलविलें जाण काळेपणें आपणे। रखुमादेविवरु जाणे येर कांही नेणें॥४॥

६९८. अद्वैत येणें अद्वैतपणें सांडिलें। थितें होतें तें माझें लया पैं गेलें॥१॥ नाहीं तेंचि पाहावया वायांविण गेले। तव पाहाणेंचि जाळे बाईये वो॥२॥ बापरखुमादेविवरु जुनाट जुनघडा। तोहि म्यां सांडिला अरूपसंगें॥३॥

६९९. मन वाचा बंदु निर्वाणी घातलें। निर्माण होतें माझा ठायीं माल्हाथिलें॥१॥ चंचळ मन ब्रह्मीं निश्चळ जालें। अवघेंचि निमाले ब्रह्मार्पणीं॥२॥ रखुमादेविवरुविठ्ठलु उघडा। व्योम पांघुरे फुडां

देखों निघाले ॥ ३ ॥

७००. पंचबाणें माझें हृदय भेदलें। पांचेंविण पावलें च्यान्ही सांडूनिया ॥ १ ॥ सकळै माझें गोत आलें। ब्रह्मरसें जाले बाईयेवो ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु ब्रह्मरसें विवळला। मजसहित निमाला ब्रह्मरूपीगे माये ॥ ३ ॥

७०१. साता व्योमापरतें पाहो गेलें। तव पाहणेंचि जालें ब्रह्मउदधी ॥ १ ॥ साट मोट माझी मोट बांधिली। नेऊनि टाकिली निर्गुणीगे माये ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु पंचविसावा देखिला। तोही खुंटला तये पंथी ॥ ३ ॥

७०२. चक्राकार चक्ररूप चक्रधरू म्हणवी। पाहतां अंतरीं न दिसे कांही ॥ १ ॥ पाहातां पाहातां मी परठाया गेले। तेथें एक देखिलें महद्भूत ॥ २ ॥ रखुमादेविवरु महद्भूता वेगळा। त्याहूनि आगळा तो मनीं मानलागे माये ॥ ३ ॥

७०३. कवतुक पाहावया निरंजना गेलीये। तंव निराकार जाले बाईये वो ॥ १ ॥ अकरासहित पांच पांची मावळली। आदि अंती उदयो जालीं तेजाकारें ॥ २ ॥ रखुमादेविवरु परतोनि देखे। तोही पारुषे तिये ठायीगे माये ॥ ३ ॥

## कूट.

७०४. श्रृंगार करूनि हरिनामतांबूल गुरुअंजन लेउन डोळा। भ्रातारु होता तो निःशब्दीं खिळिला परतोनि माघारि ठेलिये ॥ १ ॥ काम निदसुरा कामिनी जागे कांही के विपरित गमे। भोगत्याच्या ठाईं निशब्दीं खिळिला आपआपण्यातें रमे ॥ २ ॥ पति पद्मिणीविणें गर्भ संभवला सवेचि प्रसूति जाली। तत्त्वबोध उपजला तेणें गुढी उभविली ॥ ३ ॥ तया पुत्राचेनि सुखें सर्वहि विसरलें देहभावा पडला विसरु। बापरखुमादेविवरु विठ्ठलीं तेथें आणिकाचा नव्हे संचारुगे बाईये ॥ ४ ॥

७०५. वडाच्या पानीं एक उभविलें देउळ आधिं कळसु मग पायाहो। देव पुजों गेलों तंव देउळ उडालें पान नाहीं तेथें वडुरे ॥ १ ॥ चेत जाणा तुम्हि चेत जाणा। टिपरि वडाच्या साई हो ॥ २ ॥ पाषाणाचा देवो पाषाणाचा भक्तु पोहती मृगजळ डोहीं हो। वांझेचा पुत्र पोहों लागला तो तारी देवां भक्ता हो ॥ ३ ॥ भवाब्धिसागर नुतरवे ते पडिलें रोहिणी डोहीं हो। नसंपडे आत्मा बुडाले संदेहीं ते गुंतले मायाजळीं हो ॥ ४ ॥ विरुळा जाणें पोहते खुणें केला मायेसि उपावो हो। बापरखुमादेविवरुविठ्ठल विसावा तेणें नेलें पैल थडिये वो ॥ ५ ॥

७०६. चिंचेच्या पानि एक शिवालय उभविलें आधि कळसु मग पायारे। देव पूजों गेलों तंव देउळ उडालें प्रसिद्ध सद्गुरुराया रे ॥ १ ॥ संतजना महंतजना तेथील तें गुज गोडरे। अनुभव अनुभवितां कदांचि न सरे पुरेल मनीचें कोडरे ॥ २ ॥ उपजत नोवरी केळवली केळवला नोवरा नवरी। पितया कंकण करि माता सुंदरी विपरीतगे माय कोडियाची परी ॥ ३ ॥ विपरीत कोडे गुरुगम्य काहाणि ऐके सगुण विरुळा। बापरखुमादेविवरुविठ्ठलु पाहातां पाविजे तो सुखसोहळा ॥ ४ ॥

७०७. देहा लाजिलिये शब्दा रुसलिये। कांसवीचें दूध देऊनियां बुझाविलें माय ॥ १ ॥ काय सांगों तिचा नवलावो। महालोभेंविण कैसा येतों पान्हावो ॥ २ ॥ आवसेचे चांदिणे सांगों गेलिये। रखुमादेविवराविठ्ठलीं वरपडी जालिये ॥ ३ ॥

७०८. निशियेचे भरीं भानु प्रतिबिंबीं बिंबला। बिंबचि गिळुनि ठेला बिंबामाजी ॥ १ ॥ रात्रि सूर्य वाहे दिनु चंद्र जायें। विपरीतगे माये देखीयेले ॥ २ ॥ उदय ना अस्तु तेथें कैचेंनि त्रिगुण। आपणचि दर्पण होऊनि ठेला ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी तोचि जाणे। संत ये खुणें संतोषले ॥ ४ ॥

७०९. पुरुषेविण नारी संचरली शरीरी। आपण्यावरी आळु आला ॥ १ ॥ काय कोण्यासांगे सिणली अनुरागें। पडियेले पतिसंगें अवस्थाभूत ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु जैसा तैसा। व्यापूनि आकाशा उरला असे ॥ ३ ॥

७१०. अचिंत बाळक सावध जालें। निशब्दी बोभाईलें मीचि मीचि॥१॥ गरोदरेंविण बाळक जालें। माया मारून गेलें निरंजना॥२॥ तेथें एक नवल पैं जालें। पेहें सूदलें निरालंब॥३॥ छत्तीस अकरा घोंट पैं घेतला। उदरेविण भरलें पोट देखा॥४॥ सहज गुण होतें निर्गुण जालें। भलत्या झोंबलें निराकारे॥५॥ बापरखुमादेविवरु शून्याशुन्याहूनि वेगळे। त्या बाळका सामाविलें आपुल्या व्योमीं॥६॥

७११. उजव्या आंगें भ्रतार व्याली। डाव्या आंगें कळवळा पाळी॥१॥ कवण जाणे कवण हे खूण। कवण जाणें काय ल्याली भूषण॥२॥ दोहीं आंगीचें लेणें आपण ल्याली। ज्ञानदेव म्हणे विठो आमुची माउली॥३॥

७१२. देउळा आधीं कळसु वाईला। पाहोनि गेलो आपुले दृष्टी॥१॥ विपरीतगे माये देखियेलें। कांसविचें दूध दोहियलें॥२॥ आधीं पुत्रपाठी वांझ व्याली। लेणें लेऊनि ठेले साडेपंधरें॥३॥ बापरखुमादेविवरु विपरीत सुपरीत जाणें। संत तिये खुणें संतोषतील॥४॥

७१३. मज स्वप्नी लेवविला श्रृंगारु। माझें उदरीं जन्मला भ्रतारु॥१॥ जागि सुति ना मी निदसुरी। चोळी सुदली तोडूनि गळसरी॥२॥ लक्षण म्हणे कीं सुलक्षण म्हणे। येके उदरींच आम्हीं दोघें जणें॥३॥ सोईरिक पडिपाडें समसाटीं। मी वो बैसलें तयाचे पाठी॥४॥ निकट कैसें आहेवपण। कैवल्या आधीं तेल कांकण॥५॥ निवृत्ति दास तेथें नाहीं। लग्नमुहूर्त बहुलाठाई॥६॥

७१४. पैलमेरुच्या शिखरीं। एक योगि निराकारी। मुद्रा लावुनि खेंचरी। तो ब्रह्मपदीं बैसला॥१॥ तेणें सांडियेली माया। त्यजियेली कंथा काया। मन गेलें विलया। ब्रह्मानंदा माझारी॥२॥ अनुहत ध्वनि नाद। तो पावला परमपद। उन्मनी तुर्याविनोदें। छंदें छंदें डोलतुसे॥३॥ ज्ञानगोदावरीच्या तीरीं। स्नान केलें पांचाळेश्वरीं। ज्ञानदेवाच्या अंतरीं। दत्तात्रेय योगिया॥४॥

७१५. सेजे सुता भूमी पालखा निजलता उसांसया। गगन पासोडा मेरु कानवडा ते सुख वाड पहुडलया॥१॥ सहज संभोगु भोगु जाणवा। विजया होई मग भोगि राणिवा॥२॥ कमळणी बाळा गुंफिती माळा घालिती गळां देव कन्या। तिचिये शेजारीं सतरावी सुंदरी चंद्रसूर्य दोन्ही चवरी ढाळिती॥३॥ येकु त्यागी दुसरा भोगी तिसरा योगी राजइंद्र। चौथे द्वारीं अतीत पै बैसले गुंफे ज्ञानदेवो॥४॥

७१६. पर्वतु गोफणिये सोकरी लेकरु। ज्याचेनि तृष्णे आटले सप्तहि सागरु। ज्याचेनि स्वेदें बुडाला मेरु। तया माजी ने तया मी काय करूं॥१॥ कैसे नवल चोज जालेंगे माये। खांदीं गंगा चोरू पळतु आहे॥२॥ जयाचिया अंगावरी वडाचीं झाडें। तो हा मुरुकुटावरि बैसला कोडें। विवळादृष्टी पाहे निवाडें। घ्या घ्या म्हणोनि ठाकितो पुढें॥३॥ मनगणिचे तंती वोविली धरणी। ते पिसाळ्यानें घेतली खांदा वाहूनि। त्यासी वोवाळिति चौघीजणी। बापरखुमादेविवराचीं करणी॥४॥

७१७. ऐसा गे माये कैसा योगी। जे ठाई जन्मला तो ठाउ भोगी॥१॥ माय कुमारि बाप ब्रह्मचारी। एकविस पुत्र तयेचे उदरी॥२॥ आचार सांडुनि जालासे भ्रष्ट। माउसिसी येणें लाविलासे पाट॥३॥ पितियाचा वेष धरुनियां वेगीं। मातेचें सुख भोगावया लागीं॥४॥ आणि मी सांगो नवल काई। येणें बहिणी भोगिली एकेचि ठाई॥५॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी जाणे। अनुभवावांचुनि कोण्हीच नेणें॥६॥

७१८. सुकलिये गंगे वऱ्हाड आलें। उतार नाहीं म्हणोन मुरडोनी गेलें। मनगुणीचा तंतीं ओंविली धरणी। पिसोळिया ओझें वाईलें रया॥१॥ तुं ते कवण मी ते कवण। कवण बांधावें तोरण। योगी दिगंबर संन्यासिजे काय। वरमाये हातीं कांकण रया॥२॥ आप तेज पृथ्वी वायो आकाश। या

भासास उटणें केलें। वांझेचिया पुत्रा चोखणी मार्दिलें। ऐसें नवल ज्ञान जालें रया॥३॥ वरबाप वोहबाप जन्मलेचि नाहीं। तंव नवरा नवरी कवणची काई। बापरखुमादेवीवर चिंतिता। तरि तें सुख निवृत्तिपायीं॥४॥

७१९. माते आधि कन्या जन्म पावली तिच्या वऱ्हाडा आईति केली। पाहों गेलों तये चरण ना तुम्ही नेत्र संपूर्ण लक्षणें वोळखिलीं। नवरा गर्भवासि पहिले नामरसी घटित आहे दोघांसीं। अर्थ याचा सांगा श्रोते हो लग्नेंविण आणिली घरासिरेरे॥१॥ कवण कवणाचा विचारु करा उपजत पुत्र म्हातारा युगें गेली तया जाहालिया जन्म ऐसें एक अवधारा॥२॥ पुत्रें मातेसि पय पाजिलें कीं पितयासी कडे वाहिलें। तुम्ही म्हणाला शास्त्रें काय देखिलें तरी उजुचि आहे बोंलिलें। साही शास्त्रें अठरा पुराणें यामध्यें नाहीं बोलिलें। शास्त्र गूढ अध्यात्म गूढ वज्र गुढी पाहे म्हणितलेरेरे॥३॥ साहिशास्त्रें शिणलीं भारी परि अर्थ नकळे कवण्यापरी। सुजाण श्रोते कविजन अपार कवित्व करिती लक्षवरी। एक एक अक्षमाची जाणिव पाहताती सुजाण श्रोतें। कवित्वा कवित्वीं हें काय नवल ज्ञानदेवीं पाहिलें निरुतेंरेरे॥४॥

### संसारतापानें तप्त झालेले प्राणी खरें सिध्द नसता बाह्य वेषधारी साधूचा आश्रय करीतात त्याचा परिणाम.

७२०. पति जन्मला माझे उदरीं। मी जालें तयाचि नोवरी॥१॥ पतिव्रता धर्म पाहाहो माझा। सर्वांपरि पति भोंगिजे वोजा॥२॥ निर्गुण पति आवडे मज आधीं माय। पाठीं झालीये भाज॥३॥ मी मायराणी पतिव्रताशिरोमणि। ज्ञानदेवो निरंजनीं क्रीडा करी॥४॥

७२१. तापत्रयीं तापलीं गुरुतें गिवसिती भगवे देखोनि म्हणती तारा स्वामी। तंव ते नेणोनि उपदेशाची रीति आना न उपदेशिती। ठकलें निश्चिती तैसें जालें॥१॥ संत ते कोण संत ते कोण। हे जाणवि खुण केशवराजा॥२॥ कोण्हीं एक प्राणी क्षुधेंने पिडिले। म्हणोनि दोडे तोडूं गेले। खावों बैसे तों नुसधि रुयी उडे। ठकले बापुडें तैसें झालें॥३॥ कोण्ही एक प्राणी प्रवासें पीडिला। स्नेहाळु देखिला बिबवा तो। तयाचें स्नेह लावितां अंगी। सुजला सर्वांगीं तैसें जालें॥४॥ कोण्ही एक प्राणी पीडिला झडीं। म्हणोनि गेला पैल तो झाडी। खा खात अस्वली उठली लवडसवडीं। नाक कान तोडी तैसें जालें॥५॥ ऐशा सकळ कळा जाणसी। नंदरायाचा कुमर म्हणविसी। बापरखुमादेवीवर विठ्ठलीं भेटी। पडलि ते न सुटे जिवेंसी॥६॥

७२२. धर्म अर्थकाम मोक्ष दान मागे श्रीगुरु। हस्त पाद शरीर व्यथा पंगु जालों मी पुढारु। तिमिर आलें पुढें मायामोहो उदारु। तेणें मी जात होतों। मग सहज भेटला सद्गुरु धर्म जागो सद्गुरु महिमा जेणें तुटें भवव्यथा॥१॥ हाचि धर्म अर्थ काम येर तें मी नेघे वृथा॥२॥ एकनाम राम कष्ण याचें दान देई सद्गुरु। वेदशास्त्र मंथनकेले परि नव्हेचि पुढारु। शरण आलों निवृत्तिराया तोडी माया संसारु। पाहतां इये त्रिभुवनी तुजहूनि नाहीं उदारु॥३॥ ज्ञानेसहित विज्ञान गिळी मी माझें पागुळ। वृत्ति हें माझें ठायीं हृदयी बुझे गोपाळ। शंख चक्र पद्म गदा तुष्टे ऐंसा तूं दयाळ। बापरखमादोविवरें। दान देउनि केले अढळ॥४॥

७२३. देवा तुज चुकलों गा। तेणें दृष्टि आलें पडळ विषयग्रंथीं गुंतलोंसे। तेणें होतसे विव्हळ। अंध मंद दृष्टि झाली। गिळूं पाहे हा काळ। अवचितें दैवयोगें। निवृत्ति भेटला कृपाळ॥१॥ धर्म जागो निवृत्तिचा। तेणें फेडिलें पडळ। ज्ञानाचा निजबोधु। विज्ञानरूप सकळ॥२॥ तिहीं लोकीं विश्वरूप। दिव्य दृष्टी दिधली। द्वैत हें हरपलें अद्वैतपणें माउली। उपदेशु निजब्रह्म। ज्ञानांजन साउली। चिद्रूप दीप पाहे। तेथें तनुमनु

निवाली ॥ ३ ॥ दान हेंचि आम्हा गोड। देहीं दृष्टी मुराली। देह हें हरपलें। विदेह वृत्ति स्फुरली। विज्ञान हें प्रगटलें। ज्ञेय ज्ञाता निमाली। दृश्य तें तदाकार। ममता तेथें बुडाली ॥ ४ ॥ प्रपंचु हा नाहीं जाणा। एकाकर वृत्ति जाली। मी माझे हारपलें। विषयांधया बोली। उपरती सद्गुरु बोधु। तेथें प्रकृति संचली। धर्ममार्गे शुद्ध पंथ हातीं काठी दिधली ॥ ५ ॥ वेद मार्गे मुनी गेले त्याच मार्गे चालिलों। न कळेचि विषयअंध म्हणोनी उघड बोलिलों। चालतां धनुर्धरा। तरंगाकारी हरलों। ज्ञानदेवो निवृत्तिचा। द्वैत निसरलों॥ ६ ॥

## वासुदेव.

७२४. बाबा ममतानिशि अहंकार दाट। रामनामें वासुदेवीं वाट। गुरु कृपा वोळलें वैकुंठ। तेणें वासुदेवो दिसे प्रगटगा ॥ १ ॥ वासुदेवा हरि वासुदेवा हरि। रामकृष्ण हरि वासुदेवा ॥ २ ॥ आला पुंडलिक भक्तराज। तेणें केशव वोळला सहज। दिधलें विठ्ठलमंत्र बीज। तेणें जालें सर्व काजगा ॥ ३ ॥ रामकृष्णवासुदेवें। वासुदेवीं मन सामावेगा ॥ ४ ॥ शांतिक्षमादयापुरीं। वासुदेवो घरोघरीं। आनंदे वोसंडे अंबरीं प्रेमे डुलें त्रिपुरारिगा ॥ ५ ॥ वासुदेवीं ज्ञेय ज्ञान। ध्यानी मनी नारायण। वासुदेवो परिपूर्ण। कैसे क्षरलेंसे चैतन्यगा ॥ ६ ॥ वासुदेवीं वाहूनि टाळी। पातकें गेलीं अंतराळीं। वासुदेवो वनमाळी। कीर्तन करूं ब्रह्ममेळींगा ॥ ७ ॥ ज्ञानदेवा वासुदेवीं। प्रीति पान्हा उजळी दिवी। टाळ चिपळी धरूनि जिवीं। ध्यान मुद्रा महादेवींगा ॥ ८ ॥

७२५. घुळघुळा वाजती टाळ। झणझाणां नाद रसाळ। उदो जाला पाहाली वेळ। उठा वाचे वदा गोपाळरे ॥ १ ॥ कैसा वासुदेव बोलतो बोल। बाळापोटीं माय रिघेल। मेलें माणूस जीत उठविल। वेळ काळांतें ग्रासीरे ॥ २ ॥ आतां ऐसेंची अवघे जन। तें येतें जातें तयापासून। जगीं जग झालें जनार्दन। उदो प्रगटला बिंबलें भानरे ॥ ३ ॥ टाळटाळीं लोपला नाद। अंगोअंगींची मुराला छंद। भोग भोगितांचि आटला भोग। ज्ञान गिळूनि गावा तो गोविंदरे ॥ ४ ॥ गांवा आंत बाहेरी हिंडे आळी। देवो देविची केली चिपळी। चरण नसतां वाजे धुमाळी। ज्ञानदेवाची कांति सांवळी ॥ ५ ॥

## बाळछंद.

७२६. बाळछंदो प्रेमडोहीं मन। जालें मनाचें उन्मन। उपरती धरिलें ध्यान। झालें ज्ञानपरब्रह्मीं ॥ १ ॥ निमिषा निमिष छंद माझा। बाळछंदो हा तुझा। वेगि येई गरुडध्वजा। पसरूनीया भूजा देई क्षेम ॥ २ ॥ तुटली आशेची सांगडी। ध्यानें नेली पैल तडी। सुटली संसाराची बेडी। क्षणु घडी रिती नाहीं ॥ ३ ॥ नाठवे द्वैताची भावना। अद्वैती न बैसें ध्याना। दिननिशींची रचना। काळगणना छंदे गिळीं ॥ ४ ॥ जप तप वृत्ति सहित। निवृत्ति होईन निश्चिति। समाधी बैसेन एकतत्व। मुखीं मात नामाची ॥ ५ ॥ ज्ञानदेवीं छंद ऐसा। बाळछंद झाला पिसा। दान मागतसे महेशा। दिशादिशा न घली मन ॥ ६ ॥

७२७. अलक्षलक्षीं मी लक्षीं। तेथें दिसती दोहीं पक्षी। वेदां शास्त्रां हेची साक्षी। चंद्रसूर्या सहित। मागेन स्वानुभवअंगुले। पांचा तत्वांचे सानुलें। व्यर्थ इंद्रिये भोगीलें। नाहीं रंगले संताचरणीं ॥ १ ॥ बाळछंदो बाबा बाळ छंदो। रामकृष्ण नित्य उदो। हृदयकळिके भावभेदो। वृत्तिसहित शरीर निंदो। नित्य उदो तुझाची ॥ २ ॥ क्षीरसिंधुही दुहिला। चतुर्दशरत्नीं भरला। नेघे तेथील साउला। मज अबोला प्रपंचेंसी। दानदेगा उदारश्रेष्ठा। परब्रह्म तूं वैकुंठा। मुक्ति मार्गीचा चोहटा। फुकटा नेघे तया ॥ ३ ॥ पृथ्वीतळ राज्यमद। मी नेघे नेणें हेंही पद। रामकृष्ण वाचे गोविंद। हाची छंद तुझ्या पंथे। मंत्र तीर्थयज्ञयाग। या न करि भागा भाग। तूंचि होऊनि सर्वांग। सर्वासंग मज देई ॥ ४ ॥ वृत्ति सहित मज लपवी। माझें मन चरणीं ठेवी। निवृत्ति पदोंपदीं गोवीं तूं गोसावी

एक अवधारा। मज दिधलें हीनवरा। माझें कांहीं सर्वेश्वरा न विचारिशी॥३॥ व्याली वेदना जाणे वांझ कांही नेणें। बालक काय जाणे तहान भूक॥४॥ तैसी ते नव्हे लेकुराची माये। कृष्ण माझी धाये मोकलिते॥५॥ आशा मनशा तृष्णा कल्पना चौघी नणंदा। पापीण रे चिंता सासू माझी॥६॥ सासुरा हा स्वार्थ कांही न विचारी परमार्थ। आतां करीन घात तयावरी॥७॥ दुरळ हा प्रपंच दुष्ट भावे आणि दीर। इहीं मज थोर कष्टविले॥८॥ काम क्रोध थोर बोलती बडिवार। मज म्हणती पोर निदैवाचे॥९॥ नैश्वर गहिवरु दाटतसे गळा। आसुवें ढळढळा गळताती॥१०॥ सासुरयाचे घरीं करित होते काम। अवचित विंदान मांडियेलें॥११॥ घरा सोळा सांधी बहात्तर कोठे। नवही दारवंटे झाडीत होते॥१२॥ चोळी व साउले हिरोनि घेतलें। उघडे पाठविलें माहेराशी॥१३॥ समर्थाची लेकी परि मी संताची पोसणी। विमानीं बैसोनि जाते देखा॥१४॥ बाप चक्रधरा रुक्मादेवीवरा। उबगला संसारा येऊं नेदी॥१५॥

७८२. पृथ:कारे कर्म आचरितां। विधि जिज्ञाशीं काय सत्ता। अष्टादश पुराणें नानामतें आचरतां। परि तयासी विधि विवेक न कळे तत्वता। कर्म कळा जयाची वाचा उच्चारिता। ऐशी नाना द्वंद्वें उपाधिकें जल्पती परि एकही नेणे तेथींची वार्ता रया॥ १॥ ऐशी भ्रांती साम्य बोलती सकळे। परि नकळे नकळे पूर्ण सत्ता रया॥२॥ निजब्रह्म बुद्धि नेणसी। गव्हारा वाउगा का शिणशी। या साठीं भ्रमुनिया बरळशी। पहिलें नव्हे तुजसंकल्पें करिशी। नाना गोष्ठी रया॥३॥ आतां अथातो धर्मजिज्ञासा ब्रह्म जिज्ञासिक वचन। हें तंव वेदीचें प्रमाण। तरी वेदे जें वदवितें नकळे वेद कळा लय लक्ष धारण। पूजा समाधीचेनि यज्ञ यागादिके कर्मे। जपतप अनुष्ठान नाना उपासना मंत्रयंत्रादि साधनें। धांडोळितां परि ते एकही न घडे ब्रह्म जिज्ञासिक वचन। येणें सुखासाठीं बापा होशी पै हिंपुष्टी स्वानंद जीवन सुख आहे अन रया॥४॥ नाना अर्थवाद उपाधि शब्दज्ञानें तेणें। केविं शुद्ध होती याचीं मनें। नाना मुद्रा संकल्पाचिया वाढविंता तेणें। केंवि पाविजे ब्रह्मस्नानें। मी ब्रह्म ऐसें शब्दें वाखाणु जाशी तरी तेणे। ब्रह्म ऐसें केंवि होणें। ब्रह्माहमस्मि बोध वाचे उच्चारितां हेहीं अहंकाराचें लेणें। आतां परतें सकळही वाव जाणोनिया कांही आपलें स्वहित करणे। बापरखुमादेवीवर विठ्ठल चिंतिता निजसुखाशीं येऊं नेदी उणें॥५॥

७८३. आठवितों तूंचि जवळिके। नाठवशी तरी निजसुखें। आठऊं ना विसरू पाहे। तंव सगुणचि हृदयी एक रया॥१॥ तुझ्या नामाचा आठऊ रूपाचा आठऊ। ध्यानांचा आठऊ। असे मना रया॥२॥ विसर पडावा संसाराचा। आठऊ हो तुझिया रूपाचा। येथें नाम रूप ठसा हृदयीं राहो। जिवाचिया जिवलगा। माझिया श्रीरंगा। गोडी घेऊनियां। द्वैत नाहीं पाहो रया॥३॥ बापरखुमा-देविवरा विठ्ठला। सगुणी सुमन गुंफिली प्रीति। आवडे तो कोंदाटलें सुमन हें विरालें। जाली नामरूपीं ऐक्य भेटी। नाम रूप सार जाणोनि जीवन। संसारा जालिसे तुटी रया॥४॥

७८४. परमानंद आजि मानसिरे। भेंटि जाली संतासिरे॥१॥ पूर्वजन्मीं सुकृते केलीं। तीं मज आजि फळासी आलीरे॥२॥ मायबाप सकळ सोयरे यातें। भेटावया मन न धरेरे॥३॥ एक तीर्थहूनि आगळे। त्यामाजि परब्रह्म सांवळेरे॥४॥ निर्धनासी धनलाभ जालारे। जैसा अचेतनीं प्रगटलारे॥५॥ वत्स विघडलिया धेनु भेटलीरे। जैसी कुरंगिणी पाडसा मिनलीरे॥६॥ पियूशापरतें गोड वाटतेरे। पंढरीरायाचे भक्त भेटतारे॥७॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलेरे। संत भेटता भवदुःख तुटलेरे॥८॥

७८५. आतां आपणया आपण विचरी। सेखी प्रकृती ना पुरुष निर्धारी रया॥१॥ आता प्रेतांचे

अलंकार सोहोळले। कीं शब्दज्ञानें जे डौरले। दीप न देखतीं कांही केले। ऐसें जाणेनियां सिण न मानिती प्रतिष्ठा भोगिती भले रया॥२॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला देखतांचि जे बोधले। तेणें सुखें होउनि सर्वात्मक जे असतांचि देहीं विस्तारलें। येणें निवृत्तीरायें खुणा दाउनि सकळ बोलतां सिण झणें होईल रया॥३॥

७८६. अकराव्या खणावरी मंदीर धुपविलें। तेथें एक देखिले रुपेंविण॥१॥ न बोले यासि बोलावया गेलें। मीहि न बोलती झालें गे माये॥२॥ बापरखुमादेविवरेंसि ठक पडिलें। मी चित्त ठसावलें ब्रह्माकारें॥३॥

७८७. पदत्रयादि विलक्षण नातळे वर्णावर्ण। पंचभूतिकपण नातळे ज्यासि॥१॥ ते स्वयंभ प्रमाणें घनावलेन पणें। द्वैताद्वैत नेणें तैसें आहे॥२॥ नामरूपाचा भेद तुटलासें संबंध। स्वयें निजानंद भोगी बापा॥३॥ सारुनि लक्ष लक्षणा शास्त्राचा उगाणा। तेथ वेदादि षड्दर्शना नुमगे पाही॥४॥ तयामाजि तें असतसे निरुतें। न चोजवें पंथें नवल ज्याचें॥५॥ म्हणौनिया परिसा चौंचीचि उजरीं। तेंचि निर्विकारी प्रकाशले॥६॥ निवृत्तिदास म्हणे हा निजभाव। बोलो नये ठाव तैसे जाले॥७॥

७८८. साखरेचा ऊंस जरी होय पुढती। मथितां घृतीं काय क्षीर निवडे॥१॥ माघारे जीवन जरी वाहे सरिता। तरिच जन्मां येती हरिचे दास॥२॥ विविधा मति भक्ति जे करिती। ते अंती नव्हती संसार बापा॥३॥ कापुराचे मसि जरी लिहिजे लिखित। जरि छाये पडे हात प्रकृतीचे॥४॥ पवना पाठीं पांगुळें लागती। तैं जन्मा येति हरिचे दास॥५॥ संत वैष्णव हरिदासा जे नर निंदिती। आणि नमनिती ते वरपडे होती प्रेम किंकर॥६॥ निवृत्तिदास म्हणे विव्हळी जे भजती। ते जन्मा न येती भाक माझी॥७॥

७८९. अमृताची कुंडी निद्रिस्तां मरण। झणे त्या दुषण बोलसी रया॥१॥ वासना संग धीट प्रकृति कनिष्ठ। भोगुनि वैकुंठ जन्म घेती॥२॥ तैसें नव्हे सारासार तत्व निवृत्ती। बुडउनि प्रवृत्ति आपण नांदे॥३॥ ज्ञानदेव बोले अमृत सरिता सर्वाघटीं पुरता हरि नांदे॥४॥

७९०. सत्य ज्ञानानंद गगनाचें प्रावर्ण। नाहीं रूप वर्ण गुण जेथे॥१॥ तो हारे श्रीहरी पाहिला डोळेभरी। पाहते पाहणें दुरी सारोनिया॥२॥ ज्ञानदेव म्हणे ज्योतिची निजज्योती। ते हे उभी मूर्ती विटेवरी॥३॥

७९१. निर्गुणाचे रंगीं रंगले हें मन। सांवळे सगुण ब्रह्म तेंची॥१॥ मताभिमानी ऐसा विश्वास न धरिती। वचनीं निर्गुण सगुण दोन्ही भिन्न असती॥२॥ असिपदीं जैसें तत्पद तें नाहीं। सांवळे ब्रह्म पाही तैसें असे॥३॥ निवृत्तिदास म्हणे चांगया ब्रह्म तेंचि खरें। सांवळें निर्धारें जाण रया॥४॥

७९२. डोळांची पाहा डोळां शून्याची शेवट। निळबिंदु नीट लखलखीत॥१॥ विसावों आलें पातलें चैतन्य तेथें। पाहे पा निरुतें अनुभवे॥२॥ पार्वतिलागीं आदीनाथें दाविलें। ज्ञानदेवा फावलें निवृत्तिकृपा॥३॥

७९३. शून्याचा शेवट डोळा पाहा निराळा। निळबिंदु सावळा प्रकाशला॥१॥ ब्रह्म ज्योतिरूप विसावले जेथ। अनुभव साद्यंत पहा तुम्ही॥२॥ ऐसे कैलासनाथें सांगितलें पार्वती। ज्ञानदेवा निवृत्ति तेंचि सांगे॥३॥

७९४. चहूं शुन्याचा भेद कैसा पहावा देहीं। ब्रह्मरंध्री निसंदेहीं निजवस्तु॥१॥ साकळें सकुमार बिंदूचे अंतरीं। अर्धमात्रेवरी विस्तारलें॥२॥ त्रिकूट श्रीहाट गोल्हाट तिसरें। औठपिठादी सारे ब्रह्मांडासी॥३॥ स्थूळ सूक्ष्म कारणी माया। महाकारणाच्या ठायां रिघ करा॥४॥ निवृत्ति ज्ञानदेव उभयतांचे बोल। आकाश बुबुळीं पाहा असे॥५॥

७९५. आकाश जें दिसे दृष्टिचिया पोटीं। शून्यत्वासी घोटी चैतन्यांत ॥ १ ॥ अर्थ पाहतां सांकडें ऐकतां। कैसें करूं आतां निवृत्ति सांगे ॥ २ ॥ सांगतांची गुज देखिलें नयनीं। हिंडताती मौनी याची लागी ॥ ३ ॥ ज्ञानदेवाचा अर्थ कूटस्थ परिपूर्ण। पूर्णही अपूर्ण होय जेथें ॥ ४ ॥

७९६. सहस्त्रदळ ब्रह्मरंध्र ज्याचें घर। सत्रावी निरंतर वसे जेथें ॥ १ ॥ रक्त शुभ्रवर्ण निळा पीत दिसे। दृष्टी शुद्ध असे त्यामध्यें ॥ २ ॥ फार किती सांगों सज्ञान तुम्ही जन। अर्थ हा समजोन मौन्य धरा ॥ ३ ॥ गुह्याचें ही गुह्य निवृत्तिनें दाविलें। मीच याचाहो बोलें बोलतसे ॥ ४ ॥

७९७. आकाशाचा शेंडा कमळ निराळें। त्यासी चार दळें शोभताती ॥ १ ॥ औट हात एक अंगुष्ठ दुसरें। पर्वार्ध मसुरे प्रमाण हें ॥ २ ॥ रक्त श्वेत शाम निळवर्ण आहे। पीत केशर हे माजी तेथें ॥ ३ ॥ तयाचा मकरंद स्वरूप तें शुद्ध। ब्रह्मादिका बोध हाची जाहला ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीप्रसादें। निजरूप गोविंदें जनीं पाहतां ॥ ५ ॥

७९८. ब्रह्मांडाचे भुवनीं कमळ तें सुंदर। पाकोळ्या साचार चार तेथें ॥ १ ॥ औट हात स्थूळ अंगुष्ठ। सूक्ष्म पर्वार्ध कारण जाण रया ॥ २ ॥ महाकारण मसुरामात्र सदोदित। ब्रह्मरंध्र साद्यंत वसतसे ॥ ३ ॥ चहूं शून्यवर्ण देह चार पहा। कृष्ण निळ शोभा विकासली ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे आतां फार म्हणो काय। सहस्त्रदळीं निश्चय आत्मा असे ॥ ५ ॥

७९९. त्रिगुणाचें मूळ सत्रावीचें सार। उन्मनीचें बीज जाण रया ॥ १ ॥ शून्य ब्रह्म पूर्ण चक्षूचे अंतरीं। निर्विकार निरंजन तोची तें गा ॥ २ ॥ सूर्य चंद्र दोनी प्रकाशले साजिरे। त्रिकूट संचरे आत्मठसा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तिप्रसादें। राहा रे निजबोधें निरंतर ॥ ४ ॥

८००. मन मुरुऊनी करी राज रया। प्रणवासी सखया साक्ष होई ॥ १ ॥ देहीं स्थानमान विवरण करीं आधीं। पिंडींची ही शुद्धि प्रथम करी ॥ २ ॥ औट हात हा देह ब्रह्मांड सगळें यांत। तयाचा निश्चित शोध करा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे विवरण करी वेगे। निवृत्तिच्या संगे साधिलें हेंचि ॥ ४ ॥

८०१. चहूं शून्याआरुतें महाशून्यापरुतें। सर्वांसी पहातें तेंची तें गा ॥ १ ॥ दिसे तेंही शून्य पहा तेही शून्य देहामजी निरंतर भिन्न रूप ॥ २ ॥ शून्य निरशून्य दोन्ही हारपलीं। तेथूनी पाहिली निजवस्तु ॥ ३ ॥ ध्येय ध्यान ध्याता निरसुनी तिन्ही। झालों निरंजनी अति लीन ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी तो जाणें। गुरुमुखें खुण सांगितली ॥ ५ ॥

८०२. शून्य शोधिलें नाहीं जेणें। काय विवरण केले तेणें। अज्ञानपणें फुगणें। गाढव जीणें पशूचें ॥ १ ॥ वर्णाकृति शून्याचार। हा नाहीं ज्या विचार। न घडे न घडे साक्षात्कार। जाण सर्वथा तया नरा ॥ २ ॥ आधीं शून्याची शोधणी केली। मग सदवस्तू प्राप्ति झाली। अमृत वेळाची बोली। बोलतां नये ॥ ३ ॥ आधीं शून्य तें शुभ्रवर्ण। मध्यें श्वेत रचिलें जाण। अर्ध्य शून्य तें ताम्रवर्ण प्रत्यक्ष जाण दिसतसे ॥ ४ ॥ महाशुन्याचा वर्ण निळा। अव्यक्त तेजाचा ओतिला गोळा। ग्रासूनी ठेला भूगोळा। योगी डोळा पाहती ॥ ५ ॥ ऐसें शून्याचें नाहीं ज्ञान। तंववरी अवघेंच अज्ञान जनीं अवघा जनार्दन। अज्ञान सज्ञान काय बोलूं ॥ ६ ॥ ब्रह्म ज्ञानाची किल्ली। सांगितली एकेच बोली। निवृत्तिराजें बोलविली बोली। तेंची बोलीं बोलिलों ॥ ७ ॥

८०३. अव्यक्त मसुराकार पूर्वार्ध संचलें। लक्षा सरीसें झालें लक्षासी पैं ॥ १ ॥ अव्यक्त रेखणें देखण्या आलें व्यक्त। पहातां व्यक्तअव्यक्त दोनी नाहीं ॥ २ ॥ जागृतीच्या ठायी निजतो सहस्त्रदळीं बिंदुच्या समेळीं उच्चार होतो ॥ ३ ॥ ज्ञानदेव शरण निवृत्तीच्या चरणा। समजुनी खुणा तटस्थ झालें ॥ ४ ॥

८०४. सत्रावीचा खेळ लक्षवेना कवणा। ब्रह्मादिकां जाणा अगम्य तें॥१॥ रात्रंदिवस मन चपळत्वें धांवतें। तेंही सत्रावीतें नपवेची॥२॥ सत्रावी अगम्य विधि हरिहरां। लक्षूं पहातां वरा गोविंदु गे॥३॥ ज्ञानदेव दर्शन सत्रावीचें घेतां। उन्मनी ठसवी निवृत्तिराज॥४॥

८०५. आकाशासी गुंफा अंत नाहीं जिचा। शोध करा तिचा सर्वभावें॥१॥ अनंत ब्रह्मांडाचा खेळ जिच्या योगें चाले। चांग्यासी मिनलें तयां ठायीं॥२॥ गुंफेच्या आधारें चंद्र सूर्य चालती। विश्रांतिसी येती तये जवळी॥३॥ ज्ञानदेव नयन धरितां समभावें। सोहं स्वरूप भावें लाधलेंसें॥४॥

८०६. षट्चक्रें बंद निघूनियां गेली। पाहों जो लागलीं तयां गांवा॥१॥ निरंजन सभराभरीत वस्तू कोंदली। साक्षत्वासी आली आत्मदशा॥२॥ वृत्ति झेंपावली आनंद झाला सैरा। सत्रावी येरझारा करी जेथं॥३॥ ज्ञानदेव म्हणे लक्ष लावीं आकाशीं। ब्रह्म पावसि लौकरी तूं॥४॥

८०७. नयनाचे शेजारीं दशवें द्वार बापा। एक मार्ग सोपा बोलतसें॥१॥ आधारीं पवन अपान विराजे। आंगुळें चार साजे तयां ठायीं॥२॥ मणीपुर चक्र नाभिस्थान कमळ। सहा अंगुळांचा खेळ असे तेथें॥३॥ वायुचक्र अनुहात हृदय असे एक। प्राणासी निःशंक जेथे नेई॥४॥ अग्नीचक्र भ्रुवांग शोभतें प्रकाशत्व। प्राणासी उलथावें तयावरी॥५॥ सहस्त्रदळीं ब्रह्मरंध्र शोभतसे निळें। प्रकाशाचे उमाळे जेथें असती॥६॥ ज्ञानदेव म्हणे ऐका प्राणायाम। या अभंगीं निःसीम अर्थ झाला॥७॥

८०८. औटपीठ डोंगरीं गाय एक वसे। क्षीर सेवितसे निजयोगी॥१॥ धाले पूर्णपदीं समान लक्षिती। क्षुधा चाड चित्तीं नाहीं नाहीं॥२॥ भ्रुवांतरीं लक्ष लाऊनी बैसा ध्यानीं। ऐक्यासी उन्मनी होऊनी रहा॥३॥ ज्ञानदेव नमितो आदी देवी प्रति। नेत्रीं पाहे ज्योती शुद्धरूप॥४॥

८०९. सोहंकारीं माया लक्ष आणीं देहीं। निरंजनीं पाहीं मायाकार॥१॥ निर्गुण सगुण माया तेची खरी। प्रसऊनी निर्धारी वांझ असे॥२॥ ज्ञानदेव म्हणे मज माया कृपाळु झाली। तिणें उजळली माझी काया॥३॥

८१०. आकाशीं मळा लाविला बा एक। वांझेचें बाळक शिंपीतसे॥१॥ अग्नीकुंड मनें बाळकें निर्मिले। प्रत्ययासी देखिलें मीया लागीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे उफराटें पहातां। सर्व सौख्यदाता निवृत्ति एक॥३॥

८११. पहा त्रिभुवनीं न दिसे बाइये। नयनांजनीं पाहें आत्मरूप॥१॥ मन बुद्धि चित्त अंतःकरण जाण। या वेगळें निर्वाण ब्रह्म तेंचि॥२॥ ज्ञानदेवा ब्रह्म लाधलें अवचटें। उन्मनीचा घांट चढतांची॥३॥

८१२. आत्मज्ञान जया न देखा निजदृष्टी। तया नरा गोष्टी करूं नये॥१॥ तूर्यारूपें जाण प्रभा हे निःसिम। तया परत राम असे बापा॥२॥ ज्ञानदेवा गुज दाविलें गुरूनें। मनें अनन्यें कल्पीतांची॥३॥

८१३. आत्मा एक बाई स्थिरचरव्यापक। सृष्टी तैसी देख एकलीच॥१॥ पंचमहाभूतें व्यापूनी निराळा। सौंदर्य पुतळा काळाबाई॥२॥ ज्ञानदेव ध्यान धरिले पुढती। त्रैलोक्याची वस्ती असे जेथें॥३॥

८१४. अकारी अर्धमात्रा कवण रीति दिसे। उकारीही घसे कवणे परी॥१॥ मकारी संयुक्त झाली कैशापरी। अर्धमात्रेवरी अर्धमात्रा॥२॥ अर्धमात्रेचा अर्थ अवचटची दिसे। गुरुगम्य सोय जाणती पैं॥३॥ ज्ञानदेवें अर्थ शोधुनी घेतला। महाशून्यीं संचला निवृत्तीराज॥४॥

८१५. शून्य हे चार महा शून्य दिसतसें। निजरंग वसे सर्व त्यांत॥१॥ ऐसा रंग जया लाधतांचि पाही। मनाची ही सोइ हारपली॥२॥

ज्ञानदेवाचा बोल बोलण्याचें रूप। निवृत्तिस्वरूप सर्वत्र हें॥३॥

८१६. शून्याचें जें बीज योगीयांचें गुज। स्वानंदाचें निज ब्रह्म रया॥१॥ त्रिगुण त्रिविध तो सच्चिदानंद। शब्दाचा अनुवाद नसे जेथें॥२॥ ज्ञानदेव म्हणे सद्गुरु जाणती। इतरांची वृत्ति चालेचीना॥३॥

८१७. ऐसा योगीराज देखिता अवचट। उन्मनी लंपट रात्रंदिवस॥१॥ सत्रावीची शिव टाकुनी राहिला। पहाण्यातीत झाला सर्वाठायीं॥२॥ असिपदीं आनंद प्रियरूप जाण। ध्यानाचें कारण जेथें नाहीं॥३॥ ज्ञानदेव म्हणे ऐसा योगीराणा। तयाचीया चरणा प्रणिपात॥४॥

८१८. एका एक गुज बोलतों निर्वाण। निवृत्ति चरण आठऊनी॥१॥ अर्धमात्राक्षरीं अक्षरें पाहाती। अनाक्षरा परती बाईयानो॥२॥ रज तम सत्व याहुनी निराळी। लक्षाही वेगळी निवृत्ति जाणे॥३॥ ध्येय ध्याता ध्यान परता जिचा खेळ। ज्ञेय ज्ञाता ज्ञान याची साक्ष॥४॥ सत्‌चित्‌आनंद ब्रह्मा हरी हर। तेही जिचा पार नेणविती॥५॥ सलोकता मुक्ती आदी तिन्ही वर। वसतें जें घर योगीयांचें॥६॥ त्वंपद तत्पद असिपदाचा रंग। त्याचा अंतरंग देखा बाईयानो॥७॥ निवृत्ति सोपान मुक्ताबाईची खुण। ज्ञानदेव साधन बोलीले हे॥८॥

८१९. उन्मनी संयोगें गोसावी विराजे। चहूं देहाचें ओझें निवारोनी॥१॥ सोहमस्मीचे छंदे परिपूर्ण। विज्ञान हे खुण जेथें नाहीं॥२॥ चंद्रसूर्याहुनी तेज तें आगळें। अव्यक्तें व्यापिलें अनुभवें॥३॥ अनुभवाची खुण गुरुगम्य जाणती। ज्ञानदेवें विनंति हेचि केली॥४॥

८२०. नयनाचें अंजन मनाचें रंजन। ठसा हा साधन बाईयानो॥१॥ ॐकार अक्षर अक्षरीं हारपे। अनुभवाच्या मापें मोजूं बापा॥२॥ बिंदूचें जें मूळ प्रणवाचें फळ। योगियाचें खेळ तेच ठायीं॥३॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तिप्रसादें। स्वरूपाच्या विनोदें बोलिलें हें॥४॥

८२१. गगनमंडळीं नारी सुकुमार दिसे। तिन्ही लोक वसे तिचे उदरीं॥१॥ परादी वाचा तन्मय ते झाली। साक्षीत्वासी आली ब्रह्मरंध्री॥२॥ ज्ञानदेव म्हणे नयनांतील ज्योती। पाहातां वृत्ति हरे विषयांचीं॥३॥

८२२. वर मुळें शेंडा खालीं दिसे बानो। प्रपंची रानोरान वृक्ष बारे॥१॥ त्रिगुणाच्या शाखा उपशाखा बहुत। नाना याती येत पत्रें ज्यास॥२॥ पक्व फळ अहं सोहं गोडी त्याची। सेवितां जीवाची आस पुरे॥३॥ ज्ञानदेव म्हणे वृक्ष परिपूर्ण झाला। बीज रूढला जाणीवेचा॥४॥

८२३. धांवत धांवत आलों नयनांजनीं। प्रकाश दिनमणी उणा वाटे॥१॥ निशी दिवस दोन्हीं नाहीं जेथ बारे। अर्धमात्रेवरी लक्ष ठेवीं॥२॥ अक्षय अक्षर क्षरविरंहीत साजे। ज्ञानाचें जें ओझें चालेचीना॥३॥ ज्ञानदेव चक्षु झाला परेवरी। यापरती बरोबरी नाहीं बापा॥४॥

८२४. अंजनाचें अंजन सदोदीत पाहिलें। पाहाणें होऊनी ठेलें सर्वाठायीं॥१॥ आतां बोलाबोली नको बा आणिक। बिंदु तो निःशंक ब्रह्म रया॥२॥ अनुहात उन्मनी म्हणोनी व्यर्थ काय। मुखीं धरी सोय ब्रह्मरंध्री॥३॥ ज्ञानदेव म्हणे न बोले आणिक। डोळीयांची वाल पाहतांची॥४॥

८२५. अकार उकार मकार ओंकार। प्रणव हा साकार सुरेख रे॥१॥ सुरामात्र मसार योगी ध्याती देहीं। निरंजन पाहीं ब्रह्म तेची॥२॥ ज्ञानदेव म्हणे देह झालें देव। प्रणवची शिव अनुभवें॥३॥

८२६. पाणियाचें मोतीं ज्योती वसे जेथ। महाकारण साद्यंत पाहा तुह्मीं॥१॥ जागृति स्वप्न सुषुप्ति जेथें उद्भव तीचा। योगी सम ज्याचा अधिकारी॥२॥ गोल्हाटाचे मुळीं ज्ञानदेव

बैसला। सहस्त्रदळीं शोभला काळा बाई॥३॥

८२७. सकार हकारीं नाडी दिसती कैशा। उलटल्या दशदिशा अमुपचि॥१॥ सूक्ष्म मूळ सर्व बीजाचा उद्भव। हाची अनुभव देहामध्यें॥२॥ समान जैसा अर्क स्थिरचर एकला। आत्मा हा संचला तैशा परि॥३॥ ज्ञानदेव म्हणे याहुनी आणिक। बोलाचें कवतुक जेथ नाहीं॥४॥

८२८. दिव्यरूप चक्षु कैशापरि झाला। ठसा हा उमटला कवण्यापरी॥१॥ चहुं देहांचा वर्ण अवर्ण देखिलें। विश्व म्यां पाहिलें तयामध्यें॥२॥ ज्ञानदेव म्हणे सर्वांचे जें मूळ। सत्रावी केवळ शुद्धरूप॥३॥

८२९. काळा पुरुष तो हा गगनांत जो नांदे। अनुभवाच्या भेदें भेदला जो॥१॥ भेदून अभेद अभेदूनी भेद। सच्चिदानंद जेथ नाहीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे तेथें अक्षय राहिला। आत्मा म्यां पाहिला या दृष्टिसी॥३॥

८३०. विश्व ब्रह्म भासे ऐक्य येतां देहीं। अनुहातीं पाहीं अपार नाद॥१॥ देखिला परी संयोगें व्यापला। विश्व तरीच झाला बाईयानो॥२॥ पिंड ब्रह्मांडाचा विस्तार विस्तारला। माझा मीच झाला कोणपरी॥३॥ ज्ञानदेव म्हणे या अर्थाची सोय। धरी माझी माय मुक्ताबाई॥४॥

८३१. गुजगुजीत रूप सावळे सगुण। अनुभवितां मन वेडें होय॥१॥ भ्रमर गुंफा ब्रह्मरंध्र तें सुरेख। पाहतां कवतुक त्रैलोकीं॥२॥ आनंद स्वरूप प्रसिद्ध देखिलें। निजरूप संचलें सर्वा ठायीं॥३॥ ज्ञानदेव म्हणे या सुखाची गोडी। अनुभवाची आवडी सेवीं रया॥४॥

८३२. सहस्त्र दळ बिंदु त्यांत तेज दिसे। तें हो काय ऐसें सांगा मज॥१॥ जेथ नाम रूप वर्ण नाहीं बारे। तें हें रूप बारे चैतन्य बा॥२॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवाची खूण। जाणे तो सुजाण अनुभविया॥३॥

८३३. कोणाचे हें रूप देह हा कोणाचा। आत्माराम साचा सर्व जाणे॥१॥ मीतूं हा विचार विवेकें शोधावा। गोविंद हा ध्यावा याच देहीं॥२॥ ध्येये ध्याता ध्यान त्रिपुटीं वेगळां। सहस्त्रदळीं उगवला सूर्य जैसा॥३॥ ज्ञानदेव म्हणे नयनांतील रूप। या नांव चित्पद तुम्ही जाणा॥४॥

८३४. डोळियांत डोळा काळियांत काळा। देखण्या निराळा निळारूप॥१॥ ब्रह्म तत्व जाणे ज्योतिरूपें सगळा। ज्योतीही वेगळा ज्योती वसे॥२॥ ज्ञानदेव म्हणे देवा ऐसी ज्योती। अर्थमात्रा उत्पत्ति सर्वाजीवां॥३॥

८३५. सद्गुरु निवृत्ति दिसतो घनदाट। सुषुप्तीचा घांट वेधतांची॥१॥ आत्मामाया शिव शक्तीचे हें रूप। दिसतें चिद्रुप अविनाश॥२॥ ज्ञानदेव चढे ऐसी वाट देख। आकाशीं असे मुख तिचें कैसें॥३॥

८३६. परेचे शिखरावरी वस्ती माझी झाली। समरसें विराली मज माजी॥१॥ आत्मदशे योगी लक्ष लाविती देहीं। ब्रह्मरंध्रु पाहीं सत्पद तें॥२॥ अणुरेणु शून्य गगना तेजें दिसे। निरंतर वसे निरंतर॥३॥ ज्ञानदेव म्हणे वृत्ति सहस्त्रदळीं लावा। मसुरा मात्रा बरवा ध्यायी जाई॥४॥

८३७. नासिकाचा प्राण कोणीं मार्गी येत। नाद दुमदुमित अनुहातीं॥१॥ इडे पिंगळेचा ओघ सैरां दिसतसे। त्यावरी प्रकाशे आत्मतेज॥२॥ ज्ञानदेव म्हणे अष्टांग योगीया। साधितो उपाया याची मार्गे॥३॥

८३८. प्रणवाचे भेद उकलावे देहांत। चंद्राची मी मात सांगतसें॥१॥ सहस्त्र दळावरी तेज शुद्ध असे। त्या तेजे प्रकाशे चंद्र बापा॥२॥ उन्मनीचे ध्यासें सहस्त्रदळ गाजे। पश्चिम मार्गी बीजें दोन असती॥३॥ लक्ष लावी ज्ञानदेव एकलाची। शुद्ध ज्योती तोचि जाणे एक॥४॥

८३९. मन हें लावा हें सालयीं निरुतें। सहस्त्रदळा वरुतें परे जवळी॥१॥ अनुहात नाद ब्रह्मस्थानीं असे। तेथें रूप कैसें सांगा मज॥२॥

ज्ञानदेव म्हणे स्वरूप जो जाणे। त्यासी शरण होणें अनन्य भावें॥३॥

८४०. महावाक्यार्थ तें शून्य कैसें बापा। सत्वर नयनीं पहा आत्मप्रभा॥१॥ प्रभा शीत उष्ण देहीचेही सार। प्रणव हा सारासार आरुता रया॥२॥ ज्ञानदेव म्हणे सोपानातें ऐसें। निराकार असे अकारेसी॥३॥

८४१. दशमद्वार अग्रशून्य सूक्ष्म गगनीं। जेथ आसे उन्मनी निखिल रूपे॥१॥ द्विविध भाग पिंडी द्विविध ब्रह्मांडी। या तीं पडीपाड़ीं ब्रह्मरंध्रीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे शून्यांतील रूप। अनंत ब्रह्मांणे जेथ आहाती॥३॥

८४२. जडांतील शुद्धांश कौतुकें रिघाला। निवृत्तीने दाविला कृपा करूनी॥१॥ अनुहात भेद दाविला कृपनें । सर्व हें चैतन्य गमलें तेव्हां॥२॥ ज्ञानदेव नमनीं निवृत्तीचे पदीं। आनंद ब्रह्मपदीं एक झाला॥३॥

८४३. नवा आंत ओवरी औठपिठा जवळी। शून्यातीत काळी सुकुमार॥१॥ अंगुष्ट पर्वार्ध मसुरा मात्र दीर्घ। उन्मनीचा मार्ग तेच ठायीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे पर्वार्धांतील नीर। सर्व हें साचार विश्व दिसे॥३॥

८४४. भ्रुवामध्यें तेज चंद्रसूर्यविरहित। आदी मध्य अंत संचलेंसे॥१॥ तुर्यारुपें ते सुषुम्ना प्रकाशली। नवविध अमृतजळीं तया तेजा॥२॥ ज्ञानदेव वदे अष्टांग योग साध। पावाल ब्रह्मपद याचा भेद॥३॥

८४५. पश्चिम मार्गी खूण बीजें दोन साजिरीं। अविनाश ओवरी योगीयांची॥१॥ त्रिकूट श्रीहाट चंद्रसूर्य जाणा। पश्चिम मार्गीं खूण याची की रे॥२॥ ज्ञानदेव म्हणे बीजे दोन बापा। पाहें आत्मरूपा तेथे बा रे॥३॥

८४६. इडा वाम दक्षिणे पिंगला। दोहींत या कळा ब्रह्मस्थानीं॥१॥ प्रणव सैरा बापा धांवे अवघड वाटे। रीघा नवपाटे जीव जीवना॥२॥ ज्ञानदेव म्हणे हाची कीं रे प्रणव। यापरता अनुभव नाहीं नाहीं॥३॥

८४७. प्रणवासी रूप नाहीं कांही छाया। दशवे द्वारीं मूळमाया असे कीं रे॥१॥ सहस्त्रदळीं वृत्ति लावितां निःशंक। मनासीं भवासी ऐक्यता तेथें॥२॥ ज्ञानदेव म्हणे या परतें नाहीं। बोलण्याची सोयी अनुभव जाणे॥३॥

८४८. प्रणवच देह देह हा प्रणव। कल्पनेचा भाव कल्पूं नये॥१॥ अंजनाचें सार तेंच देह बा रे। आत्मा परिपूर्ण सारे पाहती ज्ञानी॥२॥ ज्ञानदेव म्हणे प्रणव माझा पिता। अक्षर तेच माता याच भेदें॥३॥

८४९. पश्चिममार्ग बापा प्रणव कीं दे सांग। जेथें असे महालिंग तेजोमय॥१॥ चंद्रांतील जल ते सत्रावी केवळ। नादबिंदा कल्होळ गर्भी झाला॥२॥ ज्ञानदेव म्हणे देह हा दुर्लभ। त्रैलोकीं सुलभ भजनाचा ही॥३॥

८५०. प्रणवाचें आकाश असे सर्वावरी। आकाशीं भरोवरी प्रणवाची॥१॥ प्रणव जें गुह्य ऋषि योगीयांचे। सर्वावरिष्ठा साचें वेद आज्ञा॥२॥ एका वेदांत सिद्धांती प्रणव तो तत्वता। ज्ञानदेव वक्ता सांगतसे॥३॥

८५१. प्रणवाचें रूप कोणें देहें देखिलें। निवृत्तिनें दाविले याच देहीं॥१॥ सकार हकार तुर्या उन्मनी भेद। अभेदुनी भेद केले मज॥२॥ ज्ञानदेव म्हणे प्रणवाची खोली। अक्षरीची बोली देह सार॥३॥

८५२. अमृताची क्षीर ब्रह्मांडभुवनीं। पाहाती त्रिभुवनीं नवल झालें॥१॥ नाद विंदा भेटी झाली कवण्या रीती। शुद्ध ब्रह्म ज्योती संचलीसे॥२॥ प्रकृति पुरुष शिव शक्ती भेद। त्याचे शरीरीं द्वंद देह जाणा॥३॥ ज्ञानदेव म्हणे पिंडीं शोध घ्यावा। ब्रह्मांडीं पाहावा ब्रह्म ठसा॥४॥

८५३. प्रणवाची शक्ती शिव प्रणवची। क्षर अक्षर साची प्रणव ते॥१॥ त्रिकूट श्रीहाट गोल्हाट

ब्रह्मरंध्र। प्रणव निरंतर ऐक्य झाला॥२॥ ज्ञानदेव आपण प्रणव झाला आधीं। ध्याता ब्रह्मपदीं प्रणवची॥३॥

८५४. स्थावर जंगम प्रणव प्रसवला। आत्मा स्वय संचला प्रणवा ठायीं॥१॥ अवस्था भुक्ती मुक्ती प्रणवची जन्मता। अर्धमातृके परता प्रणवची॥२॥ ज्ञानदेव म्हणे प्रणवाचे ठायीं। प्रणवीं प्रणव पाहीं निराळा तो॥३॥

८५५. शिवशक्तीचा भेद अर्धनारी पुरुष। याचा हा सौरस आणा चित्ता॥१॥ जागृति स्थूळ तुर्या महाकारण। हेचि कीर खुण तुझे ठायीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे कैसे हें जाणिजे। देही नाद गाजे परेवरी॥३॥

८५६. निळावर्ण ब्रह्मरंध्र येकनिकें। पहा माझे सखे भाविक हो॥१॥ उन्मनि सदैव वसे अक्षय पंथें। लाउनियां चित्त तया ठायीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे यापरती खूण। नाहीं ऐसी आण वाहातसें॥३॥

८५७. आकाश हें असें माझें शिर बापा। कर्ण दिशा चिद्रूपा नाद उठती॥१॥ आधारापासूनी सहस्त्रदळावरी। निःशब्द निरंतरी नारी एक॥२॥ ज्ञानदेव म्हणे अनुभव ऐसा जेथें। तोचि जीवन्मुक्त संत योगी॥३॥

८५८. अग्नीचे पोटीं पुरुष उद्भवला अवचट। सत्रावी लंपट निशिदिनीं॥१॥ आधार नाहीं जेथ निराधार वर्तती। निराधार न म्हणती आपणा लागीं॥२॥ ज्ञानदेव म्हणे निवृतीने दाविलें। या नयनीं पाहिलें अविनाश॥३॥

८५९. सत्रावीचे गांवी शून्याचा विस्तार। प्रणव निराकार सदैव असे॥१॥ पश्चिम पूर्व असे शुक्ल कृष्ण नारी। दैवी आणि आसुरी वेगें शोधा॥२॥ ज्ञानदेव म्हणे अर्धमात्र कोणती। मसुरा मात्रा आहे ती दोन्ही भाव॥३॥

८६०. सहस्त्रदळ साजिरें नयनाचे शेजारी। अर्ध मातृका अंतरी चिन्मय वस्तू॥१॥ ॐकार नादीं कीं नाद ॐकारीं। दैवीं निरंतर प्रणवीं पहा॥२॥ मकार अर्धमात्रा शून्याचा निश्चय। आत्मा एक असे स्वयें रया॥३॥ ज्ञानदेव म्हणे कैवल्याचा दाता। कोण पत्री हे कविता नाहीं ऐसी॥४॥

८६१. स्थूलदेह सूक्ष्म कारण तिसरा देह। चौथा महाकारण देह ऐक बापा॥१॥ औट पीठाचे दरीं कर्पूर वर्णावरी। शामाचे अंतरी महाकारण॥२॥ महाकारणीं आतुला लक्षाचा पुतळा। उन्मनी हे कळा दैवी वरी॥३॥ सहस्त्रदळ तेंच कीं आन नाहीं ऐसें। महा तेज वसे ज्याचे आंत॥४॥ पश्चिम मार्ग तेथुनी ऊर्ध्व उंच गगनी। जेथें एक कामिनी एकलीच॥५॥ मार्ग नहीं तेथ कोणे रीती जावें। सुषम्नेवरी वळघावें सामर्थेसी॥६॥ तेथूनी ऊर्ध्व छिद्र मुंगी नेत्रातुल्य। त्यांतून उडणें भले चपलत्वेंसी॥७॥ जडतां वळंघितां बरी नारी आपण एक। रनानारी नपुंसक एक रूप॥८॥ ज्ञानदेव म्हणे जो उडनी जाय तेथ। परब्रह्मीचि मात तोचि जाणे॥९॥

८६२. सहस्त्रदळ ब्रह्मरंध्र एके नेत्री देखे। देखणा पारुखे ते ठायीं बा॥१॥ नादीं नाद भेद भेदुनी अभेद। पश्चिम मार्गी आनंद देखुनी राहें॥२॥ मन पवन निगम आगम सुरेख। आधार सहस्त्रदळ देख देहीं नयनीं॥३॥ ज्ञानदेव म्हणे डोळां हा प्रणव। निवृत्तीनें अनुभव मज दिधला॥४॥

८६३. सगुण देह बापा निर्गुण माझें शीर। हा तो भेदाकार कैशापरी॥१॥ दैवी आसुरी पूर्व पश्चिम मार्ग किरे। शून्यांतील सारे चराचर हें॥२॥ ज्ञानदेव म्हणे भेद ऐक गुरुपुत्रा। नयनीं अर्धमात्रा सर्व जन॥३॥

८६४. अनुहत ध्वनी वरि चंद्रमा वर्तुळ। तेजाचे उमाळे अनंत तेथें॥१॥ ब्रह्मशिखरीं निराळ्या मार्गावरी। अविनाश कर्णकुमारी एकलीच॥२॥ तेथुनी महाद्वार उन्मनीचें वर्ता। त्यावरी चढता रीग नसें॥३॥ अणुचें जैं अग्र ऐसा तेथ मार्ग। औटपीठीं सवेग जावें वरी॥४॥ पंचदेव

तेथें एकरूपां देखती। औटपीठीं वसती आरुते तेही॥५॥ तयाचेही वर रश्मिअग्रामधुनी। शुद्ध ब्रह्म निर्वाण असे तेथ॥६॥ ज्ञानदेव म्हणे ब्रह्मांडींचा अंत। नाही ऐसी मात बोलतसे॥७॥

८६५. आत्माराम देखे सहस्त्रदळावरी। उन्मनी हे पाहीं आरुते तेहीं॥१॥ चक्षुचे अंतरी चक्षु देखे पूर्ण। हेचि कीरे खुण तुझें ठायीं॥२॥ मी ब्रह्म सोई ज्ञानपद तें साजिरें। ते ठायीं निर्धारें तुझा तूंचि॥३॥ बाप रखुमादेवीवरा तुझा तूं आपण। सर्व हें चैतन्य तुझे ठायीं॥४॥

८६६. औटपीठातळीं तेज गुजगुजीत। चारी देह तेथ साक्ष पाहा॥१॥ अवस्था हे चारी संयोगची एक। शून्य जें निःशंक आत्मज्योती॥२॥ ज्ञानदेवा बाई निवृत्ति वदविता। त्याचे चरणीं हीताहींत झालें॥३॥

८६७. शून्याचें भुवनीं स्वरूप अविनाश। प्रणवीं पुरुष दिसतसे॥१॥ निळा रंग देखें सर्वांचे देखणीं। चैतन्य भुवनीं समरस॥२॥ ज्ञानदेवा ध्यान सच्चिदानंदाचें। सर्व ब्रह्म साचे येणें येथें॥३॥

८६८. सत्व रज तम शुद्ध सत्व चौथा। निर्गुणी गुणापरता बाईयानो॥१॥ स्थूळ देह सूक्ष्म कारणाचे वरी। महाकारण सरी चौथा देह॥२॥ कैवल्य देह तो ज्ञानदेवें पाहिला। पहाणें होऊनी ठेला चराचरी॥३॥

८६९. आत्मा पूर्णपणीं लक्ष सोहं स्मरणीं। लक्षासी उन्मनी आणा बारे॥१॥ नरदेहाचें सार्थक सद्गुरुचरणीं। महाकारणासरी चौथा देह॥२॥ ज्ञानदेव म्हणे सद्गुरुकृपेचें। नित्यानित्य कृपें शोध करा॥३॥

८७०. स्वरूपाचें ध्यानीं निरंजन पाहिलें। डोळ्यानें दाविलें चराचर॥१॥ आतां माझें नयन नयनीं रिघों पाहे। नयना नयनीं राहे नयनची॥२॥ ज्ञानदेवा नयन निवृत्तिने दाविला। सर्वा ठायीं झाला डोळा एक॥३॥

८७१. नयनांतील रूप जो हें देखे पुरुष। त्याचे चरणीं वास असे माझा॥१॥ नयनांतील ज्योती देखे गुह्यभावें। त्याचें स्वरूप भावें वंदावें गा॥२॥ ज्ञानदेव म्हणे नयनांतील शून्य। देखे तोची धन्य भाग्यवंत॥३॥

८७२. डोळा माझा बाप त्रिभुवना परता। जो देखे मुक्तता तोचि लाहे॥१॥ जीव जंतु कृमी मुंगी नेत्रामध्यें। वास्तव्य गोविंदे केलें पाहा॥२॥ ज्ञानदेवाचें बोल उघड निर्मळ। जान्हवीचें जळ स्थिर वाहे॥३॥

८७३. नयनाचे आंगणीं तुर्येचा प्रकाश। उन्मनी उल्हास तयावरी॥१॥ श्वेत शाम कळा प्रकाश आगळा। स्वयंज्योति बाळा लक्ष लांवी॥२॥ ज्ञानदेव म्हणे कैसे हे नयन। चैतन्याची शून्य आन नाहीं॥३॥

८७४. रक्तवर्ण स्थूळ श्वेत हें सूक्ष्म। कारण तें श्याम ऐसें देखा॥१॥ निळावर्ण देह महाकारण साजिरा। ज्योतीचा मोहरा अलक्ष लक्ष्मी॥२॥ ज्ञानदेव म्हणे सर्व हें चैतन्य। मन हेंची धन्य धन्याचेनी॥३॥

८७५. औट पिठावरी निरंतर देश। तेथ मी जगदीश असे बाई॥१॥ त्रिकुटाचा फेरा टाकीला माघारा। अर्धमात्रेवरा वरी गेलों॥२॥ अर्धनारी पुरुष एकरूप दीसे। तेची ब्रह्म ऐसें जाण बाई॥३॥ ज्ञानदेवी शून्य नयनी देखिलें। सर्वत्रीं संचलें शून्य एक॥४॥

८७६. ब्रह्मज्ञानी पुरुष तोचि ओळखावा। नयनांजनीं पाहावा ब्रह्मठसा॥१॥ देखतसे देहीं द्वैत भेदातीत। तोची धन्य संत माझे मनीं॥२॥ त्याचे चरणोदकीं जान्हवी पवित्र। सहस्त्रदळावर लक्ष ज्याचें॥३॥ ज्ञानदेव म्हणे ऐशा योगीयाला। देखतां तयाला नमन माझें॥४॥

८७७. निशी दिवस दोघे लोपले तें ठायीं। निरंजन ते ठायीं लक्षुनी पाहा॥१॥ रवी शशी ज्याचें तेजें प्रकाशले। नवल म्यां देखिलें एक

तेथें ॥ २ ॥ नारी पुरुष दोघे एक रूपें दिसती। देखणें पारुखे तया ठायी ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे शिव तेचि शक्ती। पाहातां व्यक्तीं व्यक्त नाहीं ॥ ४ ॥

८७८. चैतन्य तें दिसें उघडेया डोळां। नयनाचा सोहळा निवृत्ति जाणे ॥ १ ॥ मसुरांतील सूक्ष्म अनुभवें दिसे। तेथ तेज असे कवण्या रीती ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे ऐसे तेथे तेज। असे गुजगुजीत निर्मळ तें ॥ ३ ॥

८७९. आकाशाचे ठायीं चंद्र सूर्य तारा। सूक्ष्माचा फेरा सर्वा ठायीं ॥ १ ॥ बिंदुस्थान तेथें ब्रह्मरंध्र ज्योती। तेथे योगी वसती दिवस रात्र ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे सर्वची हें शून्य। वस्तु परी पूर्ण सर्वाठायीं ॥ ३ ॥

८८०. अखंड तमासा डोळा देख निका। काळा निळा परिवा बाईयानो ॥ १ ॥ सदोदीत नयनीं नयन हारपे। निळ्याचे स्वरूपें मनीं वसो ॥ २ ॥ अकरा वेगळें नाहीं बा आणिक। माझे नेत्रीं देख शुद्ध ज्योती ॥ ३ ॥ ज्ञानोबाची वाणी पूर्ण रूपी घ्यावी। देहींच पाहावी आत्मज्योती ॥ ४ ॥

८८१. शून्याचा उद्भव सांगतों या बोला। औटपिठीं वहिला सूक्ष्म मार्ग ॥ १ ॥ मनपुराचे वरी द्वादश आंगुळें। तयावरी गेले अव्हाटेने ॥ २ ॥ आतां तया सदनीं उफराटें मार्गे। वळंघिता सवेग पश्चिम पंथीं ॥ ३ ॥ पश्चिमपंथीं नाडी घोष वाहे जीचा। तेथुन ध्वनीचा विस्तार गा ॥ ४ ॥ ध्वनीचेंही वरी शुद्ध तेज असे। चंद्रमा प्रकाशे तेच ठायीं ॥ ५ ॥ चंद्राचे वरी एक निराळाच मध्य। स्त्रियेचें निजबोधें निजरूप ॥ ६ ॥ निखिल जें तेज ज्याचेनी अमृत। जीववी देहींत देह दैव ॥ ७ ॥ औटापिठातळीं सर्व तें दीसे। सूर्य हा प्रकाशे तेच ठायीं ॥ ८ ॥ ज्ञानदेव म्हणे मज त्रिकुटाची गोडी। धरितां आवडी ब्रह्म लाभे ॥ ९ ॥

८८२. आतां औटपिठींचा मार्ग एक बाई। निशिदिनीं पाहीं शोध करा ॥ १ ॥ औटहात प्रमाण सत्य कीं हें जाण। त्यांतील जें स्थान ऐकें एक ॥ २ ॥ महालिंग स्थान टाळू एके संधीं। तेथें एक सिद्धि तेजोमय ॥ ३ ॥ मार्ग तेथ परतले दोहीं भागीं। पश्चिमीं महालिंगी मार्ग ऐसा ॥ ४ ॥ सत्रावीचे शिखरीं मार्ग एक गेला। तो म्यां देखियेला याच देहीं ॥ ५ ॥ महालिंगीं मार्ग अंत नाहीं ज्याचा। शोध करितां वाचा कुंठीतची ॥ ६ ॥ ज्ञानदेव म्हणे हा विचार पाहा। जाणता दाविता विरळा एक ॥ ७ ॥

८८३. आकाशाचें अंतीं प्रणवाचें गुज। निरंजन बीज साधूं पाहाती ॥ १ ॥ सद्रूप चिद्रूप अद्वय एक कळा। संसारीं वाहिला निर्विकार ॥ २ ॥ प्रणवीं बीज अणुरेणु आंत। दशमद्वाराची मात अपूर्व बा रे ॥ ३ ॥ बापरखुमादेवी प्रणव निखिळ। शब्दाचें पाल्हाळ प्रणवीं रीघे ॥ ४ ॥

८८४. आत्माराम नयनीं निरखुनी देखिला। निळा रंग ओतीला आदी अंती ॥ १ ॥ गोल्हाट त्रिकूट ब्रह्मरंध्रीं वस्तु। तुर्येची ऐसी मातु याच ज्ञानें ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे सर्वा अंतरीं तुर्या। निवृत्ती योगी वेगीं गुज बोले ॥ ३ ॥

८८५. तुर्येमध्यें माझा अखंड रहीवास। निवृत्ति म्हणे अविनाश तूर्या करी ॥ १ ॥ स्थुळदेह निमतां सूक्ष्म उरतां। कारणीं हारपतां कैसें झाले ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे महाकारणीं नांदे। निवृत्तीने आनंदे दाखविलें तें ॥ ३ ॥

८८६. शास्त्रार्थाची वाणी निरंजनी दीसे। औटपिठीं वसे निर्विकार ॥ १ ॥ अहं सोहं मग ॐकाराचे देठीं। अहंतेचे शेवटीं सोहं वस्तू ॥ २ ॥ सोहं वस्तु निळी अहं गेलीया। आनंद झालीया महाकरणीं ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीची आण। या वेगळी खूण आणिक नाहीं ॥ ४ ॥

८८७. मीच माझा डोळा मीच शून्यांत निळा। माझा मी वेगळा तयामध्यें ॥ १ ॥ उफराटी दृष्टी लावितां नयनीं। ते दृष्टीची वाणी किंचित ऐका ॥ २ ॥ उफराटी दृष्टि देखे उन्मनीवरी। तेव्हां निर्विकारी मीच मग ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे देहा डोळां

दिठी। पाहातां सर्व सृष्टि निवृत्ती एका॥४॥

८८८. सत्व रज तम त्रिगुण तें ब्रह्म। अर्धमात्रा निःसीम ॐकार हा॥१॥ सहज हा प्रणव सर्वातीत साजे॥ मीपणास तेथ ठाव नाहीं॥२॥ अक्षर कूटस्थ सर्वातीत असे। अक्षर अविनाश ऐसें जाणा॥३॥ ज्ञानदेव म्हणे सर्वांचे शेवटीं। अविनाश दृष्टी असे कीं रे॥४॥

८८९. तूर्या तें महाकारण नाहीं नाहीं जेथें। दर्शनाचे मतें माझा मीच॥१॥ गोल्हाट त्रिकूट श्रीहाटातीत। महाकारणाची मात जेथ नाहीं॥२॥ क्षर अक्षर अनाक्षर नाहीं। कूटस्थ सर्वही प्रसवला॥३॥ ज्ञानदेव म्हणे ऐसे हें पाहातां। निवृत्तीनें तत्वता कथनी केली॥४॥

८९०. सुनीळ जें ब्रह्म बिंब सत्रावीचें। विश्वरूप चैतन्य महाकारणीं॥१॥ ब्रह्मज्योतीचिये प्रकाशें करुनी। देखे त्रिभुवनीं एक वस्तु॥२॥ ज्ञानदेव म्हणे ज्यीतीची जे ज्योती। ब्रह्मरंध्री वस्ती परमात्मयाची॥३॥

८९१. महा तेजा आंत बिंदू कोणे परी। उष्ण तेजा माझारीं साक्ष पाहा॥१॥ कुंडलनी उर्ध्वमुखें अग्नी सोडी। तयाची हे जोडी संत जना॥२॥ ज्ञानेश्वर म्हणे आत्मयातें जाणे। सुनिळ अनुभवणें निवृत्ती पाहा॥३॥

८९२. ऐका हा शेवट अभंगमाळा झाली। तूर्या हेच आली प्रत्यया गा॥१॥ तूर्या तेचि उन्मनी क्षर तें अक्षर। निर्गुण साकार ऐसें देखा॥२॥ देह तें विदेह महाकारण ब्रह्म। हें निश्चयाचें वर्म ऐसें जाणा॥३॥ कनक तेंची नग समुद्र तरंगीं। देह हा सर्वांगीं ब्रह्म जाणा॥४॥ अभंगा शेवट जाणे निवृत्ति एक। त्यानें मज देख कृपा केली॥५॥ मूर्खासी हा बोध सांगों नये बापा। अभंग कृत्याचा लेश नसो हातीं॥६॥ ज्ञानदेव म्हणे हें कृत्य हातां नये। माय देऊं नये कोणासही॥७॥

८९३. होय सौरी आतां उघडा घाली माथा। परपुरुषीं रमल्या बाई त्याची पतिव्रता॥१॥ कर्मेवीण सौरी झाले आले संतापाशीं। ज्ञान डौर घेऊनि करीं लिंग देह नाशी॥२॥ रांडव राहूं नका बाई पाहुनि करा वर। तेचि तुम्ही सुखी व्हाल आह्मव मरण बर॥३॥ रांडावा ज्या ज्या मरती बाई त्यासी नाना योनी। स्वामी करूनि सुखी होई खुंटती येणीं जाणीं॥४॥ निवृत्तीप्रसादें ज्ञानदेव बोले। स्वामी करूनी सुखी होई निजानंदीं डोले॥५॥

८९४. कैसे बोटानें दाखवूं तुला। पाहे अनुभव गुरूच्या मुला। नको सोडूं देठीच्यां मुळा। सोडी अंजुळी आपुल्या कुलारे॥१॥ ज्या ठायीं चळना ढळ। विश्व जयाचे सत्तेनें खेळ। अणुरेणु व्यापक सकळ। तेथें चळ ना अचळरे॥२॥ जेथें डोळिया दृष्टि पुरेना। तेथें वृत्तीचें कांही चालेना। तेथें बुद्धीचा रीघ होईना। तेथें मनाची धांव पुरेना गा॥३॥ काय पहाशी तूं भोंवतें। येतां जातां जवळी असते॥ तुझ्या पायाखालीं तुडवतें। तुझ्या डोळ्यामध्यें दिसतें गा॥४॥ ही खुण त्वां ओळखुनी घ्यावी। गुरुपुत्रा जाउनी पुसावी। तो नेऊनी तुला दाखवी। सोय सांगितली ज्ञानदेवी गा॥५॥

८९५. जोहार माय बाप जोहार। मी कृष्णाजी घरंचा पाडेवार। त्याचे घरांतला सर्व कारभार। माझे शिरावर की जी माय बाप॥१॥ कामाजी बाजी हुद्देदार। तेणें रयतेचा केला मार। रयत फार नागविली की जी माय बाप॥२॥ क्रोधाजी बाबा शेखदार झाले। त्याजकडे हुजूरचें काम आलें। तेणें कामाजीचें छळण केलें की जी माय बाप॥३॥ मनाजी बाजीं यानें फितुर केला। तेणें करूनि मोठा बखेडा झाला। गांव सगळा नाशिला की जी मायबाप॥४॥ बुधाजी पाटील कायापूरचे। ममताईचे हाताखालचे। त्यांत जीवाजी भुलले की जी माय बाप॥५॥ या उभयतांचा विचार वागला। त्यामुळें आम्हांस राग आला। बुधाजी आवरी आपल्या पोराला की जी माय बाप॥६॥ सद्गुरूचा मी पाडेवार। निवृत्तीशीं असे माझा

जोहार। ज्ञानदेवा सफळ संसार झाला की जी माय बाप॥७॥

८९६. काय सांगू तूतें बाई। काय सांगू तूतें॥ध्रु०॥ जात होते यमुने पाणिया वातत भेतला सावला। दोईवल तोपी मयुल पुछाची खांद्यावरी कांबला॥१॥ तेणें माझी केली तवाली मग मी तिथुन पलाली। पलतां पलतां घसलून पलली। दोईची घागल फुतली॥२॥ माझे गुलघे फुतले मग मी ललत बथले। तिकुन आले शालंगपानी मला पोताशीं धलिलें॥३॥ मला पोताशीं धलिलें माझें समाधान केलें। निवृत्तीचे कृपें सुख हें ज्ञानदेवा लाधले॥४॥

८९७. मन हें धालें मन हें धालें पूर्ण विठ्ठलचि झालें। अंतरबाह्य रंगुनि गेलें विठ्ठलची॥१। विठ्ठल म्हणतां हरलें पाप पदरीं आलें पुण्य माप। धाला दिनाचा मायबाप विठ्ठलची॥२॥ विठ्ठल जळीं स्थळीं भरला ठाव कोठें नाहीं उरला। आज म्या दृष्टीनें पाहिला विठ्ठलची॥३॥ ऐसा भाव धरुनी मनीं विठ्ठल आणिला निजध्यानीं। अखंड वदो माझी वाणी विठ्ठलची॥४॥ तो हा चंद्रभागे तीरा पुंडलिकें दिधला थारा। बापरखुमादेवीवरा जडले पायीं विठ्ठलची॥५॥

८९८. हरिभक्त संत झाले हो अनेक। त्यामाजी निष्टंक कांही ऐक॥१॥ शुक वामदेव शौनक नारद। अजामेळ प्रह्लाद बिभीषण॥२॥ ध्रुव पराशर व्यास पुंडलिक। अर्जुन वाल्मिक अंबरीष॥३॥ रुक्मांगद भीष्म बगदालभ्यसूत। सिभ्री हनुमंत परिक्षिती॥४॥ कश्यपादि अत्री गौतम वशिष्ठ। भारद्वाज श्रेष्ठ मार्कंडेयो॥५॥ बळी कृपाचार्य इंद्र सूर्य चंद्र। ब्रह्माआदि रुद्र पूर्ण भक्त॥६॥ सर्वांचा एक आहे मी किंकर। म्हणे ज्ञानेश्वर वैष्णवांसी॥७॥

८९९. तूं विटेवरी सखये बाई हो करी कृपा। माझें मन लागो तुझ्या पायीं हो करी कृपा। तूं सावळे सुंदरी हो करी कृपा। लावण्य मनोहरी हो करी कृपा। निजभक्ता करुणा करी हो करी कृपा॥१॥ पंढरपुरीं राहिली। डोळा पाहिली। संतें देखिली। वरूनी विठाई वरूनी विठाई। सच्चिदानंद अंबाबाई हो करी कृपा। उजळकुळ दीपा। बोध करी सोपा। येउनी लवलाही येउनी लवलाही॥ध्रु०॥ तुझा देव्हारा मांडिला हो करी कृपा। चौक आसनीं कळस ठेविला हो करी कृपा। प्रेम चांदवा वर दिधला हो करी कृपा। ज्ञान गादी दिली बैसावया हो करी कृपा। वरी बैसविली आदी माया हो करी कृपा। काम क्रोध मदमत्सर दंभ अहंकार। त्याचे बळ फार। सर्व सुख देई सर्व सुख देई॥२॥ शुक सनकादिक गोंधळी हो करी कृपा। नाचताती प्रेम कल्लोळीहो करी कृपा। उदे उदे शब्द आरोळी हो करी कृपा। पुढें पुंडलिक दिवटा हो करी कृपा। त्याने मार्ग दाविला निटा हो करी कृपा। आई दाविली मूळपीठा हो करी कृपा। बापरखुमादेवीवरू। सुख सागरु। त्याला नमस्कारु। सर्व सुख देई सर्व सुख देई॥३॥

९००. भगवद्गीता हेचि थोर। येणें चुके जन्म वेरझार। वैकुंठवासी निरंतर। भवसागर उतरेल॥१॥ राम नाम सार धरी। तूंचि तारक सृष्टीवरी। त्याचेनि संगें निरंतर। भवसागर तरसील॥२॥ व्यर्थ प्रंपच टवाळ। येणें साधिली काळवेळ। नाम तुझें जन्म मूळ। हें केवळ परिसावें॥३॥ त्रिकाळ साधिलें नाम। दूर होतील विघ्न कर्म। साधितील धर्म नेम। हे पुरुषोत्तम बोलियले॥४॥ तंव अनुष्ठान सुगम। साधिले सर्व सिद्धि नेम। क्षेम असेल सर्व धर्म। सर्वकाळ फळले॥५॥ ज्ञानदेव कर्म अकर्ता। पावन झाला श्रीअनंता। सुखदुःखाचा हरी भोक्ता। सर्वकाळ आम्हा आला॥६॥

९०१. व्यर्थ प्रपंच टवाळ। सार एक निर्मळ कृपा करी हरि कृपाळ। दीन दयाळ हरी माझा॥१॥ क्षमा शांति दया रूपी। तोचि तरेल स्वरूपीं। नामें तरलें महापापी। ऐसा ब्रह्मा

बोलिला ॥ २ ॥ गीतेमाजी अर्जुनाशीं हरी सांगे साक्षी जैशी। जो रत होतसे हरिभक्तीशी। तो नेमेशी तरेल ॥ ३ ॥ ज्ञानदेव भाष्यें केले। गीता ज्ञान विस्तारलें। भक्ति भाग्यवंती घेतलें। भाष्येंकरूनी गीतेच्या ॥ ४ ॥

१०२. गुरु हा संतकुळीचा राजा। गुरु हा प्राणविसांवा माझा। गुरूवीण देव दुजा। पाहातां नाहीं त्रिलोकीं ॥ १ ॥ गुरु हा सुखाचा सागर। गुरु हा प्रेमाचा आगर। गुरु हा धैर्याचा डोंगर। कदाकाळी डळमळीना ॥ २ ॥ गुरु वैराग्याचें मूळ। गुरु हा परब्रह्म केवळ। गुरु सोडवी तात्काळ। गांठ लिंगदेहाची ॥ ३ ॥ गुरु हा साधकाशीं साह्य। गुरु हा भक्तालागी माय। गुरु हा कामधेनु गाय। भक्ताघरीं दुभतसे ॥ ४ ॥ गुरु घाली ज्ञानांजन। गुरु दाखवी निज धन। गुरु सौभाग्य देउन। साधुबोध नांदवी ॥ ५ ॥ गुरु मुक्तीचें मंडन। गुरु दुष्टाचें दंडन। गुरु पापाचें खंडन। नानापरी वारितसे ॥ ६ ॥ काया काशी गुरु उपदेशी। तारक मंत्र दिला आम्हाशीं। बापरखुमादेवीवराशी। ध्यान मानसी लागलें ॥ ७ ॥

१०३. कानोबा तुझी घोंगडी चांगली आम्हांसी कां दिली वांगली ॥ ध्रु० ॥ स्वगत सच्चिदानंदें मिळोनि शुद्धसत्व गुण विणलीरे। षड्गुण गोंडे रत्नजडित तुज श्याम सुंदरा शोभलीरे ॥ १ ॥ काम कर्म अविद्या त्रिगुण पंचभुतांनी विणलीरे। रक्त रेत दुर्गंधी जंतु नरक मुतानें भरलीरे ॥ २ ॥ षड्विकार षड्वैरी मिळोनि तापत्रयानें विणलीरे। नवाठायीं फाटुनी गेली ती त्वां आम्हांसि दिधलीरे ॥ ३ ॥ ऋषि मुनि ध्यातां मुखि नाम गातां संदेह वृत्ती विरलीरे। बापरखुमादेविवर विठ्ठले त्वत्पादी वृत्ति मुरलीरे ॥ ४ ॥

श्रीज्ञानेश्वरांची गाथा समाप्त

## ॥ पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ॥

